श्रीपाद कृष्ण कोल्हटकर

# आत्मवृत्त

संपादक

रा. प्र. कानिटकर

प्रस्तावना लेखक

वि. स. खांडेकर




मॉडर्न बुकडेपो प्रकाशन

# चार प्रास्ताविक शब्द

१९१८ चे ऑगस्ट महिन्याचे अखेरीस महिला विश्वविद्यालयांतील अध्यापक प्रो. मायदेव यांनीं मला आत्मचरित्र लिहिण्याबद्दल एक विनंतिपत्र पाठविलें; व तें लिहिण्याचें मी त्यांजपाशीं कबूलहि केलें. त्या संस्थेतील विद्यार्थिनींसाठीं नेमलेल्या पुस्तकांत " अभिनवकाव्यमाला " हें पुस्तक असून त्यांत माझी कांहीं कविता आहे, व कवितेचें मर्म कळण्याकरितां कवीच्या चरित्राची माहिती असणें जरूर आहे, हें कारण प्रोफेसरसाहेबांनीं सदरहू विनंति करतांना दर्शविलें होतें; व मीहि तें कारण लक्षांत ठेवून एक अल्प चरित्र लिहिण्याचें ठरविले. चरित्र लिहितांना आयुष्यांतील आरंभींच्या गोष्टी मला संक्षेपानें देतां आल्या. परंतु ज्याप्रमाणें क्षितिजापाशीं बिंदूप्रमाणें दिसणारा राजमार्ग आपणापासून अंतराच्या अल्पत्वाच्या मानानें अधिकाधिक रुंदावत जाऊन स्पष्टहि होत जातो त्याप्रमाणें मी करीत असलेल्या स्वचरित्राच्या सिंहावलोकनांत उत्तरकालीन भाग मला पूर्वकालीन भागापेक्षां अधिक विस्तृत व स्पष्ट दिसावयास लागून त्या मानानें चरित्राची पृष्ठसंख्याहि वाढत चालली. वर्तमानकालांतील गोष्टींचें महत्त्व भूतकालीन गोष्टींच्या अनेक पटींनीं वाढत असल्यामुळें, ज्या गोष्टीच्या वर्णनास मी आणखी दहा वर्षांनीं एक वाक्य दिलें असतें, तिच्यासाठीं अनेक पृष्ठें खर्च करूं लागलों. याचा परिणाम असा झाला कीं सहा तासांत लिहावयाचें चरित्र आज सहा महिन्यांनीं पूर्ण होत आहे.

मजकुराचें वाढतें प्रमाण हें या चरित्रलेखनास लागलेल्या कालावधीचें एकटेंच कारण होतें असें नाही. स्वस्तुति व वैयक्तिक निंदा करण्याचा मला मनापासून कंटाळा असतांहि या चरित्रांत पदोपदी त्या गोष्टी मला कराव्या लागल्या. ज्या गोष्टी घडत असतां मला आनंद झाला त्यांचें कथन कष्टप्रद वाटूं लागलें, मग दुःखद गोष्टी कालाच्या उदरांतून उकरून काढण्याचें मला प्राणसंकट वाटल्यास त्यांत काय नवल ? एकदां माझे अकारण स्नेही असून दैववशानें हल्लीं निष्कारण वैरी झालेल्या कांही व्यक्तीवर प्रतिकूल टीका करिताना माझ्या लेखणीने आपला प्रवास मुंगीच्या पावलानेच केला. जन्ममरणाच्या फेऱ्यांतून सुटलेल्या मुमुक्षूस जो आनंद होतो तोच मला आज या आत्मचरित्रांतून सुटल्यामुळें होत आहे.

लोकोत्तर पुरुषांचीं चरित्रे अत्यंत मनोरंजक वाटतात. सामान्य पुरुषाची चरित्रे मनोरंजक जरी वाटली नाहीत तरी ती पूर्वोक्त चरित्रांपेक्षां निःसंशय अधिक उपयुक्त असतात. कारण सामान्य वाचकांस त्यांचें अनुकरण अत्यंत सुलभ असते. माझ्या चरित्रापासून जर एखादा धडा शिकण्यासारखा असेल तर तो हाच होय की अगदीं सामान्य प्रतीच्या मनुष्यानें आपल्या सामर्थ्यापलीकडचे काम अंगावर घेऊन त्याजकडे आपले शक्तिसर्वस्व लाविलें तर त्यांत त्याला यश मिळणें कठिण नाही.

जळगांव ( वऱ्हाड )<br>
८–३–१९१९

श्री. कृ. कोल्हटकर

# प्रास्ताविक.

श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांच्या जन्मशताब्दाच्या वर्षा त्याच्या 'आत्म-वृत्ताची'ची नवी आवृत्ति प्रकाशित होत आहे, ही साहित्याच्या अभ्यास-कांच्या दृष्टीनें आनंददायक गोष्ट आहे. काळपुरुष न्यायानिपुण आहे असें आपण मानीत असलों, तरी तो अनेकदां लहरीपणानं वागतो! शिवाय वाङ्मयीन अभिरुचि महिलांच्या वेषभूषेप्रमाणं पिढीपिढीला प्रसंगी दशकादशकाला सुद्धां बदलत जाते. त्यामुळें एके काळीं लोकप्रियतेच्या लाटांवर आरूढ झालेले कलाकार पुढे विस्मृतीच्या तळाशीं जाऊन पडल्याचा अनुभव येतो. आजच्या पिढीचं दैवत ही उद्याच्या पिढीच्या दृष्टीनें एका छिन्नभिन्न दगडी मूर्ति होऊन बसते. इ. इ. केलेट या लेखकानं 'The whirling of Taste' या वाङ्मय-चर्चात्मक पुस्तकांत चंचल लोकप्रियतेचं आणि अस्थिर लोकाभिरुचीचं सोदाहरण विवेचन केलं आहे. अभिरुचि भिंगरीसारखी फिरत असते हें त्याच्या प्रतिपादनाचें मुख्य सूत्र. मराठी साहित्याच्या गेल्या शतकाच्या इतिहासांतहि या सिद्धान्ताला पोषक अशी अनेक उदाहरणें सांपडतील. श्रीपाद कृष्ण हे त्यांतलेच एक.

आपल्या लोकप्रियतेच्या कालखंडांत कोल्हटकर युगप्रवर्तक साहित्यिक मानले जात असत. केळकर, खाडिलकर, वामनराव जोशी, वरेरकर, गडकरी, चिं. वि. जोशी इत्यादि समकालीनांनीं व शिष्यांनीं त्यांची प्रतिभा आणि कर्तृत्व याविषयीं गौरवोद्गार काढले आहेत. 'तात्या ती तलवार एक तुमची, बाकी विळे कोयते' असें गडकऱ्यांसारख्या प्रतिभासंपन्न शिष्यानं म्हणावं, असाच १९०० ते १९१० या दशकांत कोल्हटकरांचा दबदबा होता. पण आज 'सुदाम्याचे पोहे' हें अजोड पुस्तक सोडलं तर त्यांचं बाकीचं साहित्य फारसं वाचलं जात नाही. तें वाचायला कांही रसिक उत्सुक असले तरी त्याची अनेक पुस्तकें बाजारांत उपलब्ध नाहीत. १९०९ ला बडोदा येथें झालेल्या साहित्य संमेलनाच्या वेळी तिथले दिवाण, प्रसिद्ध पुढारी आणि साहि-त्यिक रमेशचंद्र दत्त यांच्याशी 'हे महाराष्ट्राचे अग्रगण्य नाटककार' असा खाडिलकरांनी कोल्हटकरांचा परिचय करून दिला होता. पण कोल्हटकरांच्या एकाहि नाटकाचे गेल्या तीन-चार तपात रंगभूमीवर फारसे प्रयोग झालेले नाहीत. विद्यापीठानं लावलेलं त्यांचं एखादं नाटक तात्पुरतं अभ्यासलं जात असलं, तरी त्यांचीं पुष्कळशी नाटकं बाजारांतच काय पण ग्रंथालयांतसुद्धां

मिळत नाहींत. तीं मिळत नाहींत म्हणून हळहळणारा रसिकवर्गहि मर्यादित आहे. याचं मुख्य कारण नाटक पाहून त्याचा जसा रसास्वाद घेतां येतो, तसा तें वाचून आनंद घेण्याची कला आपल्यांत अजून रुजलेली नाहीं. पाश्चात्त्य नाटकं उभ्या जन्मांत पाहायला मिळालीं नाहींत तरी तीं वाचून आम्ही त्यांचा रसास्वाद घेऊं शकतों, प्रसंगीं तोंड भरून त्यांचं कौतुक करतों. पण आपल्याकडंहि स्वतंत्र-पणें वाचनीय अशीं नाटकं असूं शकतात, याची दखल मात्र आपण सहसा घेत नाहीं. याला एकच अपवाद सांगतां येईल तो म्हणजे गडकऱ्यांचा.

या सर्व गोष्टींचा मथितार्थ एवढाच कीं, एखादा कालखंड गाजवून गेलेल्या सर्वच लेखकांना पुढील पिढ्यांतहि लोकप्रियता लाभतेच असं नाही. काळ हा सर्वश्रेष्ठ न्यायाधीश आहे हें खरं असलं तरी त्याच्यापुढं इतके दावे येतात, त्या दाव्यांच्या अनुरोधानं त्याला इतक्या खऱ्याखोट्या साक्षी ऐकाव्या लागतात आणि मोडी लिपींतली इतकीं कागदपत्रें चाळावी लागतात कीं, तो बिचारा अनेकदां गोंधळून जातो. अशा भांबावलेल्या मनःस्थितींत तो जो निकाल देतो तो वज्रलेप ठरतो.

काळाचा किंवा लोकप्रियतेचा कौल कोल्हटकरांना अनुकूल पडला नाहीं हें खरें. पण एवढ्यामुळं आधुनिक मराठी साहित्याच्या पहिल्या कालखंडात त्यांनीं जें कर्तृत्व केलं तें उपेक्षणीय ठरत नाहीं. आज-उद्यांच्या वाङ्मयाच्या उपासकांनीं मनःपूर्वक अभ्यास करावा असंच कार्य नाट्य, टीका व विनोद या तीन क्षेत्रांत त्यांनीं केलं आहे. १९२७ सालीं पुण्याला भरलेल्या साहित्य-संमेलनाचे कोल्हटकर अध्यक्ष होते. त्या वेळीं लिहिलेल्या लेखांत अच्युतराव कोल्हटकरांनी त्यांची तुलना सेंट हेलीना बेटांत बंदिवान होऊन पडलेल्या नेपोलियनशीं केली होती. वाटर्लूला झालेल्या पराभवामुळे वीर पुरुष म्हणून नेपोलियनचं असामान्यत्व जसं उणं ठरत नाही, तसा लोकप्रियतेच्या क्षेत्रांत झालेला श्रीपाद कृष्णांचा पराजय हाहि त्यांच्या कर्तृत्वाला कमीपणा आणतो असं मला वाटत नाहीं. पराभूत सुधारक हा विजयी पुराणमतवाद्यापेक्षां निश्चित श्रेष्ठ असतो. कारण भावी काळांतल्या प्रगतीचीं बीजं त्याच्या सुधार-णेच्या धडपडीतूनच निर्माण होतात.

• • •

१८७४ ते १९२० हा आधुनिक मराठी साहित्याचा पहिला उज्ज्वल कालखंड. या कालखंडाच्या पूर्वार्धांत चिपळूणकर-आगरकरांनी आशय आणि आविष्कार या दोन्ही दृष्टींनी मराठी वैचारिक गद्याला नवं सुंदर आणि समर्थ असं वळण लावलं. त्या वैचारिक गद्याच्या पाठोपाठ

ललित गद्य फुलूं लागलं. १८९० ते १९२० या काळांतल्या ललित गद्याला नवं सामर्थ्य आणि नवं सौंदर्य यांची जी जोड मिळाली तिचे शिल्पकार मुख्यतः दोघे. पहिले हरि नारायण आपटे आणि दुसरे श्रीपाद कृष्ण कोल्हटकर. दोघेहि प्रतिभेचं देणं लाभलेले थोर लेखक पण दोघांच्या प्रतिभा अगदीं भिन्न जातींच्या. हरिभाऊ स्वभावतः ध्येयवादी किंवा आदर्शवादी असले तरी त्यांची वास्तवावरली दृष्टि कधींहि ढळली नाही. किंबहुना भोंवतालच्या साध्या पण दाहक वास्तवांतूनच त्यांना आपल्या कलाकृतीची प्रेरणा मिळत गेली. या आदर्शोन्मुख वास्तवतेला साजून दिसेल अशीच हरिभाऊंची शैली साधी व प्रसन्न. श्रीपाद कृष्ण हरिभाऊंच्यासारखेच सामाजिक सुधारणेचे कैवारी होते, पण त्यांच्या प्रतिभेची जात होती सौंदर्यवादी. त्यामुळं वास्तवापेक्षां कल्पनारम्यतेला आणि रसोत्कटतेपेक्षां चमत्कृतिप्रियतेला त्यांच्या साहित्यांत फार मोठं स्थान मिळालं. त्यांच्या मतिविकार या शुद्ध सामाजिक नाटकांत जपानमध्यें शिक्षण घेऊन परत आलेला नायक चकोर आपल्या विधवा झालेल्या प्रिय मैत्रिणीची गांठ पडावी म्हणून तिच्या घरी बैराग्याचा वेष घेऊन जातो, असा प्रसंग आहे. हरिभाऊंच्या सामाजिक कादंबऱ्यांत असा अद्‌भुतरम्य वाटणारा प्रसंग औषधालासुद्धां सांपडणार नाही.

आपटे-संप्रदाय व कोल्हटकर-संप्रदाय या दोघांनीहि आपापल्या परीनं १८९० ते १९२० या कालखंडावर अधिराज्य केलं. १९१० पुढचीं दहा वर्षें गाजवली ती खुद्द कोल्हटकरांनी नव्हेत, तर त्यांच्या गडकरी आणि वरेरकर या शिष्यांनीं. हरिभाऊंना असे शिष्य-प्रशिष्य मिळाले नाहीत. असं असूनहि हरिभाऊंची रसिकमनावरली पकड कोल्हटकरांच्यापेक्षां दीर्घकाळ कायम राहिली. हरिभाऊंच्या अनुकरण करतां येणार नाही अशा कलागुणांमुळें हें घडलं, हे उघड आहे. कोल्हटकर त्यांच्याप्रमाणं जनमनावर दीर्घकाळ पकड ठेवूं शकले नाहींत. पण त्यांच्या शिष्य प्रशिष्यांनी आणि त्यांच्यापासून स्फूर्ति मिळालेल्या लेखकांनी साहित्याचीं अनेक दालनं सजवलीं व गाजवली. वि. सी. गुर्जर, वरेरकर, गडकरी, चिं. वि. जोशी, आनंदीबाई शिर्के, अत्रे, माडखोलकर, खानोलकर ही त्यांतलीं कांही नांवे.

या दोन संप्रदायांच्या गुणावगुणांची चर्चा करण्याची ही जागा नव्हे. मात्र मराठी साहित्याचा खोल अभ्यास करून पीएच्. डी. मिळवावी अशी इच्छा असणाऱ्या एखाद्या प्राध्यापकाला या दोन संप्रदायांचा विस्तार आणि विकास, त्यांची सामर्थ्यें आणि मर्यादा हा एक आव्हान देणारा विषय होऊं शकेल.

• • •

कोल्हटकरांना त्यांच्या स्वत:च्या पिढींत जे महत्त्व प्राप्त झालं आणि त्यांच्या नंतरच्या दोन पिढ्यांत जे शिष्य-प्रशिष्य मिळाले, ते कशामुळं? कोल्हटकरांनीं आपल्या काळांतल्या मराठी वाङ्मयाला अगदी नवीन अशा कोणत्या गोष्टी दिल्या, साहित्याच्या प्रगतीला त्यांनी कोणत्या प्रकारें हातभार लावला, हें सार सविस्तर सांगितल्याशिवाय त्यांच्या कर्तृत्वाचं मूल्यमापन होऊं शकणार नाही. पण तो एका प्रबंधाचा विषय असल्यामुळं इथे त्यांनी मराठीला दिलेल्या देणग्यांचा विचार सूत्ररूपानंच करणं इष्ट होईल.

कोल्हटकरांच्या साहित्यावर ज्यांच्या प्रतिभेचं प्रारंभीचं पोषण झालं त्या गडकऱ्यानी त्यांच्या फार मोठ्या बलस्थानावर नेमक बोट ठेवलं आहे. 'श्री महाराष्ट्र गीतां'त गुरूंविषयी लिहितांना गडकरी म्हणतात ' –जिथें रंगली साधी भोळी जनाईची गाणी। तिथेच खेळे श्रीपादांची कलावती वाणी।' या कलावती वाणीनंच श्रीपाद कृष्णांनी त्या काळच्या सुशिक्षित वाचकाला प्रथम आकृष्ट केलं. कल्पना, भावना किंवा विचार शक्य तितक्या साध्या, सरळ पद्धतीनं व्यक्त करण्याची चिपळूणकरांच्या पूर्वींची परंपरा होती. क्वचित् अलंकारिक भाषेचा उपयोग केला जाई. पण त्या अलकारांच्या मागं प्रतिभेची चमक नसे. 'कादंबरी' किंवा 'दशकुमारचरित' या सस्कृत ग्रथांतल्या वर्णनाच्या निर्जीव नकला हरिभाऊंच्या पूर्वीच्या कादंबरीत आढळत. पण नवी चमकदार कल्पना, सौंदर्य आणि माधुर्य यांनी नटलेला तिचा आविष्कार आणि चमत्कृति, सूचकता, वक्रोक्ति यांच्या साहाय्यानं त्या आविष्काराला आलेली लज्जत या साऱ्या गोष्टी कोल्हटकरांच्या आधी ललित गद्यांत फारशा आढळत नसत. श्रीपाद कृष्णांना चमत्कृतिप्रिय कल्पकतेची जी देणगी लाभली होती तिच्यामुळं या सर्व गोष्टी त्यांच्या शैलीत पहिल्यापासून प्रगट होऊं लागल्या. 'वीरतनय' हें त्यांचं पहिलं नाटक. पंचविशीच्या आंतबाहेर लिहिलेलं. पण त्यांतसुद्धां त्यांनी मराठी गद्याला दिलेल्या या नव्या शैलीच्या खुणा जागोजाग आढळतात. 'मृत्यु हा स्वतः जर मृत्यूचा विषय असता तर मला किती आनद झाला असता!' असं या नाटकाचा नायक शूरसेन आपल्या दिवंगत पत्नीची तीव्रतेनं आठवण झाल्यावर म्हणतो. हे उद्गार त्याच्या अंतरंगीचं दु:ख तर सांगतातच, पण त्याबरोबरच आपल्या चमत्कृतीनं बुद्धीला गुदगुल्या करतात. या नाटकाची नायिका शालिनी शूरसेनाविषयी आपल्या मनांत निर्माण झालेली कोमल भावना ज्या नाजूक नऱ्हेनं व्यक्त करते ती मोठी मनोज्ञ आहे. हा संवाद असा आहे :

शालिनी :– महाराज, ज्या पुरुषावर माझं प्रेम आहे त्याचं नांव सांगून काय उपयोग? त्याच माझ्यावर प्रेम नसलं तर उगीच—

शूरसेन :– काय, तुझ्यासारख्या सुशील, सुरूप राजकन्येवर तो प्रीति करीत नाही हें संभवेल तरी कसं ? असा मूर्ख, अंध, वेडा —

शालिनी :– नका, नका या अभागिनीसाठी त्या महात्म्याला दूषण लावूं नका. शिवाय त्याचं नांव कळल्यावर तुम्हांलाहि तसं केल्याचा पश्चात्ताप होईल.

शूरसेन :– तर मग तो माझ्या मित्रवर्गापैकीं आहे काय ?

शालिनी :– मनुष्याचा सर्वोत्कृष्ट मित्र म्हणजे त्याचा आत्मा, हें जर खरं असेल तर त्यास तुमचा मित्र म्हणतां येईल.

'वीरतनय' नाटकापासून 'श्यामसुंदर' कादंबरीपर्यंत कोल्हटकरांच्या या कल्पक, सूचक आणि चमत्कृतिप्रिय शैलीची उदाहरणामागून उदाहरणें देतां येतील. फुलांचा रंग जसा त्याच्यापासून अलग करतां येत नाही, तशी ही शैली त्यांच्या व्यक्तित्वाच्या किंवा लेखनाच्या अंतरंगापासून निराळी करतां येणार नाही. साहित्यशास्त्राच्या दृष्टीनें तिला अनुकूल किंवा प्रतिकूल असं पुष्कळ बोलतां येईल. गडकऱ्यांसारख्या त्यांच्या प्रतिभासंपन्न शिष्यानं हीच शैली फुलवली, निरनिराळ्या रीतीनं नटवली आणि या कलावती वाणीला भावनोत्कटतेची जोड देऊन अवघ्या दहा वर्षांत मराठी रसिकमनं लीलेनं जिंकली. या शैलीच्या गुणदोषांची मीमांसा स्वतंत्रपणें करतां येईल. पण एक गोष्ट उघड आहे. साधी, सुबोध, प्रसन्न शैली म्हणजे जशी सपक, नीरस व कामचलाऊ भाषा नव्हे, तशी कोल्हटकर पद्धतीची सूचक, कल्पक व सुंदर शैली म्हणजे बेगडी अलंकारप्रियतेचें किंवा उथळ शब्दावडंबराचें प्रदर्शन नव्हे.

या दोन्ही शैलीचा मराठीत जसा सदुपयोग तसाच दुरुपयोगहि करणारे अनेक लेखक आढळून येतील. तें कांही असो नदी वाहतां वाहतां जसं आपलं पात्र बनवीत जाते, तसा लेखकहि आपल्या प्रतिभेच्या आविष्काराला अनुकूल अशी शैली घडवीत राहतो, किंबहुना त्याच्या आविष्काराच्या धडपडीतूनच कळत-नकळत ती घडविली जाते.



कोटी, कल्पना, चमत्कृति, चतुरालाप, मार्मिक उत्तर-प्रत्युत्तरें इत्यादिकांनी नटलेली कोल्हटकरांची शैली परंपरागत मराठी गद्याच्या शैलीपेक्षां अधिक वेधक होती. त्यामुळं 'वीरतनय' आणि त्यापेक्षांहि 'मूकनायक' पाहतांना पावसाळ्यांत हजारों काजवे चमकत असावेत आणि वनश्री हिरकण्यांच्या माळांनीं नटल्याचा भास व्हावा तसा अनुभव तत्कालीन मराठी प्रेक्षकांना

आला. साहजिकच त्या काळचा सुशिक्षित प्रेक्षकवर्ग एकाच वेळीं चकित आणि उल्हसित झाला.

या शैलीच्या जोडीनं कोल्हटकरांच्या सौंदर्यप्रिय ( Romantic ) वृत्तीनंहि त्याला भारून टाकलं. विशेषतः स्त्री-पुरुषांमधल्या प्रेमाविष्काराच्या बाबतींत त्यांच्या नाटकांत जो मोकळेपणा प्रतीत होई, तो मराठी रंगभूमीला फारसा परिचित नव्हता. कोल्हटकरांचा उदय होईपर्यंत संस्कृत नाटकांच्या द्वारें आलेल्या प्रेमाच्या चौकटीपलीकडं कुणीहि पाऊल टाकलं नव्हतं. दहा-बारा वर्षांचा मुलगा असलेल्या आणि पत्नीच्या आठवणीनं व्याकुळ होणाऱ्या विधुर शूरसेनावर प्रेम करणारी राजकन्या शालिनी किंवा मुक्या सेवकाचं सोंग घेऊन आलेल्या विक्रांताकडं आकृष्ट झालेली, एकांतांत 'उगीच कां कांता गांजिता दासी दीना' म्हणून त्याची विनवणी करणारी आणि आपली प्रियकराची ताटातूट होणार म्हणून व्यथित मनानं त्याचा निरोप घ्यायला आलेली व बागेंत झोपेचं सोंग घेऊन पडलेल्या विक्रांताचं आपण चुंबन घेतलं तर त्यांत वावगं असं काय हा प्रश्न स्वतःला विचारणारी राजकन्या सरोजिनी या दोघींत प्रीतिभावनेच्या दृष्टीनें निश्चित नावीन्य होतं. परंपरागत संकेतांपलीकडं जाणाऱ्या प्रणयाविष्काराची ही सुंदर पदचिन्हं होती. प्रेक्षकांनी—विशेषतः शाळा कॉलेजांत संस्कृत व इंग्रजी प्रेमकाव्य अभ्यासणाऱ्या आणि कौटुंबिक रूढींच्या काचाला कंटाळलेल्या तरुणांनी— या प्रणयाविष्काराचं आणि लेखकाच्या सौंदर्यप्रियतेचं स्वागत करावं हे स्वाभाविकच होतं.

या दोन्ही विशेषांच्या जोडीनं नव्या तऱ्हेचा सुंदर, बुद्धीला गुदगुल्या करणारा आणि 'सुदाम्याच्या पोह्यां'त सौंदर्यासह आपलें सामर्थ्य प्रकट करणारा कोल्हटकरांचा विनोद ही तर आबालवृद्धांना मिळालेली वाङ्मयीन मेजवानीच होती. त्या काळचा बहुतेक वाचकवर्ग पांढरपेशा, उच्च किंवा मध्यम-वर्गांतला आणि थोडा-फार सुखवस्तु होता. इंग्रजी साहित्य, चालीरीति, विचारपद्धति इत्यादिकांविषयीं कुतूहल उत्पन्न झालेल्या आणि नावीन्याला आसुसलेल्या या वाचकांना कोल्हटकरांच्या विनोदानं अंकित केलं. टीका-लेखनांतली त्यांची मार्मिक दृष्टि, मर्मभेदक शैली व विविध विषयांचा सखोल अभ्यास यांच्यामुळं नाटककार आणि विनोदी लेखक या नात्यानं निर्माण झालेल्या त्यांच्याविषयींच्या आदरांत अधिक भर पडत गेली.

कोल्हटकर आपल्या पिढीतल्या सुशिक्षितांचे अत्यंत आवडते लेखक कां झाले याच हे त्रोटक विवेचन झालं. लोकप्रिय होणाऱ्या बहुतेक लेखकांचं कर्तृत्व त्यांच्या काळाच्या चौकटींतच विलक्षण तेजानं चमकतं. त्या काळांतल्या रसिकतेच्या कांही विशिष्ट भुका असतात. वाचक-प्रेक्षकांच्या नावीन्याबाबत कांही

अपेक्षा असतात. त्या भुका तृप्त करूं शकणारा आणि त्या अपेक्षा पूर्ण करणारा लेखक त्या काळच्या रसिकांकडून डोक्यावर घेतला जातो. त्या लेखकाचं सारं कर्तृत्व आत्मसात् करून पुढच्या पिढीचं साहित्य वाटचाल करूं लागतं. त्यामुळं बराच काळ लोटून गेल्यावर या कर्तृत्वाची फुलं कोमेजून गेल्यासारखीं वाटणं स्वाभाविक आहे. कोल्हटकरांच्या बाबतीत थोडं-फार असंच घडलं आहे. मात्र या ठिकाणी एक गोष्ट अवश्य लक्षांत ठेवली पाहिजे. आपल्या काळाची कुंपणं ओलांडून पलीकडं उड्डाण करणारी, अप्सरेप्रमाणं चिरयौवनाचा लाभ झालेली आणि दशकंच्या दशकं किंवा शतकंच्या शतकं मागं पडली तरी पहिल्या-इतकीच टवटवीत वाटणारी ललितकृति फार क्वचित् आढळते. व्यास-वाल्मीकि किंवा गटे शेक्सपिअर असे मोजके ग्रंथकारच भविष्यकालावर अधिराज्य करूं शकतात; तेहि बहुधा निवडक वाङ्मयवेड्या रसिकांच्या मनांवर.

जातां जातां कोल्हटकरांच्या प्रतिभासामर्थ्याला मिळालेलं एक अनाहूत प्रशस्तिपत्र इथं नमूद करणं इष्ट होईल. या प्रशस्तिपत्राची कथा अशी आहे. इंग्लंडमध्यें उच्च अभ्यासाकरितां गेलेल्या एका प्राध्यापकांचा फॉस्टर या सुप्रसिद्ध कादंबरीकाराशीं परिचय झाला होता. ते तिथं असतांना परदेशी जाण्याची संधि मिळालेले एक मराठी कादंबरीकार आपल्या एका कादंबरीच्या इंग्रजी अनुवादासह इंग्लंडला गेले. प्राध्यापकांची आणि फॉस्टर यांची ओळख आहे हें लेखक-महाशयांना कळल्यावर फॉस्टरनी आपला अनुवाद वाचून पाहावा म्हणून प्राध्यापकांच्यामार्फत त्यांनीं तो पाठविला. पुढें प्राध्यापक फॉस्टरकडे गेले, तेव्हां अनुवाद परत करतांना फॉस्टरनीं ‘ मराठींत याच दर्जाचं लेखन होत असेल तर त्या भाषेतलं साहित्य फारसं प्रगत आहे असं मला वाटत नाहीं ’, अशा अर्थाचे उद्गार काढले. प्राध्यापकांच्या मनाला ते झोंबले. ते श्रीपाद कृष्णांचे मोठे चाहते होते. इतके कीं, इंग्लंडला जातांना त्यांनी अधूनमधून वाचण्याकरितां ‘ सुदाम्याचे पोहे ’ बरोबर घेतले होते. त्यांनी त्या पुस्तकांतला ‘ चोरांचं संमेलन ’ हा लेख अनुवादित केला. त्याचें पुनःपुन्हा संस्करण करून तो फॉस्टर यांना वाचायला दिला. फॉस्टर व प्राध्यापक यांची पुढे गांठ पडली. तेव्हां फॉस्टर या लेखावर इतके खूष झालेले दिसले कीं, ते आनंदानं उद्गारले, ‘ He is a genius. He belongs to the world. ’ ( हा लेखक मोठा प्रतिभाशाली आहे. हा केवळ तुमच्या मराठीचा लेखक नाही ! हा साऱ्या जगाचा लेखक आहे. )



कोल्हटकरांचं हे वाङ्मयीन स्थान लक्षांत घेतां त्यांचं आत्मवृत्त अनेक दृष्टींनी महत्त्वाचं ठरतं—त्यांच्या समकालीनांपैकीं केळकरांचा अपवाद वगळला

तर दुसऱ्या कुणाहि साहित्यिकानं कोणत्याहि प्रकारचं आत्मकथन केलेलं नाहीं. अशा आत्मकथनाच्या अभावी देवलांच्या मनांत शारदेंतल्या विविध पात्रांची गुफण कशी होत गेली याविषयी आपल्याला नुसते तर्कच करीत राहावं लागतं. हरिभाऊ, केशवसुत, खाडिलकर किंवा वैचारिक लेखन करणारे अन्य मोठे लेखक यांच्यापैकी बहुतेकांविषयीची आपली माहिती फार तुटपुंजी असते. व्यक्ति या नात्यानं हरिभाऊंच्याविषयी वाग्भट देशपांडे, वेणुताई पानसे व डॉ. भिंगारे यांच्या पुस्तकांतून पुष्कळ माहिती मिळते हें खरें. बा. मा. आंबेकरां-सारखे हरिभाऊंच्या बैठकीतले मित्र त्यांचा स्वभाव व व्यक्तित्व यांवर थोडा अधिक प्रकाश टाकतात. पण यमूसारख्या तरुणीच्या विविध भावनांशी तद्रूप होणारे, लहानपणी दंगेखोर असलेला भाऊ पुढं त्यागी समाजसेवक कसा बनतो हे बारकाव्यांनी सांगणारे, कॉलेजचा कायमचा निरोप घेणाऱ्या तरुण चंद्रशेखराच्या काव्यात्म मनाच्या तारा नाजूकपणे छेडणारे आणि सदाशिव पेठें-तल्या मध्यम वर्गातल्या हिंदु स्त्रीच्या दुःखाइतकंच ऐतिहासिक काळांतल्या मुसलमान मेहेरजानचं दुःख विलक्षण सामर्थ्यानं सांगणारे हरिभाऊ स्वतःच्या निर्मितीच्या अंतरंगाविषयी आपल्याशी कांही बोलू शकत नाहीत. केशवसुतां-सारख्या कवीचं छायाचित्र जिथं आपल्याला उपलब्ध होऊं शकत नाहीं, तिथं नानाविध भावनांनी भरलेल्या आणि विविध विचारांच्या कल्लोळांनीं प्रक्षुब्ध झालेल्या हरिभाऊंच्या अंतरगांतल्या सर्जनविषयक सर्व घडामोडी आपल्याला कोण सांगणार ?

त्या कालखंडाचा एक साक्षीदार या नात्यानं कोल्हटकरांचं आत्मवृत्त वाचनीय आहे. मात्र मुळांतच त्याला अनेक मर्यादा पडलेल्या आहेत. कोल्हटकर आत्मवृत्त लिहायला बसले ते प्रोफेसर मायदेवांच्या सूचनेवरून. मायदेव हिंग-ण्याला अभिनव काव्यमालेचा पहिला भाग मुलींना शिकवीत असतांना काव्याचा परिपूर्ण आस्वाद घेण्यासाठी कविचरित्रहि माहिती असणें इष्ट आहे असें त्यांना वाटलें. त्यांनी कोल्हटकरांच्याकडे त्यांच्या चरित्राची माहिती विचारली. मायदेवांना एक विस्तृत टिप्पण पाठवायचें म्हणून कोल्हटकरांनीं ते लिहायला सुरवात केली. पण लिहिता लिहितां भूतकाल त्यांच्यासमोर उलगडूं लागला. स्वतःविषयींचं लेखन म्हणजे जिवलग स्नेह्यांसोबत्यांशी सुख-दुःखांविषयीं चाललेलं संभाषणच असल्यामुळं विस्तृत टिप्पणाचं रूपांतर पुस्तकांत झालं. मात्र हें आत्मवृत्त दीडशें पृष्ठांचं असलं तरी त्यांत रसिक वाचकांच्या दृष्टीनें महत्त्वाच्या अशा अनेक गोष्टींविषयी नुसत्या उल्लेखाखेरीज अधिक माहिती मिळणार नाही. कलावंताविषयी त्यांच्या चाहत्यांच्या मनांत नाना प्रकारची कुतूहलं असतात. साहित्यिकाला लेखनाची पहिली कल्पना कशी सुचते, ती त्याच्या मनामध्ये कशी फुलत जाते, तो केव्हां लिहितो, कसा लिहितो,

मनांत फुललेल्या कल्पनेचा सारा सुगंध कागदावर शब्दबद्ध करतांना त्याला कोणकोणत्या अडचणी येतात, जे मनांत असतं तें कागदावर संपूर्णपणें उतरतं का, त्याच्या प्रतिभेचं पोषण कोणकोणत्या गोष्टीमुळं होतं, त्यांत एखाद्या व्यसनाची गणना होते का, त्याचं वाचन कोणत्या प्रकारचं असतं, तें तो कोणत्या वेळी करतो, त्याची स्वभावचित्रें प्रत्यक्षांतल्या माणसांवरून घेतलेलीं असतात काय, अशा एक ना दोन शेकडों गोष्टींविषयी वाचकाला विलक्षण उत्सुकता वाटत असते.

ही उत्सुकता या आत्मवृत्तानें पूर्णपणें तृप्त होते असं म्हणतां येणार नाही. त्याचं त्रोटक स्वरूप हें असं घडण्याच एक कारण आहे. 'चोरांचं संमेलन' या लेखाची कल्पना कोल्हटकरांना कशी सुचली, 'मूकनायकां'तल्या कथावस्तूचा त्यांच्या मनांत असा विकास झाला, जन्मरहस्य हें जें त्यांचे सर्वांत अधिक बंदिस्त असं नाटक, त्याची रचना पूर्वींच्या नाटकांपेक्षां निराळी कशी झाली, इब्सेन वाचल्याचा हा परिणाम असूं शकेल काय, वगैरे गोष्टींविषयी चाहत्यांना जिज्ञासा असणें स्वाभाविक आहे. पण त्यांचं समाधान व्हावं अशा विस्तारानं अथवा मोकळेपणानं हें आत्मवृत्त लिहिलं गेलं नाहीं. त्यामुळं चहा चांगला झाला असावा, पण त्याचे कांही घोटच प्यायला मिळावेत, तसं हें पुस्तक आजच्या वाचकांना वाटण्याचा संभव आहे.

असं होण्याला कोल्हटकरांचा संकोची स्वभाव हेहि एक कारण आहे. या पुस्तकांतच 'स्वस्तुति आणि परनिंदा यांविषयी मला तिटकारा आहे' अशा अर्थाचे उद्गार त्यांनी काढले आहेत. आपल्या डंका-नौबती आपणच वाजवून लोकांचं लक्ष वेधून घ्यावं किंवा आत्मचरित्र म्हणजे स्वतःच्या आयुष्यांतल्या बऱ्या-वाईट गोष्टींचं प्रदर्शन आणि समर्थन करण्याकरितां मिळालेलं मोकळं मैदान अशा समजुतीनं आत्मकथन करण्याचा प्रघात आपल्याकडे पडत आहे. अशी आत्मचरित्रें चविष्टपणानें वाचणाऱ्या वाचकांना कोल्हटकरांच्या आत्मवृत्तांतला त्रुटितपणा व कोरडेपणा अळणी वाटेल हें उघड आहे. पण जीवन व वाङ्मय या दोन्ही बाबतीतल्या कोल्हटकरांच्या औचित्यविषयक कल्पना फार तीव्र होत्या. न्यायमूर्ती रानड्यांनी प्रवर्तित केलेला नेमस्तपणाचा आदर्श सर्वच गोष्टींत त्यांच्या रोमरोमांत भिनला होता. स्वच्छंद विनोदी वृत्ति व औचित्याच्या काटेकोर कल्पना या दोन्ही गोष्टी त्यांच्या ठिकाणीं एकत्र नांदत होत्या. मूलतःच ते भिडस्त स्वभावाचे त्यांतहि आपण स्वतःविषयीच्या माहितीचें एक टिप्पण करून देत आहोत अशा समजुतीनं आरंभलेलं हें लेखन. त्यामुळं एके काळीं अनेक संगीत नाटक मंडळ्या ज्या 'मूकनायक' नाटकानं आपल्या कुठल्याहि मुक्कामाची सुरवात करीत, त्याच्या लोकप्रियतेविषयी किंवा

किर्लोस्कर संगीत मंडळीला 'मूकनायक' लावावे म्हणून कॉलेजच्या विद्यार्थ्यांचीं जीं पत्रं येत असत त्यांच्याविषयीं या आत्मवृत्तांत चकार शब्द सांपडणार नाहीं. लेखकाच्या संकोची स्वभावामुळें वाचकांच्या दृष्टीनें ज्या गोष्टी सविस्तर सांगितल्या जायला हव्या होत्या, त्यांचाहि इथं संकोच झालेला आढळतो.

निरनिराळ्या नाटकांची कथानकं कशी सुचत गेलीं, तीं मनांत कशी फुलत राहिलीं, त्यांची मांडणी करतांना आपण कोणकोणता विचार केला, अशा साहित्यनिर्मितीवर प्रकाश टाकणाऱ्या गोष्टीचा या आत्मवृत्तांत जसा उल्लेख नाहीं, तसाच 'सुदाम्याचे पोहे' या त्यांना साहित्याच्या इतिहासांत अविस्मरणीय स्थान देणाऱ्या विनोदी लेखमालेसंबंधींहि फारसा ऊहापोह नाही. पृ. ४० पासून पुढें आपण विनोदी लेख लिहायला कां प्रवृत्त झालों, एकामागून एक लेख कसे लिहिले, ते कुठं कुठं छापून आले, त्या वेळच्या वाचकवर्गांत पुराणमताभिमानी वाचकांचा भरणा असल्यामुळे त्या त्या लेखाला कोणत्या प्रकारचं शेलापागोटं मिळालं इत्यादि माहितीवर भर दिला गेला आहे. पण सामाजिक टीकेचं एक साधन म्हणून लिहिलेले विनोदी लेख आणि शुद्ध विनोदी लेख या दोन्हींच्या उगमांत कोणत्या प्रकारची भिन्नता आहे, व्यक्तिमत्त्वाच्या कोणकोणत्या घटकांतून ते निर्माण झाले, या किंवा अशा गोष्टींविषयीं या आत्मवृत्तांत पुष्कळशी मुग्धताच पाळलेली आढळेल. तयार झालेली यंत्रं पाहणं निराळं. आणि ती यंत्रं जिथं तयार होतात त्या कारखान्यांत जाऊन त्यांचे निरानिराळे भाग कसे केले जातात, कसे जोडले जातात हें पाहणं निराळं. लेखकाच्या निर्मितीच्या मागं जे अनेक चित्रविचित्र अनुभव असतात, जी कलाकुसर किंवा तपश्चर्या असते त्याच्याविषयी अधिक ज्ञान करून घेण्याला रसिक नेहमींच उत्सुक असतात. पण ते कुतूहल तृप्त होण्याइतकी माहिती या आत्मवृत्तांत मिळत नाही.

अशा प्रकारच्या अनेक मर्यादा या आत्मकथनाला पडल्या असल्या तरी कोल्हटकरांच्या सरळ आणि संयमी व्यक्तिमत्त्वाचा व त्यांच्या सत्यप्रियतेचा प्रत्यय या पुस्तकांत अनेक ठिकाणी येतो. या लेखनांत ते कुठेंहि विनोदी कल्पनेचा अवास्तव विस्तार करीत बसत नाहीत; मात्र जातां जातां सहज गुदगुल्या करणारा विनोद साधतात. उदाहरणार्थ विद्यार्थिदशेंतील डेक्कन कॉलेजांतली पुढील आठवण अवश्य वाचावी—'ऑक्झनहॅमसाहेब एल्फिन्स्टन कॉलेजचे प्रिन्सिपॉल होऊन गेले. त्या प्रसंगी त्यांच्या सन्मानार्थ मी व नानल यांनीं कांही पदें केली होतीं. ती मी म्हणून दाखविली. ती ऐकून ऑक्झनहॅमसाहेबांच्या पत्नी इतक्या खूष झाल्या कीं, ती पदें भाषांतरासह त्यांजकडे

पाठविण्याची त्यांनीं मला विनंती केली व ती मी मान्यहि केली. परंतु भाषांतर करतेवेळीं एक मोठी अडचण आली. मंगलाचरणांत ( बहुधा अखेरच्या शुभ-चिंतनपर पदांतहि ) गजाननाची ' वक्रतुंड ', ' लंबोदर ' अशासारखी स्तुतिपर विशेषणं पडलीं होतीं त्यांचीं ' ओ क्रुकेड फेसेड वन् ' 'ओ ! बिग बेलीड वन्' अशी मासलेवाईक भाषांतरें करून तीं मड्डमसाहेबांस नजर करणें जीवावर आलें व वचनभंगाचा दोष पदरीं घ्यावा लागला. असंच दुसरं उदाहरण—ठाण्याच्या ग्रंथ-संग्रहालयाच्या वार्षिक उत्सवाचे अध्यक्ष म्हणून कोल्हटकरांनी भाषणाचा जो प्रारंभ केला तो असा—' विशिष्ट स्थानांचीं विशेष गोष्टींविषयीं प्रसिद्धि असते. ' मग पुणें, नागपूर, वाई वगैरे गावांचीं उदाहरणें देऊन ते पुढं म्हणाले ' ठाणें हे ग्रंथांच्या व वेड्यांच्या संग्रहालयांसाठी प्रसिद्ध आहे. '

हें आत्मवृत्त थोडं-फार त्रोटक असलं तरी त्यांतल्या माहितींत काटेकोर सत्य असावं ही दक्षता कोल्हटकरांनीं आपल्या स्वभावानुसार घेतली आहे. त्यामुळें स्वतःचं शारीरिक व्यंग असो, वक्तृत्वांत आपली फारशी गति नसल्याची कबुली असो, शिष्य व मित्र म्हणून अगदीं जवळ आलेल्या गुर्जरांसारख्या साहित्यिकाशीं निर्माण झालेला दुरावा असो किंवा आपल्या भावजीवनांत प्रवेश केलेल्या हिराबाई पेडणेकरांसारख्या कलावतीची हकीगत असो, या सर्व गोष्टींविषयीं कोल्हटकर मोजकंच लिहीत असले तरी ते वाचकां-पासून कांहीं लपवून ठेवीत आहेत असं वाटत नाहीं. अप्रिय सत्यावर भरजरी पांघरूण घालण्याचा किंवा त्याचा करडा रंग गुलाबी करण्याचा या दीडशें पृष्ठांत लेखकानं कुठंहि प्रयत्न केलेला नाहीं. " मी जसा दिसतों तसं माझं चित्र काढ " असं क्रॉम्वेलनं चित्रकाराला सांगितलं होतं. कोल्हटकरहि असंच स्वतःचं यथार्थ चित्र काढण्याचा प्रयत्न करतात. पण मूळच्या संकोची वृत्तीमुळें या प्रयत्नांत नकळत ते आपली प्रतिमा अधिक सामान्य करून दाखवीत आहेत, असं वाटल्यावांचून राहात नाही. स्पर्धेपासून दूर राहण्याची प्रवृत्ति आणि आत्मपूजेविषयी वाटणारा तिटकारा या कोल्हटकरांच्या स्वभावविशेषामुळं अनेक साहित्यिकांच्या आत्मचरित्रांना जो अहंकाराचा वास येतो त्याचा आढळ इथं होत नाहीं. मात्र अनेकदां असं वाटतं की, आत्मकेंद्रित बौद्धिक जीवन आणि अत्यंत संकोची स्वभाव यामुळं आत्मविश्वासाचा अभाव हा कोल्हटकरांचा स्थायीभावच बनून गेला असावा.

देवल, केळकर, खाडिलकर, गुर्जर, गडकरी इत्यादि साहित्यिकांच्या कोल्हटकरांशीं आलेल्या संबंधांचे निर्देश या आत्मवृत्तांत आहेत. कांहीं त्रोटक, कांहीं विस्तृत. देवल, गुर्जर व गडकरी यांच्याविषयीं कोल्हटकरांनीं जें लिहिलं आहे त्यावरून कलावंत किंवा प्रतिभावंत हीं शेवटीं माणसंच असतात आणि

त्यांच्या ठिकाणींहि राग, लोभ, मोह, मत्सर इत्यादि मनोविकार प्रबळ असतात, हें उघड होतं; नाटक मंडळींतले हेवेदावे, व नव्या नाटकाविषयींची राजकारणें इत्यादि अनेक गोष्टी त्यामुळेंच उद्‌भवतात.

हिराबाई पेडणेकराच्या स्नेहसंबंधाविषयी कोल्हटकरांनीं जें लिहिलं आहे तें अनेक दृष्टीनी महत्त्वाचें आहे. माडखोलकर व म. ल. वऱ्हाडपांडे यांनी याविषयी स्फुटलेखन ( ' गणिकामैत्री '—श्रीपाद कृष्ण कोल्हटकर व्यक्तिदर्शन ग. त्र्यं. माडखोलकर ) व ग्रंथलेखन ( कोल्हटकर आणि हिराबाई : म. ल. वऱ्हाडपांडे ) करून आजच्या वाचकवर्गाचं कुतूहल मोठ्या प्रमाणांत जागृत केलं आहे. स्त्री-पुरुषांच्या स्नेहसंबंधांविषयी पन्नास वर्षांपूर्वीं बोलतांना किंवा लिहितांना फार सोवळेपणा पाळला जात असे. तो काळ आतां बदलला आहे. प्रत्येक सोवळी गोष्ट ओवळी कशी करतां येईल, कुणी बुरखा घेतला असेल तर तो कसा फाडून टाकतां येईल, कुणाकुणाचे मुखवटे कसकसे दूर करतां येतील हें पाहण्याचा आणि व्यक्तींच्या काय किंवा मूल्यांच्या काय मूर्तिभंजनानं अंतिम सत्य हाती लागतं असं गृहीत धरण्याचा हा जमाना आहे. पाश्चात्त्य देशांत पहिल्या महायुद्धानंतर आणि आपल्याकडं दुसऱ्या महायुद्धानंतर तो सुरू झाला.

जीवनांत सर्वत्र उद्‌ध्वस्त होत असलेल्या श्रद्धांची प्रतिबिंब साहित्य आणि साहित्यिक यांच्याविषयीच्या चर्चेत पडावीत यांत कांहीं नवल नाही. आजकाल वास्तवदर्शनाच्या नावाखाली हें सारं खपून जातं, किंबहुना मिटक्या मारीत वाचलं जातं. कादंबऱ्यांत स्त्री-पुरुषांचा अनैतिक संबंध सूचित करण्याकरितां ' खोलीला आंतून कडी लावली गेली ' एवढाच उल्लेख पूर्वीं पुरा होत असे. पण आतां आत्मकथा लिहितांना वैवाहिक जीवनाचं भावनात्मक किंवा चिंतनात्मक चित्रण करण्यापेक्षां पहिल्या रात्रीच्या शरीरसंबधापासून अनेक नाजूक गोष्टींविषयी कोणताहि आडपडदा न ठेवतां लिहिण्याची प्रथा पडू पाहात आहे. अशा काळांत ' कोल्हटकर आणि हिराबाई ' यांच्या स्नेहसंबंधाच निश्चित स्वरूप काय होतं, याविषयीं ग्रंथ निर्माण झाले नसते तरच नवल !

कोल्हटकरांनी आपल्या स्वभावाला अनुसरून आत्मवृत्तांत याविषयीं लिहिलं आहे. हे स्नेहसबंध फार घनिष्ठ असावेत हें सिद्ध करण्याकरितां त्यांच्या आत्मवृत्तांतल्या एका विधानाचा सतत उपयोग केला जातो. तें विधान असें : ' माझे विद्यालयीन स्नेही रघुनाथ शंकर रानडे यांचे सौंदर्य मी बरेच दिवस नाटकरचनाप्रसंगी आदर्श म्हणून समोर ठेवीत होतों. हिराबाईशी परिचय झाल्यापासून एका बुद्धिमान स्त्रीच्या सौंदर्याचा आणि विभ्रमाचा एक बराच चांगला आदर्श मिळाल्यासारखं होऊन माझ्या सौंदर्याभिरुचीचं पोषण

होऊं लागलं. त्याचा परिणाम माझ्या पुढील कृतींवर दिसूं लागला. माझ्या नायिकांकडे विशेष बारकाईनें पाहिल्यास १९०६ सालाच्यापूर्वीं जन्म पावलेल्या नायिकांपेक्षां त्या नंतर उदयास आलेल्या नायिका अधिक स्वाभाविक दिसून येतील. याचं कारण पूर्वोक्त नायिका रेखाटण्याच्या वेळीं मला केवळ कल्पनेचाच, आधार असे; व उत्तरोक्त नायिका रंगविण्याचे प्रसंगी कल्पनेस अनुभवाचें पाठबळ असे हें होय. '

कोल्हटकरांच्या विधानाचा विचार करतांना निर्मितिप्रेरणेच्या ( Creative urge ) मागची कल्पनांची व भावनांची सर्व गुंतागुंत लेखकालासुद्धां पूर्णपणें कळत नाहीं, ही गोष्ट प्रथम लक्षांत ठेवली पाहिजे. कोल्हटकरांच्या १९०६ नंतरच्या विशेष महत्त्वाच्या नायिका इंदिरा ( प्रेमशोधन ), त्रिवेणी ( वधूपरीक्षा ) व कांता ( जन्मरहस्य ) या होत. १९१५-२० च्या सुमाराला महाराष्ट्रांत तुरळकपणें दिसूं लागलेल्या धीट, शिक्षित व काव्यप्रेमी तरुणींचें कांता हे रेखाचित्र आहे. या चित्रणाचा संबंध हिराबाईंशीं पोंचविण्यापेक्षां कांतेची उत्तरा ( रागिणी ) आणि लतिका यांच्याशी तुलना करणेंच इष्ट होईल. उरल्या दोन नायिका—इंदिरा व त्रिवेणी—या शालिनी ( वीरतनय ), सरोजिनी ( मूकनायक ), सौदामिनी ( गुप्तमंजूष ) व सरस्वती ( मतिविकार ) यांच्यापेक्षां अधिक प्रेमळ व विचारी वाटतात; पण शालिनी व सरोजिनी या कोल्हटकरांच्या पंचविशीतिशीतल्या कल्पनारम्यतेनं नटलेल्या आहेत. त्यांच्या मानानें इंदिरा व त्रिवेणी या त्यांच्या चाळिशींतल्या नायिका अधिक परिपक्व वाटणें स्वाभाविक आहे. हिराबाईसारख्या कलावतीच्या स्नेहसंबंधांत त्यांना स्त्रीच्या बुद्धिमत्तेचं व प्रेमळपणाचं जें दर्शन झालं असेल तें या नायिकांच्या निर्मितीला कारणीभूत झालं नसेल असं नाहीं. पण कोल्हटकरांचं हे विधान वाङ्मयनिर्मितीच्या दृष्टीनें शंभर टक्के बरोबर आहे असं गृहीत धरण धाडसाचं होईल.

एखाद्या स्त्रीचं सौंदर्य किंवा विभ्रम यांचा चित्रकाराला कलानिर्मितीच्या दृष्टीनें जेवढा उपयोग होईल तेवढा नाटककाराला होणं कठीण आहे. कादंबरीकाराला स्त्रीच्या सौंदर्याची किंवा विभ्रमाची सविस्तर वर्णनं करण्याची मुभा असते. बिचाऱ्या नाटककाराला तोहि मार्ग बंद असतो. शिवाय वाङ्मयदृष्ट्या एक महत्त्वाचा प्रश्न यांत गुंतला आहे तो हा की, ललित लेखक जी विविध पात्रनिर्मिति करतो तिचा वास्तवाशी कितीसा संबंध असतो ? तो कोणत्या प्रकारचा असतो ? 'शारदे'सारखं प्रत्यक्ष घडलेल्या घटनेवरून सुचलेलं नाटक उदाहरणादाखल घेऊं या. या नाटकांतली कथावस्तुच नव्हे, तर पात्रेहि लेखकानं वास्तवांतून उचललेली असावीत, हा तर्क निराधार नाहीं. असं असूनहि ती वास्तवाची प्रतिबिंब नाहीत. शारदेतील भद्रेश्वर, कांचनभट

व भुजंगनाथ ह्या देवलांना ठाऊक असलेल्या माणसांच्या जशाच्या तशा प्रतिमा नाहींत. कथानकाचा विकास, त्याचा आशय त्याची मांडणी, विशिष्ट प्रतिभागुण आणि लेखकाला सांगायचें असलेलें सत्य या सर्वांच्या विविध प्रतिक्रियांनीं त्या संस्कारित झाल्या आहेत; बदलल्या आहेत. एका घाटदार कलाकृतींत त्या योग्य रीतीनं बसाव्यात, शोभाव्यात अशा रीतीनं त्या घडविल्या गेल्या आहेत. कोदंड हें पात्र एका बाजूनं लेखकाचं स्वप्नरंजन, तर दुसऱ्या बाजूनं त्याचं नाट्यचातुर्य आहे. वास्तवाचा फार मोठा आधार असलेल्या नाटकाची जर ही स्थिति, तर मुख्यतः कल्पनारम्यतेच्या परिसरांतच फुलणाऱ्या कोल्हटकरांच्या नाटकांतल्या पात्रांचे संबंध वास्तवांतल्या व्यक्तींशीं भिडवणं कितपत सयुक्तिक होईल ? असें तर्कपांडित्य प्रदर्शनाच्या दृष्टीनें ठीक आहे. पण साहित्य-निर्मितीच्या प्रक्रियेवर त्यामुळं फारसा प्रकाश पडतो असं वाटत नाहीं.

कोल्हटकर व हिराबाई यांचे स्नेहसंबंध कोणत्या प्रकारचे होते हा साहित्याच्या मूल्यमापनाच्या दृष्टीनें एक गौण प्रश्न ठरेल. याविषयीं कोल्हट-करांनीं मोजक्या शब्दांत जें सांगणं आवश्यक वाटलं तें सांगितलं आहे, त्याचे कमी-अधिक अर्थ लावणें हे स्त्री-पुरुषांमधल्या आकर्षणाच्या विविध प्रकारांकडं आपण कोणत्या दृष्टिकोनांतून पाहतो यावर अवलंबून राहील. अशा बाबतीत आपण अलीकडे मोकळेपणाने लिहूं बोलूं लागलों असलों तरी विशुद्ध स्नेह-भावनेपासून प्रक्षुब्ध कामवासनेपर्यंत हे आकर्षण किती निरनिराळीं रूपं धारण करतं, याचा आम्हीं अजून नीट विचार केलेला नाहीं. कोल्हटकरांच्यासारख्या सौंदर्यलुब्ध लेखकाच्या दृष्टीनें तत्कालीन कौटुंबिक जीवन बरंचस नीरस होतं. त्या काळीं विवाहित स्त्री-पुरुषांचा संसार लौकिकदृष्ट्या ठीक चालत असे—पण पुरुषाच्या बौद्धिक, कलात्मक किंवा ध्येयात्मक पातळीवर त्याच्याशीं सुसंवाद साधणं त्या काळांतल्या पत्नीला शक्य नसे. यांत तिचा बिचारीचा कांहीं दोष नव्हता. चूल आणि मूल या दोन चक्रांवर तिचा संसारशकट शतकानुशतकं एका चाकोरींतून चालत आला होता. घराचा उंबरठा ही तिच्या दृष्टीनं लक्ष्मणरेषा होती. र ट फ करून पोथ्या-पुराणं वाचता येणं ही पांढरपेशा स्त्रीच्या शिक्षणाची परिसीमा होती. ती सुग्रण असे, व्यवहारदक्ष असे; पण नव्या शिक्षणानं आणि इंग्रजी साहित्याच्या परिशीलनानं पतीच्या ज्या बौद्धिक आणि कलात्मक भुका जागृत केल्या जात होत्या, त्या भागविण्याला ती सर्वस्वीं असमर्थ होती. ज्यांच्या अशा भुका स्वभावतः तीव्रतर असतात अशी मंडळी साहित्यिकांत आणि कलाकारांत अधिक असावीत हें स्वाभाविक आहे. त्यामुळें हिराबाई-सारख्या गाननिपुण आणि साहित्यप्रेमी कलावतीच्या सहवासांत कोल्हटकरां-च्या सौंदर्यलुब्ध मनाला फुलविणारं असं कांहीं मिळालं असेल हें उघड आहे.

त्या दृष्टीनंच त्यांनीं आपल्या आत्मवृत्तांत हिराबाईच्या हकीगतीला स्थान दिलें आहे. सत्याचा अपलाप होऊं नये म्हणून !

कोल्हटकर व हिराबाई यांच्या स्नेहसंबंधाच्या संशोधनांत रस घेणाऱ्यांनीं या आत्मवृत्तांतल्या अशाच दुसऱ्या कांहीं गोष्टींकडे कां दुर्लक्ष करावें हें समजत नाहीं. गडकऱ्यांविषयी लिहिताना कोल्हटकरांनीं माझी त्यांची गांठ पडली तेव्हां ते अगदीं वेडे होण्याच्या स्थितीला पोंचले होते, असा उल्लेख केला आहे. ते पुढं म्हणतात ' मी बार्शीला जाण्यापूर्वीं पुण्यास असतांना गडकरी माझी भेट घेण्याचा प्रयत्न करीत होते. मी संध्याकाळीं बहुधा बुधवारांतील पंपूशेट ( मुजुमदारांचे स्नेही व किर्लोस्कर कंपनीचे हितचिंतक ) या गंध्यांच्या दुकानीं बसत असे. म्हणून ते मला पाहण्याला त्या दुकानापासून कांहीं अंतरावर येऊन उभे राहात. परंतु त्यांची माझी दृष्टादृष्ट मी बार्शीला जाईपर्यन्त झाली नाहीं. त्या सुमारास त्यांना कांहीं कारणामुळं वैराग्य उत्पन्न झालं असून ते वेडे होण्याच्या मार्गाला लागले होते. परंतु माझ्या लेखांनीं त्यांच्या मनाला खाद्य पुरवून त्यांचं वेडापासून रक्षण केलं, असं ते पुढं पुढं म्हणत असत. ' संशोधकांनीं हा विषय जरूर हातीं घ्यावा.

' निबंधमाला ' ही अर्वाचीन मराठी वाङ्मयाची गंगोत्री. तिच्या जन्माला लवकरच शंभर वर्षे पूर्ण होतील. या शतकाच्या पूर्वार्धात मराठी साहित्याला आशय आणि अभिव्यक्ति या दोन्ही दृष्टींनीं ज्यांनीं सुंदर व समर्थ वळण लावलं अशा मोजक्या साहित्यश्रेष्ठींत श्रीपाद कृष्णांचं स्थान आहे. ' सुदाम्याचे पोहे ' हा त्यांचा विनोदी लेख-संग्रह भावी पिढ्यांनाहि अभिजात आनंद देत राहील. मराठीतल्या जामदारखान्यांतला एक अमोल रत्नहार म्हणून रसिक त्याच्याकडं पाहात राहतील.

पण केवळ विनोदकार म्हणून नव्हे, तर टीकाकार आणि नाटककार या नात्यांनींहि भविष्यकाल त्यांच्याकडे आदरयुक्त कुतूहलानं वळेल. बुद्धिमत्ता, कल्पकता, विनोदगर्भता, चिकित्सकता आणि सौंदर्यलुब्धता या गुणांचा दुर्मिळ संगम श्रीपाद कृष्णांच्या लेखनांत झाला आहे. त्यांच्या साहित्यापासून प्रेरणा घेऊन पुढल्या दोन पिढ्यांतल्या अनेक लेखकांनीं अविस्मरणीय साहित्यसेवा केली आहे. अशा श्रेष्ठ लेखकाचा पुनर्मूल्यमापनाच्या दृष्टीनें अभ्यास होणं आवश्यक असतं. असा अभ्यास साहित्याच्या विकासाला फार उपकारक ठरतो. या अभ्यासाच्या कामीं श्रीपाद कृष्णांच्या ललित व टीकात्मक वाङ्मयाप्रमाणं हें आत्मवृत्तहि उपयुक्त होईल.

कोल्हापूर<br>१-५-७१

**वि. स. खांडेकर**

# संपादकीय निवेदन

गुरुवर्य कै. श्रीपाद कृष्ण कोल्हटकर यांच्या जन्मशताब्दीच्या प्रसंगीं त्यांच्या ‘ आत्मवृत्ता ’ची ही दुसरी आवृत्ति, त्यांचा पत्रव्यवहार व त्यांच्या आठवणी या पूरक साहित्यासह प्रसिद्ध होत आहे, याबद्दल आनंद वाटतो. मराठी वाङ्मयाच्या अभ्यासकांना व सामान्य वाचकांनाहि ही नवी आवृत्ति महत्त्वपूर्ण व संग्राह्य वाटेल अशी आशा आहे. ही दुसरी आवृत्ति पहिल्या आवृत्तीनंतर ३६ वर्षांनीं प्रकाशित होत आहे.

कै. कोल्हटकरांनी हें ‘ आत्मवृत्त ’ १९१८ सालीं महिला विद्यापीठांतील विद्यार्थिनींना स्वतःचा अल्प परिचय करून देण्यासाठीं लिहावयास घेतलें, पण लिहितां लिहितां त्या संक्षिप्त चरित्राचें मोठ्या चरित्रांत रूपांतर झालें. या आत्मवृत्ताचें उद्दिष्ट कोल्हटकरांनीं आपल्या ‘ चार प्रास्ताविक शब्दां ’त व श्री. मोटे यांना ता. १७–१–२५ रोजीं लिहिलेल्या पत्रांत ग्रथित केलें आहे. ( पृ. १४१ ). त्यावरून या चरित्रांत लिहिलेल्या गोष्टींचा संबंध विशेषेंकरून लेखकाच्या ग्रंथकर्तृत्वाशींच आहे. मूळ उद्देशांत नकळत बदल होत गेल्यामुळें त्यांत प्रमाणशीरपणा नाहीं, हें कोल्हटकरांनीं स्वतःच निवेदन केलें आहे. आणि त्यामुळेंच बहुधा तें जुजबी व टांचणवजा झालें असावें.

कोल्हटकरांनीं हें आत्मवृत्त लिहिल्यानंतर ‘ विविधज्ञानविस्तार ’ कर्ते कै. मोरमकर यांच्या नजरेस तें आलें व त्यांनीं त्यांत कांहीं सुधारणा व दुरुस्त्या सुचवून तें आपल्या ‘ विविधज्ञानविस्तार ’ मासिकांत प्रसिद्ध करण्याचें योजिलें होतें. पण आपल्या हयातींत तें प्रसिद्ध करण्यास कोल्हटकरांनीं नकार दिला. इतकेंच नव्हे तर ‘ माझ्या मृत्यूनंतर तें २० वर्षांनीं प्रसिद्ध करण्यांत यावें ’, असें त्यांनीं आपल्या निकटवर्तीयांना निक्षून सांगितलें होतें. ( कोल्हटकर व्यक्तिदर्शन – ग. त्र्यं. माडखोलकर ). म्हणूनच बहुधा त्यांच्या मृत्युपत्रांत त्याचा उल्लेखहि करण्यांत आलेला नसावा. या आत्मवृत्ताबद्दल अनेकांचें प्रतिकूल मत झालें होतें व तें प्रसिद्ध करण्यांत येऊं नये असें त्यांचे म्हणणें होतें. तरी देखील हें ‘ आत्मवृत्त ’ कोल्हटकरांच्या देहावसानानंतर एक वर्षांतच प्रसिद्ध झालें ! तें प्रसिद्ध होतांच त्याच्यावर मोठें वादळ उठलें. तेव्हां कोल्हटकरांचे कनिष्ठ बंधु कै. दिगंबर कृष्ण कोल्हटकर यांनीं या प्रकरणीं सर्व जबाबदारी स्वतःवर घेऊन ‘ प्रतिभा ’ पाक्षिकांत पुढीलप्रमाणें खुलासा केला : “ कै. श्री. कृ. कोल्हटकर यांचें आत्मवृत्त कोणीं प्रसिद्ध केलें व प्रसिद्ध करतांना मूळ हस्तलिखितांतला कांही भाग, कांहीं व्यक्तींच्या प्रेरणेनें, गाळला गेला व कांहीं भाग छापला गेला, याबद्दल बराच गैरसमज पसरविण्यांत आलेला

दिसतो. कै. कोल्हटकरांच्या मृत्युपत्रान्वयें 'आत्मवृत्त' हें त्यांच्या चिरंजीवांपैकीं एकास दिलेलें आहे. मात्र तें प्रसिद्ध करतांना, त्यांतले कांही भाग गाळावेत की काय, गाळावे असें वाटल्यास कोणते गाळावेत, हें ठरविण्याची सर्व जबाबदारी मी माझ्यावरच घेतली होती. त्याच्याशी कै. कोल्हटकरांच्या कोणत्याहि शिष्याचा अगर दुसऱ्या कोणाचाहि संबंध नाही." हा खुलासा 'प्रतिभे'च्या २६ जुलै १९३५ या अंकांत प्रसिद्ध झाला आहे.

श्री. ह. वि. मोटे यांना १९२५ सालीं कोल्हटकरांचें जें 'आत्मवृत्त' प्रसिद्ध करावयास मिळालें नाहीं तें त्यांना कोल्हटकरांच्या निधनानंतर १९३५ सालीं उपलब्ध झालें. हें आत्मवृत्त त्यांनीं आपल्या 'प्रतिभा' पाक्षिकांत ४ जानेवारी १९३५ पासून क्रमशः छापलें व ता. १ जून १९३५ रोजी कोल्हटकरांच्या पहिल्या श्राद्धतिथीला पुस्तकरूपानें प्रसिद्ध केले. श्रीपाद कृष्णांच्या या आत्मवृत्तावर त्या काळीं संबंधितांकडून बरीच टीका झाली. ह्या पुस्तकाविषयीं जरी अनेक मतमतांतरें असलीं तरी तें वाचनीय, संग्राह्य व अभ्यसनीय आहे यांत शंका नाहीं. तसेंच तें प्रांजल असून प्रामाणिकपणें लिहिलेलें आहे. 'हें आत्मवृत्त कोल्हटकरांच्या सत्यनिष्ठेचें मूर्तिमंत उदाहरण आहे', असें श्री. माडखोलकर म्हणतात.

कोल्हटकरांचें हें 'आत्मवृत्त' लौकिक, व्यावहारिक किंवा साहित्यिक अर्थानें संपूर्ण आत्मचरित्र नाही. तें विशिष्ट कालखंडापुरतें जसें मर्यादित आहे त्याप्रमाणे तें विशिष्ट विषयांनाच स्पर्श करणारें आहे. तें सर्वांगीण आत्मचरित्र नाहीं. तें साहित्यिकाचें आत्मचरित्र नाहीं, तें एका नाटककर्त्याचें आत्मकथन आहे. नाटककार या नात्यानें कोल्हटकरांना जे विविध अनुभव आले त्यांचें चित्रण मुख्यतः या आत्मवृत्तांत आहे.

चरित्रसाहित्य या दृष्टीनें 'आत्मवृत्ता'चें मूल्यमापन केलें तर तें निराशाजनक वाटण्याचा संभव आहे, हें कोणालाहि नाकारतां येणार नाही. आत्मचरित्र या नात्यानें तें शिथिल आहे, आठवणीवजा आहे. आत्मवृत्ताचे जे दोन मुख्य प्रकार आहेत त्यांत तटस्थ वृत्तीनें केलेलें आत्मनिरपेक्ष व प्रांजल आत्मनिवेदन हा प्रकार व स्वतःचे अनुभव, आठवणी व तत्कालीन परिस्थिति यांचें चित्रण हा दुसरा प्रकार. कोल्हटकरांचें आत्मवृत्त हें दुसऱ्या प्रकारांत मोडेल. आत्मचरित्र हें जसे आत्मलक्षी व आत्मकथनात्मक असलें पाहिजे तसें तें अंतर्मुख असणें जरूर आहे. लेखकानें स्वतःचें चरित्र तटस्थ वृत्तीनें पण प्रांजळपणें आणि प्रामाणिकपणें कथन केलें पाहिजे. त्यांत त्याच्या आयुष्याचा जमाखर्च ताळेबंदासह मांडला गेला पाहिजे. त्यांत आत्मगौरवाची किंवा आत्मश्लाघेची भावना असतां कामा नये. 'मी मोठा कसा झालों' हें अनेक

आत्मचरित्राचें सूत्र असतें व आपला मोठेपणा फुगविण्यासाठी ते आत्मचारित्र-लेखक वर्तमानपत्रांतील कात्रणें व दुसऱ्यांनीं केलेल्या स्तुतिपर लिखाणांतील उतारे यांची भारूडभरती करून आपले ग्रंथ सजवीत असतात. ( ' माझें जीवन एक कादंबरी ', ' कऱ्हेचें पाणी ' इ. ). कांहीं आत्मचरित्रांतून समकालीन घडामोडींच्या इतिहासाची इतकी गर्दी असते कीं त्यांतून मूळ लेखकाला हुडकून काढणें कठीण जातें. सामाजिक किंवा राजकीय कार्यकर्त्यांच्या आत्मचरित्रांत त्यांनीं केलेल्या कार्याचा सविस्तर वृत्तान्त यावा अशी अपेक्षा असते. अशी पुस्तकें म्हणजे त्या त्या क्षेत्रांतील कार्यकर्त्यांनी जन्मभर केलेल्या कार्याचें इतिवृत्त किंवा अहवालच होय. ( आत्मवृत्त — महर्षि कर्वे, माझी जीवनयात्रा — अप्पा पटवर्धन, पथिक — गाडगीळ, माणूस जागा झाला — गोदावरी परुळेकर, माझ्या राजकीय आठवणी— देवगिरीकर इ. ). कांहीं आत्मचरित्रें आत्मसमर्थनाच्या स्वरूपाचीं अगर कैफियतवजा असतात. तर कांहीं आत्मवृत्तांतून स्वतःबद्दल इतके लिहिलेलें आढळतें कीं ते लेखक जणू काय आपली आत्मगौरवाची अहंवृत्ति तृप्त करीत आहेत असें वाटतें. ( चरित्रचंद्र, माझी भूमिका इ. ). मात्र स्वतःच्या कष्टांबरोबरच दैवयोगानें मोठेपणा कसा मिळाला हें प्रांजळपणें निवेदन करणारीं आत्मचरित्रें फारच थोडीं आहेत. ( माझा जीवनविहार, जीवनसेतु, सांगत्ये ऐका इ. इ. ). भरपूर माहिती, सांगोपांग विवेचन व यथातथ्य निवेदन यायोगें संग्राह्य वाटणारीं व लक्षणीय ठरणारीं साहित्यिकांची जी थोडी आत्मचरित्रें मराठीत आहेत त्यांत स्मृतिचित्रें ( लक्ष्मीबाई टिळक ), चित्रपट ( माटे ), गतगोष्टी ( केळकर ), मी कसा झालों ( अत्रे ), जीवनकथा ( ना. गो. चापेकर ), कृष्णाकांठची माती ( कुलकर्णी ), दिवस असे होते ( घाटे ), आत्मचरित्र अर्थात् माझ्या आठवणी ( सावरकर ) इत्यादिकांचा नामनिर्देश करतां येईल. स्पष्टोक्तिपूर्ण सत्यकथन असलेलें औंधकर पंतप्रतिनिधींचें 'आत्मवृत्त' सामाजिक दृष्ट्या उल्लेखनीय आहे. 'कर्मफल' त्याच मासल्याचें वाटेल.

कोल्हटकरांचें ' आत्मवृत्त ' प्रसिद्ध झाल्यानंतर त्याचा नियतकालिकांकडून व साहित्यिक टीकाकारांकडून जसा व्यासंगपूर्वक परामर्श घ्यावयास पाहिजे होता तसा व तितका घेतला गेला नाहीं हें नमूद करणें आवश्यक वाटतें. अर्वाचीन मराठी वाङ्मयाच्या इतिहास ग्रंथांतूनहि ' आत्मवृत्ता 'चें परिश्रमपूर्वक व चिकित्सक दृष्टीनें कोणीं विशेषसें पर्यालोचन केलेलें आढळत नाही. तथापि अलीकडे कांहीं ग्रंथांतून त्याचा थोडाफार परामर्श घेतलेला दिसतो. आधुनिक मराठी वाङ्मयाचा इतिहास—भाग १ या ग्रंथांत डॉ. अ. ना. देशपांडे यांनी ' आत्मवृत्ता 'बद्दल किंचितसें लिहिलें आहे. तसेंच, ' श्रीपाद कृष्ण वाङ्मयदर्शन ' ( प्रा. वा. ल. कुलकर्णी ) व ' मराठी नाट्यसमीक्षा ' ( डॉ. रा. शं. वाळिंबे ) या दोन पुस्तकांत विशिष्ट दृष्टिकोणानें आत्मवृत्ताचें विस्तार

पूर्वक परिशीलन केलेलें आहे. पहिल्यांत साहित्य दृष्टीनें व दुसऱ्यांत नाट्यदृष्टीनें त्याचें विवेचन करण्यांत आलें आहे. " श्रीपाद कृष्णांचें हें आत्मवृत्त फार महत्त्वाचें आहे. श्रीपाद कृष्णांच्या वाङ्मयाच्या परिशीलनानंतर माझ्या दृष्टीनें त्या वाङ्मयाच्या प्रकृतीसंबंधीं, त्याच्या सामर्थ्यासंबंधी व त्याच्या मर्यादासंबंधीं जे निष्कर्ष काढले ते श्रीपाद कृष्णांच्या आत्मनिवेदनाशीं पडताळून पाहणें नेहमींच अत्यंत उद्‌बोधक ठरलें, " असा अभिप्राय प्रा. कुलकर्णी यांनी आपल्या पुस्तकांत निष्कर्षरूपानें व्यक्त केला आहे.

तथापि डॉ. वाळिंबे यांनीं नाट्यदृष्टीनें या ' आत्मवृत्ताचा ' जो गौरव केला आहे तो वाङ्मयाच्या अभ्यासकांना व सर्वसामान्य वाचकांनाही यथार्थ व गुणग्राही वाटल्यावांचून राहणार नाहीं. डॉ. वाळिंबे यांनी आपल्या ग्रंथांत ' नाटककाराचे पहिलें आत्मचरित्र ' या नांवाचें एक स्वतंत्र प्रकरण लिहिले असून मराठी नाट्यसमीक्षेच्या क्षेत्रांत या आत्मवृत्ताला अढळ स्थान मिळणे अपरिहार्य आहे अशी त्याची प्रशंसा केली आहे. डॉ. वाळिंबे यांनीं या ग्रंथांत ' आत्मवृत्ता 'विषयी जें मतप्रदर्शन केलें आहे तें जितकें महत्त्वाचे आहे तितकेंच यथार्थदर्शी असल्यामुळें वाचकांसाठीं तें येथें उद्‌धृत करीत आहे : " १९३५ सालीं श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांचें आत्मवृत्त प्रसिद्ध झालें, नाटककारानें स्वतःचें चरित्र लिहिण्याचा हा पहिलाच प्रसंग आहे. या एकाच गोष्टीमुळेहि या आत्मवृत्ताचें महत्त्व कोणीहि मान्य करील. मराठी नाट्यकला आणि रंगभूमि यांचा ४३ वर्षांचा दीर्घ परिचय असल्यामुळे कोल्हटकरांच्या आत्मवृत्ताचे कर्तृत्व स्वतःसिद्ध आहे...आपले पूर्वग्रह, आवडीनिवडी, रागद्वेष स्वभावांतील इतर बारीकसारीक खाचाखोचा इत्यादिकांविषयी कोल्हटकरांनी मोकळेपणानें पण भाषेचा संयम राखून व बऱ्याचशा सौम्य रीतीनें लिहिलें आहे. त्यांच्या आत्मवृत्तांत त्यांच्या स्वतःच्या नाटकांच्या निर्मितीचा आणि रंगभूमीवरील पहिल्या प्रयोगाचा इतिहास जसा आढळतो तसाच नाटकमंडळ्यांचा अंतःस्थ कारभार, मंडळ्यांचे परस्परांशीं हेवेदावे, नाटककारांचे परस्परांशीं संबंध, नाटकमंडळीचे मालक अथवा व्यवस्थापक आणि नाटककार यांचे संबंध इत्यादि अनेक गोष्टींची मनमोकळेपणानें चर्चा केलेली आढळते. रंगभूमीशीं सतत त्रेचाळीस वर्षें निकट संबंध असलेल्या बहुश्रुत, रसिक आणि मार्मिक गृहस्थानें केलेली ही चर्चा असल्यामुळें तिचें महत्त्व वादातीत आहे. एका थोर नाटककाराच्या आणि थोर नाट्यसमीक्षकाच्या व्यक्तित्वाचा हृद्य परिचय या आत्मवृत्तांत होत असल्यामुळें आणि नाट्याच्या क्षेत्रांतील अनेक संस्मरणीय घडामोडीवर त्यांत उत्कृष्ट प्रकाश पडलेला असल्यामुळें मराठी नाट्यसमीक्षेच्या क्षेत्रांत त्याला अढळ स्थान मिळणें अपरिहार्य आहे. " ( पृ. ३३७ )

मूळ हस्तालिखित ' आत्मवृत्तांत ' स्वतंत्र प्रकरणें नव्हती, विभाग नव्हते किंवा विषयांचे मथळेहि दिले नव्हते. तें कोल्हटकरांनी जसें लिहिलें तसेंच तें सलग छापलें गेलें. आत्मवृत्त कालानुक्रमानें लिहिले आहे, यांत शंका नाहीं, पण ' जसें सुचलें तसें लिहिलें ' या पद्धतीचे असल्यामुळें त्यांत विषयवारी साधतां आली नाहीं. म्हणून वाचकांच्या सोयीसाठीं या नव्या आवृत्तींत सर्वसामान्य विषयांच्या अनुरोधाने ' आत्मवृत्ता 'ची ३० प्रकरणें करण्यांत आलीं असून त्यांतील विषय स्थूलपणे अनुक्रमणिकेंत निर्देशित करण्यांत आले आहेत.

तसेंच, मूळ ' आत्मवृत्ता'ला पोषक व पूरक असें विविध साहित्य या आवृतीत संकलित करून देण्यांत आलें आहे. कोल्हटकरांचा पत्रव्यवहार फार मोठा होता व त्यांनी अनेकांना पाठविलेलीं पत्रें अनेकांच्या संग्रही असतील. या संग्रहांत समाविष्ट केलेली पत्रें शक्य तों पूर्वप्रकाशित अशीच घेतली आहेत. त्याचप्रमाणें कोल्हटकरांचा स्वभाव ज्यांत विशेषेंकरून प्रतिबिंबित झाला आहे अशा कांही निवडक आठवणी संकलित केल्या आहेत. पत्रें व आठवणी यायोगें कोल्हटकराच्या जीवनावर प्रकाश पडून त्यांचें व्यक्तिमत्त्व उजळून दिसेल यांत शंका नाही. कोल्हटकरांचे समग्र वाङ्मय, त्यांची रंगभूमीवर आलेली नाटकें, त्यांचें मृत्युपत्र वगैरे साहित्यहि विशेष हेतूनें संग्रहित करण्यांत आलें आहे. अशा प्रकारें तयार केलेली ' आत्मवृत्ता 'ची ही दुसरी संवर्धित आवृत्ति वाचकांना उपयुक्त व वाचनीय वाटेल, असा भरंवसा आहे.

या आवृत्तीच्या कामी ज्याचें साहाय्य झालें त्यांत प्रथमारंभी पद्मभूषण श्री. वि. स. खांडेकर यांचे मनःपूर्वक आभार मानले पाहिजेत. प्रकृति बरी नसतांहि आमच्या विनंतीला मान देऊन त्यांनीं ' आत्मवृत्ता 'ला विवेचक प्रस्तावना लिहून दिली. या पुस्तकांत अंतर्भूत केलेलीं पत्रें व आठवणी छापण्यासाठीं ज्यांनीं उदारपणें संमति दिली त्यांचे व श्री. प्र. श्री. ऊर्फ बापूराव कोल्हटकर, श्री. ह. वि. मोटे, श्री. ग. त्र्यं. माडखोलकर, श्री. का. न. केळकर, प्रा. वि. मा. दी. पटवर्धन व श्री. र. गो. टेंबे यांचे आम्ही ऋणी आहों. तसेंच विविध प्रकारची साधनसामुग्री उपलब्ध करून देण्याच्या बाबतीत ज्यांचें साहाय्य झालें त्यांत माझे मित्र व दुर्मिळ ग्रंथसंग्राहक श्री. पां. रा. ढमढेरे, साहित्यपरिषदेचे श्री. म. श्री. दीक्षित व श्री. जि. व्यं. देशपांडे व केसरी ग्रंथशालेचे श्री. बा. द. करकरे यांचा साभार उल्लेख करणें जरूर आहे.

पुणें, २५–६–७१

रा. प्र. कानिटकर

# अनुक्रमणिका

## कै. श्रीपाद कृष्ण कोल्हटकर

# आत्मवृत्त

## १

आमचें मूळ वसतिस्थान कोंकणांतील नेवरें गांव होय. माझे पणजे गोविंदभट कोंकणांतून येऊन देशावरील वाई या गांवीं वैद्य या घराण्याच्या आश्रयानें राहिले. त्यांना अनेक मुलगे व मुली होत्या. पैकीं माझे आजे हरिपंत अत्यंत सात्त्विक, प्रामाणिक व प्रेमळ वृत्तीचे असत. त्यांचें प्रेमळ भजन ऐकतांना श्रोतृवृंद सद्गदित होत असे. त्यांचे बंधु महादेवशास्त्री कोल्हटकर हे ' अथेल्लो 'च्या सर्वोत्तम भाषांतराचे कर्ते व उत्तम वक्ते असून, त्यांच्या त्या दोन्ही गुणांचा निर्देश ' निबंधमाले 'त अनेक स्थळीं आलेला आहे. माझे चुलते वामनराव यांस महादेवशास्त्री यांस दत्तक दिलें होतें. महादेवशास्त्री हे आपल्या अंगच्या सौजन्यामुळें अत्यंत लोकप्रिय व अंगच्या विद्येमुळें व कर्तबगारीमुळें सरकारांतहि मान्यता पावलेले होते. शाळाखात्यांत त्यांस मोठ्या पगाराची व मानाची जागा मिळाली होती. तथापि महादेव-शास्त्र्यांचा मुलगा म्हणवून घेण्यापेक्षां हरिपंताचा मुलगा म्हणवून घेण्यांतच माझ्या चुलत्यांना भूषण वाटे. यावरून माझे आजे हरिपंत किती सच्छील होते, याची कल्पना होईल. त्यांची स्थिति अत्यंत गरिबीची होती. माझे वडील कृष्णराव यांचें मॅट्रिकपर्यंत शिक्षण झाल्यावर लवकरच ते उमरावती येथील हायस्कुलांत शिक्षक होऊन सन १८७० च्या सुमारास वऱ्हाडांत आले. त्यानंतर त्यांनीं आपली बदली मुलकी खात्यांत करून घेतली. ते प्रथम बुलढाण्यास डेप्युटी क्लार्क होते. पुढें बरींच वर्षें ते अकोला येथें डेप्युटी कमिशनरच्या ऑफिसांत क्लार्क ऑफ दी कोर्ट होते. नंतर तहसीलदार

झाले; व अखेरीस ते एक्स्ट्रा असिस्टंट कमिशनर होते. १८९६ सालीं ते मलकापुर येथें असतां त्यांस अर्धांगवायूचा झटका आला, व १८९७ च्या अखेरीस त्यांचें देहावसान झालें. ते पापभीरु व सत्यनिष्ठ असत. त्यांचा स्वभाव अत्यंत तापट असे, पण ते तितकेच प्रेमळहि असत. ते फार धर्मभोळे असत. त्यांचेंहि भजन फार गोड लागे. ते दत्तोपासक असल्यामुळें त्यांनी आपल्या मुलांचीं नांवें अनुक्रमें दत्तात्रय, श्रीपाद, दिगंबर व अनसूया हीं ठेविलीं.

त्यांच्या प्रथम पत्नी सावित्रीबाई माझ्या मातुश्री होत. माझा जन्म नागपूर येथें २९–६–१८७१ रोजी झाला. माझें कर्क लग्न असून तूळ रास आहे. माझी सख्खी आई माझ्या सहाव्या वर्षाच्या सुमारास निवर्तली. त्यानंतर माझ्या वडिलांनी द्वितीय संबंध केला. माझ्या सापत्न मातुश्रींचेंहि नांव सावित्रीबाई असून त्यांचें प्रथमपासून आजपर्यंत मजवर अपत्यतुल्य प्रेम आहे.

बालपणीं मी कोणाच्या तरी कडेवर बसलों असतां व खालीं उतरण्याविषयी नाखुषी दाखविली असतां माझ्या वडिलांनी किंवा आईनें "एवढा घोडा झाला तरी अजून कडेवर बसावयास पाहिजे!" असे उद्गार काढिले. माझें मन मूळापासून अत्यंत संस्कारक्षम व कांहींसें मानी असल्यामुळें त्या प्रसंगाचा मजवर इतका परिणाम झाला कीं, तेव्हांपासून दुसऱ्यावर ओझें पडूं नये याबद्दल मी विशेष खबरदारी घेत आलों आहें.

माझी सख्खी आईहि माझ्या वडिलांप्रमाणेंच स्वभावानें फार तापट परंतु कोमल मनाची होती, एवढीच माझी तिजबद्दल आठवण आहे. आईच्या मृत्यूनें झालेल्या माझ्या हानीची जाणीव माझ्या अजाणपणामुळें त्यावेळी मला झाली नाही, व माझ्या सापत्नमातेनें पुढेंहि ती होऊं दिली नाहीं.

वयाच्या सुमारें ९ व्या वर्षीं कांहीं महत्त्वाच्या गोष्टी घडून आल्या. तोंपर्यंत माझी प्रकृति चांगली सुदृढ होती. परंतु त्या सुमारास माझ्या तोंडास अर्धांगवायूचा विकार झाला. माझी मान व जीभ वांकडी झाली; व कांहीं अक्षरें उच्चारतांना अडचण पडूं लागली. परंतु या गोष्टी त्यावेळी माझ्या लक्षांत आल्या नाहींत. माझी मान नुसती अवटळलेली आहे, यापेक्षां मला दुसरें कांही झालें नाहीं, असाच माझा समज होता. मला औषधोपचाराकरितां माझे चुलते वामनराव कोल्हटकर यांजपाशीं ठेविलें होतें. या

आजारामुळें माझें एक वर्ष बुडालें. त्याचें मला फार वाईट वाटलें. या आजारांत 'कादंबरी'चें एक मराठी भाषांतर वाचल्याचें आठवतें. याच्यापूर्वी नुकताच मला वाचनाचा नाद लागला होता. माझ्या वर्गात त्रिंबक शिवराम नांवाचा एक बहुश्रुत मुलगा असे. तो रोज पुराणास जात असे. त्याची कल्पनाशक्ति चांगली असल्यामुळें तो स्वतः नवीन गोष्टीहि रचून सांगत असे. त्यास वाचनाचा बराच नाद होता. त्याच्याशी स्पर्धा करण्याच्या इच्छेनें मी वाचनाचा व्यासंग जडवून घेतला. हा व्यासंग वाढण्यास एक क्षुल्लक बाब कारण झाली. मला झालेला वायूचा विकार तोंडापुरता नसून त्याची हातांस व पायांसहि बाधा झाली होती, किंवा माझें सर्वांग मूळचेंच वांकडें होतें, हें मला सांगतां येत नाहीं. पण एवढी गोष्ट मात्र खरी आहे की, या सुमारास माझ्या बेडौल शरीराबद्दल व बेढब चालण्याबद्दल माझा इतरांकडून बराच उपहास होऊं लागला. अर्थातच इतरांशी मिळूनमिसळून वागण्याची माझी प्रवृत्ति कमी होऊं लागली; व एकांतांत पुस्तकें वाचून वेळ काढावासा वाटूं लागला. आपलें शरीर जरी बेढब असलें, तरी मन संपन्न करून त्याची उणीव आपणास भरून काढितां येईल, व आपली गति जरी बेडौल असली तरी लेखनांत प्रावीण्य मिळवून तें व्यग झांकून टाकितां येईल असें वाटूं लागलें; व मी वाचनाकडे अधिकाधिक लक्ष पुरवू लागलों. या सुमारास मी मोरोपंतांच्या आर्यांच्या धर्तीवर सयमक आर्या करण्यास सुरुवात केली. माझ्या वडिलांचे एक ज्येष्ठबंधुतुल्य स्नेही अकोल्यास तहसिलदार होते, त्यांनी लोककल्याणार्थ केलेली कामें हाच माझ्या पहिल्या कवितेचा विषय असावा असें वाटतें. कदाचित् प्रभु रामचंद्राचें स्तवन हाहि असेल. मी त्यावेळी निस्सीम भगवद्भक्त असून खेडेगांवचे पाटील वगैरे माझ्या वडिलांच्या भेटीस आले असतां माझ्या पायां पडण्याचा त्यांचा परिपाठ असे. ध्रुवाप्रमाणें एका पायावर उभें राहून भगवंतास प्रसन्न करावें ही माझी एक मोठी महत्त्वाकांक्षा असे. माझी उपास्य देवता राम, तिची चित्रें काढण्यांत तासच तास मी घालवीत असें. मराठी पांचव्या इयत्तेंत असतां माझ्या कानी किर्लोस्करांच्या 'शाकुंतला'ची कीर्ति आली. तेव्हां आपणाहि एक संगीत नाटक लिहावें असें वाटून मी एका संगीत नाटकाचे बरेच प्रवेश लिहिले. फारशा चाली माहीत नसल्यामुळें दिड्या, साक्या व कटाव यांचीच त्यांत विशेष भरती होती. साऱ्या ऋतूंतील एकूणएक फुलझाडांचा व फळझाडांचा

नामनिर्देश केलेला असा एक बागेच्या वर्णनाचा कटाव त्यांत घातला होता. मराठी सहाव्या इयत्तेंत, लक्ष्मण कृष्ण चिपळूणकर — विष्णुशास्त्र्यांचे बंधु — आमचे शिक्षक होते. त्यांची मजवर फार मेहरबानी होती व ती अखेरपर्यंत कायम राहिली. त्यांनी आपल्या वडिलांच्या 'अरबी भाषेंतील सुरस व चमत्कारिक गोष्टीं'बद्दल माझ्या मनांत प्रेम उत्पन्न केलें. 'निबंधमाले'विषयी आदरयुक्त प्रेम उत्पन्न होण्यालाहि तेच कारणीभूत झाले. सहाव्या इयत्तेच्या परीक्षेंत पास झाल्यावर मी हायस्कुलांत गेलों. परंतु माझ्या वर्गावरील शिक्षकांनीं केवळ उशीरां येण्याबद्दल मला एके दिवशीं बांकावर उभें केल्यामुळें मी रागावून घरीं बसलों, व चिपळूणकर मास्तरांपाशीं आग्रहपूर्वक विनंति करून त्यांजकडून इंग्रजी-मराठी शाळेंतच सातवी इयत्ता (पूर्वी इंग्रजी तिसऱ्या इयत्तेस सातवी इयत्ता म्हणत) काढविली. या इयत्तेंत असता शंकर मोरो रानड्यांचीं अनेक नाटकें वाचनांत येऊन त्यांच्या धर्तीवर एक नाटक एका आठवड्यांत लिहून पूर्ण करावें अशी इच्छा होऊन, संकल्पाप्रमाणें एक तीन अंकी संगीत नाटक ठरलेल्या मुदतींत लिहून पुरें केलें. यानंतर दोन वर्षांनीं 'सुखमालिका' या नांवाचें पांच अंकीं नाटक लिहिलें. 'सुखमालिका' हें नायिकेचें नांव होतें. तिच्या अज्ञातवासांत असणाऱ्या बंधूच्या तोंडांतून निघालेलें—"मी हल्ली सुख मालिका भोगीत आहें."— हें श्लिष्ट वाक्य प्रतिनायकाच्या कारस्थानामुळें आडून ऐकिल्यामुळें राजास — तिच्या पतीस — आपली पत्नी दुराचरणी असल्याबद्दल शंका आली व त्यानें तिला घालवून दिलें; पुढें ती पुरुषवेषानें आपल्या पतीचा स्नेही म्हणून राहिली; एके दिवशीं त्यांचा मुलगा (हाहि अज्ञातवासांत होता) आपल्या शाळेंतील सवगड्यांबरोबर खेळ खेळत असतां खेळांतील राजा झाला; व त्या नात्यानें त्यानें एका खोडकर मुलास अपराधी म्हणून दंड केल्यामुळें त्या मुलाच्या बापानें राजाकडे फिर्याद केली व तिची चौकशी होत असतां सर्व गोष्टींचा उलगडा झाला;— असें नाटकाचें संविधानक होतें. नाटकांतील अनेक कल्पना बऱ्याच सरस असून, चवथ्या अंकांतील शाळेच्या प्रवेशांत विनोद बराच साधला होता. हें नाटक मी माझे चुलते वामनराव एकदां अकोल्यास आले असतां त्यांस वाचून दाखविलें. त्या प्रसंगीं एका पदांतील कल्पना त्यांस इतकी चांगली वाटली कीं त्यांनीं मला टाळ्या वाजवून उत्तेजन दिलें. मी त्यांजकडे नागपूर येथें औषधोपचाराकरितां होतों तेव्हां त्यांचें मजबद्दल

बरेंच अनुकूल मत झालें होतें; तें या प्रसंगी दृढ झालें.

या सुमारास 'किर्लोस्कर नाटक मंडळी' अकोल्यास आली. तिच्या उत्पादकाचा—अण्णा किर्लोस्करांचा भव्य देह, गंभीर स्वर व 'सौभद्रा'सारख्या सुंदर कृति, कंपनींतील नट भाऊराव कोल्हटकर, मोरोबा वाघोलीकर व रामभाऊ किजवडेकर यांचें मधुर गायन व अभिनयकौशल्य यांचा माझ्या मनावर चिरस्थायी संस्कार झाला. 'सौभद्र' नाटक माझे अत्यंत आवडतें असे. मला प्रथमपासूनच स्वतंत्र कृतींबद्दल अत्यंत आदर वाटे. अर्थातच 'सौभद्र' नाटकाबद्दल मला आदर वाटला यात कांही नवल नाहीं.

'किर्लोस्कर मंडळी' अकोल्यास असतांना अण्णा किर्लोस्करांना आपलें 'सुखमालिका' नाटक दाखवावें अशी इच्छा होऊन मी मंडळीच्या बिऱ्हाडाजवळ कितीतरी वेळां फेऱ्या घातल्या. पण अंगी धीटपणा नसल्यामुळें अण्णांशी बोलण्याचें मुळीच धाडस झालें नाहीं. या खेपेस मंडळींतील उपरि-निर्दिष्ट तीन नट आमच्या घरी एकदां जेवावयास आले होते. त्या प्रसंगीं त्यांनीं गाणें म्हणून आमची करमणूक केली, व आम्ही त्रिवर्ग बंधूंनीहि पदें म्हणून त्यांची करमणूक केली. आम्हां सर्वांचे आवाज बऱ्यांपैकीं होते. दर शनिवारीं रात्रीं पेटी-तबला मिळवून त्यांवर पदें म्हणविण्याचा आमच्या वडलांचा परिपाठ असे. आमच्या आवाजांच्या धर्माप्रमाणें भिन्नभिन्न भूमिकांच्या पदांची आमच्यांत वांटणी होई. माझा चुलतबंधु नीळकंठ याचा स्वर अत्यंत मधुर व सुरेल असून त्यास आलापहि चांगले साधत असत, यामुळें त्याजकडे भाऊरावांचीं पदें येत; मजकडे मोरोबांची येत असत.

## २

माझ्या वयाच्या १५ व्या वर्षीं माझा विवाह झाला. माझी पत्नी खामगांव येथील वकील वामनराव जोशी यांची कन्या होय. लग्ननिश्चयापूर्वी वराच्या व वधूच्या वडिलांनी वधूस व वरास पाहिलें नव्हतें. बी.ए. होईपर्यंत लग्न करावयाचें नाहीं असा माझा माझ्या चुलत्यांच्या उपदेशावरून निश्चय झाला होता. पण माझ्या वडिलांस इतकी भीड घालण्यांत आली कीं मान्यता देण्याशिवाय त्यांस गत्यंतर उरलें नाही.

वर्गांत शिक्षक व मुलें यांजमध्यें माझी बरीच चहा असे. निबंधमाला, ॲडिसनचे व गोल्डस्मिथचे लेख, स्कॉटच्या व रेनॉल्ड्सच्या कांहीं कादंबऱ्या वाचून मी माझ्या अंगी अत्यंत अल्प प्रमाणांत असलेली विवेकशक्ति वाढीस लाविली होती व इंग्रजी भाषेंत बरीच गति केली होती. तेव्हांचे हायस्कूलचे हेडमास्तर मि. एटकिन्स साहेब माझ्या इंग्रजी निबंधावर बरेच खूष असत. ' निबंधमालें 'तील निबंधाच्या धर्तीवर मी एक दोन निबंध बऱ्यांपैकीं लिहिले होते. चिपळूणकर, चितामणराव देशपांडे, डांगे अशा कांहीं शिक्षकांस मजबद्दल बराच अभिमान वाटे. मी मॅट्रिकच्या वर्गात असतां मराठी शिष्यवृत्तीची परीक्षा दिली व तिच्यांत पहिला आलों. परीक्षक विष्णु मोरेश्वर महाजनि होते.

सन १८८८ साली मी मुंबई विश्वविद्यालयाची प्रवेशपरीक्षा पसार होऊन १८८९ च्या आरंभीं पुण्याच्या डेक्कन कॉलेजांत प्रवेश केला. माझी कॉलेजांतलि कारकीर्द सुखद किंवा यशस्वी झाली नाही. मी तेथें तीन वर्षें काढिली. त्यांपैकीं दुसऱ्या व तिसऱ्या वर्षी आजारीच होतों. १८८९ सालचे अखेरीस माझ्या पायांना इसबाचा विकार सुरू झाला. या विकारानें पुढें जवळ-जवळ पंचवीस वर्षें मला फार त्रास झाला. १८९० च्या नाताळाकरितां मला कोल्हापूर येथील एका नातेवाइकाकडून बोलावणें आल्यावरून मी आगगाडीनें सांगलीस गेलों. पण तेथें त्या नातेवाइकानें पाठविलेल्या इसमाची व माझी चुकामुक होऊन मला सांगली येथील एका भिक्षुकाच्या घरीं जावें लागलें. जेवतेवेळीं मला अतिशय आग्रह करण्यांत येऊन मला प्रत्येक घासास ओकारी येत असतांहि आहाराबाहेर अन्न पोटांत कोंबावें लागलें. त्याच दिवशीं मला सडकून ताप भरला. नाताळची सुट्टी या तापांतच कोल्हापूर येथे गेली. जरा बरें वाटतांच मी कॉलेजांत परत गेलों. पण पुढें सात-आठ महिने माझ्या मागें हिवताप लागून त्यानें मला अशक्त करून सोडिलें. मी ऐच्छिक विषय भाषा घेतला असल्यामुळें मला उरलेल्या तीन चार महिन्यांच्या तयारीनें पास होतां आलें.

याप्रमाणें कॉलेजांतील तिन्ही परीक्षा मी लागोपाठ पसार झालों. माझ्या वेळी कॉलेजांत नरसिह चितामण केळकर, मंगेश जिवाजी तेलंग, शंकर श्रीकृष्ण देव, मोरो केशव दामले, बळवंत बाबाजी देशपांडे, बेळवी, विश्वनाथ काशीनाथ राजवाडे, शिवराम महादेव परांजपे, नीळकंठ पांडुरंग

पाटणकर, शांताराम अनंत देसाई इत्यादि अनेक बुद्धिमान् गृहस्थ शिकत होते. माझें विशेष सख्य भास्कर रामचंद्र नानल, श्रीनिवास त्रिंबक द्रवीड, सखारामपंत बाक्रे, खानविलकर इत्यादि कांहीं गृहस्थांशीं होतें. पण लेखन या नात्यानें मजवर ज्या गृहस्थांच्या सहवासाचा विशेष परिणाम झाला, ते प्रसिद्ध शंकर मोरो रानड्यांचे चिरंजीव रघुनाथ शंकर रानडे हे होत. त्यांची चर्या मोहक व डोळे पाणीदार असून ते अत्यंत बुद्धिवान् असत. मंडळीत ते जरी मौन धारण करीत असत तरी स्नेह्यांमध्यें वादविवाद व सौम्य विनोद करण्यांत त्यांस आनंद वाटे. मला लहानपणासून सौंदर्याबद्दल व बुद्धिमत्तेबद्दल अत्यंत आदर वाटत असल्यामुळें आमच्या ओळखीचें लवकरच स्नेहांत रूपांतर झालें. आमच्या वेळीं ऑक्झेनहॅम, सेल्बी, भांडारकर, करकरे, दस्तूर हे प्रमुख अध्यापक असत. ऑक्झेनहॅम साहेब एल्फिन्स्टन कॉलेजचे प्रिन्सिपाल होऊन गेले. त्या प्रसंगीं त्यांच्या सन्मानार्थ मी व नानल यांनीं कांहीं पदें केलीं होतीं. तीं मी म्हणून दाखविलीं. तीं ऐकून ऑक्झेन-हॅम साहेबांच्या पत्नी इतक्या खूष झाल्या कीं, तीं पदें भाषांतरासह त्यांज-कडे पाठविण्याची त्यांनीं मला विनंति केली व ती मी मान्यहि केली. परंतु भाषांतर करतेवेळीं एक मोठी अडचण आली. मंगलाचरणांत (व बहुधा अखेरच्या शुभचिंतनपर पदांतहि) गजाननाची "वक्रतुंड" "लंबोदर" अशासारखीं कांहीं स्तुतिपर विशेषणें पडली होतीं, त्यांची "ओ क्रूकेड-फेसेस वन्" "ओ बिग्-बेलीड् वन्" अशीं मासलेवाईक भाषांतरें करून तीं मडमसाहेबांस नजर करणें जिवावर आलें व वचनभंगाचा दोष पदरीं घ्यावा लागला.

१८९१ सालीं आम्हीं डेक्कन कॉलेजच्या विद्यार्थ्यांनीं संस्कृत मृच्छ-कटिक नाटकाचा प्रयोग केला. त्यांत मजकडे शकाराच्या विटाची भूमिका आली होती. मी इसबानें व तापानें आजारी असतांहि माझी भूमिका बरी वठली असावी असें वाटतें. त्यावेळीं बेळवी हे फेलो होते. त्यांनीं टाइम्सला प्रयोगाच्या हकीकतीचें एक साविस्तर स्तुतिपर पत्र पाठविलें होतें. या प्रयोगांत न. चि. केळकरांनीं मदनिकेची व कुंभीलकाची, मंगेश शिवाजी तेलंग यांनीं वसंतसेनेच्या विटाची, मोरो गणेश दामल्यांनीं सूत्रधाराची, व 'संतापशमन'कार दत्तात्रय अनंत केसकर यांनीं न्यायाधीशाची भूमिका घेतली होती. चारुदत्त, शकार, मैत्रेय, शर्विलक व वसंतसेना यांचीं कामें अनुक्रमें

मल्हारराव गर्दे, साठे, मोरोपंत आगाशे, गोविंदराव ओक व कट्टी यांनीं घेतलीं असून तीं सारीं अप्रतिम वठली. वसंतसेनेचें सोंग तर इतकें सुंदर दिसलें व त्या सोंगाची बतावणीहि इतकी सरस झाली की खुद्द भांडारकरांनीं पडद्यांत येऊन त्याबद्दल अभिनंदन केलें. तितका सुंदर प्रयोग धंदेवाल्या नाटकमंडळ्यांकडूनहि झालेला नाही असे उद्‌गार त्या प्रयोगाचे अनेक प्रेक्षक अजून काढितांना दिसून येतात.

मी तापामुळें अत्यंत अशक्त झालों असतांहि श्लोकांच्या चाली बसवून व तालमीना हजर राहून नाटकांकरितां माझ्या सामर्थ्यापलीकडे उत्साह दाखविला. यामुळें माझें दुखणें लांबलेंहि असावें. दुखणें संपल्यावर परीक्षेपर्यंत फारच थोड्या महिन्यांचा अवधि राहिला आहे हें पाहून मी ऐच्छिक विषयाचें एकहि पुस्तक विकत न घेतां पुस्तकालयांतून किंवा स्नेह्यां-कडून पुस्तकें मागवून त्यांजवरच निर्वाह केला. तीं पुस्तकें बहुधा मी रविवारीं वाचीत असें व आठवड्याचे इतर दिवस विश्रांतीत घालवीत असें. रविवारीं पहांटे एक वाजतां उठून रात्री दहा वाजेपर्यंत सारखें वाचावयाचें हा माझा त्या अवधीतला क्रम असे. माझा स्वभाव इतका उतावळा आहे कीं कोणतेंहि काम रोज नियमितपणें करण्यापेक्षां एका झपाट्यांत उरकून टाकणेंच माझ्या मनोधर्मास मानवतें.

मी १८९१ सालीं बी. ए. झालों. त्यापूर्वींच मी कायद्याची पहिली ( ज्युरिस्प्रुडन्सची ) परीक्षा पदरांत पाडून घेतली. १८९२ सालीं कायद्याचा अभ्यास करण्याकरितां मुंबईस राहिलों. परंतु बहुतेक वेळ अभ्यासांत न जातां कायद्याशिवाय इतर विषयांवरील पुस्तकांचें वाचन, वादविवाद व लेखन यांमध्यें जात असे. या सुमारास मला वाचनाचें फारच वेड लागलें होतें. एक पुस्तक झालें कीं दुसरें, दुसरें झालें कीं तिसरें, याप्रमाणें मी अनेक ग्रंथ वाचून टाकिले. पदार्थविज्ञान, रसायन, वनस्पति, ज्योतिष इत्यादि शास्त्रांवरलिहि लहान-मोठे ग्रंथ मी एकामागून एक वाचून टाकिले.

आमचे वादविवाद इतक्या जोरानें चालत कीं त्यापासून शेजाऱ्यांस फार त्रास होई. आमचें बिऱ्हाड एकदां डॉ. भालचंद्रांच्या बंगल्याजवळील दिवाडकरांच्या घरांत असतां आमच्या गाण्याच्या व वादाच्या आरडा-ओरडीनें डॉक्टर साहेबांस इतका त्रास होऊं लागला कीं त्यांनीं आमच्या घरवाल्याच्या मागें लागून त्याजकडून आम्हांस घर सोडण्याबद्दल लेखी

नोटीस देवविली! मग काय विचारतां? आधींच उल्हास आणि त्यांत फाल्गुनमास! आम्ही आपल्या गोंगाटानें त्या बिचाऱ्या सत्पुरुषास एक महिना मुळीच झोंप येऊं दिली नाहीं.

मुंबई येथील पहिल्या सहामाहींत माझ्या भावी आयुष्यावर परिणाम करण्यासारखी एक गोष्ट घडून आली. माझे स्नेही नानल व द्रविड यांची न्यू इंग्लिश स्कूलच्या धर्तीवर एक शाळा काढण्याची महत्त्वाकांक्षा होती. त्याच सुमारास मुंबई येथें छत्रे यांनीं चालविलेली 'आर्यन हायस्कूल' नांवाची एक संस्था जरा डबघाईस आली होती. नवीन शिक्षणसंस्था काढण्यापेक्षां ह्या सस्थेस सांवरून धरणेंच श्रेयस्कर होईल असें वाटून ते व त्यांच्या प्रेरणेनें बाकरे, मावळणकर, दातार, नरसोपंत केळकर इत्यादि त्यांचे बरेच स्नेही छत्र्यांचे भागीदार झाले. त्यांत मीहि होतों. आमच्या सह्यांच्या भपकेबाज जाहिरातींच्या शेंकडों प्रती मुंबईत वांटण्यांत आल्या; परंतु शाळेंत २—४ नवीन टाकाऊ विद्यार्थ्यांची भर पडण्यापलीकडे त्यांचा कांहीं उपयोग झाला नाहीं. त्यानेंच नवीन भागीदारांचा अर्धाअधिक उत्साह कमी झाला. उरलेला उत्साह एक-दीड महिना कायम होता पण कायमच्या वर्गाची मुदत संपत आली तशी त्यांपैकी एकेकानें कांहीतरी सबब काढून आपापल्या गांवी जाण्यास सुरवात केली. अखेरीस मी एकटाच काय तो उरलों. मजकडे प्रथम मराठी शिकविण्याचें काम असून त्याकरितां मला रोज एक-दोन तास खर्च करावे लागत. पण माझे एकेक स्नेही जसजसे पाय काढूं लागले, तसतसा मजवरील कामाचा बोजा वाढावयास लागून अखेरीस तर सहा तास सक्तमजुरी करण्यापर्यंत माझी मजल येऊन ठेपली. आम्हां पदवीधरांनी केलेल्या विश्वासघाताबद्दल छत्रे मला जीं दुरुत्तरें बोलत तीं मला मुकाट्यानें सहन करावीं लागत. "मी स्वतः सारा दिवस खपण्यास तयार आहें. यापेक्षां अधिक माझ्या हातीं कांहीं नाहीं" असें मी त्यांस म्हणून त्याप्रमाणें रोज सहा तासांप्रमाणें कांहीं दिवस काम केलें, तेव्हां त्यांचा राग शांत झाला व त्यांनीं मला आपल्या वचनांतून मुक्त केलें. तेव्हांपासून कोणतेंहि काम अंगावर घेणें झाल्यास तें इतरांवर अवलंबून न राहतां स्वतःच्याच हिमतीवर पार पाडितां येईल अशी खात्री असली तरच घ्यावयाचें असा नियम मी पाळीत आलों आहें.

# ३

यानंतर लवकरच म्हणजे १८९२ च्या पावसाळ्यांत मी माझा 'विविधज्ञानविस्तारां'तील पहिला लेख—'विक्रमशशिकले'वरील टीका—लिहिला. हा लेख एका जवळच्या नातेवाइकावर त्या नाटकाच्या प्रयोग-दर्शनानें घडलेले दुष्परिणाम पाहून व त्याच्या मनांत त्याविषयी अरुचि उत्पन्न करण्याकरितां लिहिलेला होता. 'विविधज्ञानविस्तारा'वर माझी पूर्वींपासून फार भक्ति असल्यामुळें लेख त्यांत यावा अशी मनापासून इच्छा होती, पण तो त्या मासिकास पात्र आहे की काय याबद्दल शंकाहि वाटत होती. अखेरीस माझे स्नेही विनायकराव रानडे यांच्या अत्यंत आग्रहानें मी त्यांजबरोबर 'विविधज्ञानविस्तारा'चे त्यावेळचे व्यवस्थापक रा. रा. पुरुषोत्तमपंत नाडकर्णी यांजकडे जाऊन त्यांस लेख दाखविण्यास कबूल झालों. त्याप्रमाणें त्यांच्या स्वाधीन लेख केला; घरीं परत येण्यास निघालों. लेख दिला हें बरें झालें नाहीं, परीक्षकांस लेख अत्यंत हास्यास्पद वाटेल, असे विचार रस्त्यानें चालतांना डोक्यांतून सारखे चालले होते, व विनायकराव मला मधूनमधून धीर देत होते. लेख दिल्यानंतर ४।५ दिवसांनी त्याबद्दल पत्र येण्याची वाट पाहूं लागलों. पांच दिवस गेले, दहा गेले, तथापि पत्राचा पत्ता नाही. अखेरीस १५।२० दिवसांनीं नाडकर्ण्यांकडून एक कार्ड आलें. त्यांतील मजकूर वाचून माझा आनंद गगनी मावेना. माझा लेख परीक्षणाकरितां रामचद्र भिकाजी गुंजीकरांकडे पाठविला होता' असें मला मागाहून नाडकर्ण्यांकडून कळलें. "त्यांना लेख फार आवडला. इतक्या चांगल्या लेखकानें अशा भिकार विषयावर लेख लिहावा याबद्दल त्यांस दिलगिरी वाटते. परंतु लेखकाच्या योग्यतेकडे लक्ष देऊन सबंध लेख प्रसिद्ध करण्याचें त्यांनी ठरविलें."—अशा मतलबाचा मजकूर त्या पत्रांत होता. लेख १८९३ च्या आरंभी 'विविधज्ञानविस्तारां'त प्रसिद्ध झाला. त्या वेळीं 'विक्रमशशिकला' नाटक मुंबईत अत्यंत लोकप्रिय झालेलें असल्यामुळें त्यावरील टीकेनें अर्थातच बरीच खळबळ उडवून दिली. नाटकाच्या कर्त्यास—माधवराव पाटणकरांस—टीकेचा फार राग येऊन त्यांनीं एका प्रयोगाचे प्रसंगीं बोलून दाखविलें की, "एका पदवीधरानें या नाटकावर टीका केली आहे. पण नाटकलेखनाचा मुळींच अनुभव नसलेल्या लेखकानें

लिहिलेल्या टीकेची मी कांहीं किमत समजत नाहीं. टीकाकारानें स्वत: एखादें नाटक लिहून लोकप्रिय करून दाखवावें असें मी त्याला आव्हान करतों." याच्यापूर्वींच मीं 'वीरतनयां'तील पदांस सुरवात केली होती. सदरहू आव्हानानें नाटक पुरें करण्यास स्फुरण आलें. १८९३ सालीं नाटकांतील पहिला अंक व शेवटच्या अंकांतील अखेरचा करुणपर्यवसायी प्रवेश मिळून पांच प्रवेश तयार झाले. पण पुढें नाटक तसेंच अर्धवट स्थितींत बरेच दिवस पडून राहिलें. १८९४ सालीं मी एल्एल्. बी. परीक्षेस बसलों. पण परीक्षेचीं पुस्तकें फक्त एक वेळच वाचिलेली असल्यामुळें तयारी मुळींच नव्हती. त्याचा परिणाम व्हावयाचा तोच झाला. 'वीरतनय' नाटक नवीनच निघालेल्या व मराठी नाटकें करणाऱ्या एका पारशी मंडळीस देण्याचा प्रथम विचार होता. पारशी मंडळ्यांकडून होणारे हामान, गुल-बकावली, चतराबकावली, खुदादाद वगैरे नाटकांचे प्रयोग अत्यंत सुंदर होत असून तीं नाटकें माझ्या फार आवडीचीं असत; व त्यांच्या मानानें 'किर्लोस्कर मंडळी'ची नाटकें फार फिक्कीं वाटत असत. भाऊरावांसारख्या नटांचें गायन आवडण्याइतकी सुसंस्कृत अभिरुचिहि माझ्या अंगीं अजून आली नव्हती. या सुमारास 'किर्लोस्कर मंडळी'चा मुंबईंत मुक्काम होता. एके दिवशीं माझ्या नाटकाबद्दल बातमी भाऊरावांच्या कानांवर गेल्यावरून ते मी राहात असलेल्या मंगळदास नथूभाईच्या चाळींत आले व त्यांनीं नाटकांतील बरींच पदें ऐकिलीं. त्यांचा त्यांजवर अनुकूल ग्रह होऊन तयार असलेले पांच प्रवेश मीं मंडळींच्या बिऱ्हाडी वाचावे असें ठरलें. त्याप्रमाणें वाचन झालें. माझा आवाज बराच गोड व तरळ असल्यामुळें वाचनाचा श्रोत्यांच्या मनावर फार परिणाम झाला. शेवटचा प्रवेश त्यांना अत्यंत हृदयद्रावक वाटला असावा असें त्यांच्या चर्येवरून स्पष्ट दिसून आलें. मंडळी मुंबईहून कोल्हापुरास गेली. मुक्काम हलल्यापासून एक महिन्याच्या आंत मी इतर प्रवेश पुरे करून द्यावे असें आम्हांमध्यें ठरलें होतें. त्याप्रमाणें नाटक पूर्ण करून मी कोल्हापुरास गेलों. तेथें 'किर्लोस्कर मंडळी' देवलांचें 'मृच्छकटिक' नाटक बसवीत होती; त्यामुळें 'वीरतनय' नाटक आणखी कांहीं महिने मागें पडलें.

माझी 'विक्रमशशिकले'वरील टीका 'विविधज्ञानविस्तारा'च्या संपा-दकांशिवाय इतरहि सुशिक्षित गृहस्थांस पसंत पडली असावी असें ती

प्रसिद्ध झाल्यानंतर लवकरच मोती बुलासा यांनीं 'सुविचारसमागम' मासिकांत मराठी वाङ्मयाचें जें समालोचन केलें त्यांत त्यांनीं किरातांच्या एका व हरि महादेव पंडितांच्या एका टीकेबरोबर त्या टीकेचाहि प्रशंसापूर्वक नामनिर्देश केला यावरून उघड होतें. त्या टीकेस जें उत्तेजन मिळालें त्यामुळें मला आणखी टीका लिहिण्यास प्रोत्साहन आलें. त्या टीकेची भाषा फार बोजड होती व तिच्यांतील तो दोष माझे स्नेही रघुनाथ शंकर रानडे हे एकदां मुंबईस आले असतां त्यांनीं उपहासपूर्वक माझ्या नजरेस आणिला होता. सबब तो दोष पुढील टीकांत टाळण्याचा मी निश्चय केला होता. १८९३ च्या अखेरीस 'किर्लोस्कर मंडळी' मुंबईस असतां ती देवलांच्या 'शापसंभ्रम' नाटकाचे प्रयोग करीत असे. इतर पुस्तकांच्या आधारें लिहिलेल्या पुस्तकांचा मला पूर्वीपासून तिटकारा असे. तथापि 'शापसंभ्रम' नाटकांत प्रवेशांच्या, कल्पनांच्या व शब्दांच्या निवडींत कर्त्यानें बरेंच चातुर्य दाखविलें आहे असें माझें मत असल्यामुळें त्या नाटकास माझे बरेच स्नेही प्रतिकूल असतांहि मी त्याजवर एक अनुकूल टीका लिहिली. ती १८९४ च्या मध्याच्या सुमारास 'विविधज्ञानविस्तारां'त प्रसिद्ध झाली. सूत्रधारमुखानें कर्तृप्रशंसा वदविण्याचा जो कांही नाटककारांचा संप्रदाय असतो तो मला आवडत नसल्यामुळें मी 'शापसंभ्रमां'तील त्या प्रकाराची थट्टा केली होती, व इतरहि कांहीं दोष दाखविले होते, त्यामुळें देवलांची माझ्यावर साहजिकच इतराजी झाली होती. ती इतराजी अनेक प्रसंगीं 'वीरतनयां'तील वाक्यांवर किंवा पदांवर टीका करून प्रगट करण्यांत येत असे. अशांपैकीं कांहीं प्रसंगीं मीहि 'मृच्छकटिकां'तील किंवा 'शापसंभ्रमां'तील सदोष वाक्यें निवडून काढून त्यांचा उपहास करीं तेव्हां कोठें मजवरील टीकांस आळा बसे. 'वीरतनय' मागें पडण्यास त्या टीकाहि कारणीभूत झाल्या असाव्या.

माझ्या अनुकूल टीकेमुळें माझ्या स्नेह्यांची खप्पा मर्जी होण्याचें कारण असें की, इंदूर सरकारनें 'कादंबरी'चें उत्तम नाटक करणारास बक्षीस देण्याचें जाहीर केल्यावरून जी नाटकें पाठविण्यांत आलीं होतीं त्यांत शिवराम महादेव परांजपे यांचें एक नाटक असून तें आम्हां सर्व दक्षिणविद्यालयीन विद्यार्थ्यांचें फार आवडतें असे. त्यास मागें सारून 'शापसंभ्रम' नाटकानें बक्षीस पटकाविलें, हें पाहून माझ्या स्नेह्यांस साहजिकच वैषम्य वाटत होतें. माझें मतहि प्रथम 'शापसंभ्रम' नाटकास

प्रतिकूल होतें तें अखेरीस अनुकूल झालें हें त्या नाटकाच्या उत्तमत्वाचें एक मोठें प्रमाण होय.

'शापसंभ्रमा'वरील माझी टीका प्रसिद्ध झाल्यावर माझे बुद्धिमान् स्नेही रानडे मला भेटले तेव्हां ती टीका माझी आहे हें मी नाकारीत असतांहि तिच्यांतील कल्पनांवरून त्यांनीं ती माझी असल्याबद्दल माझें मनःपूर्वक अभिनंदन केलें. त्यामुळें मला अत्यंत समाधान वाटलें हें सांगावयास नकोच.

१८९४ सालच्या अखेरीस माझे वडील बुलढाणा येथें एक्स्ट्रा असिस्टंट कमिशनर असतां तेथील गांवकऱ्यांच्या एका सभेपुढें मीं 'केशवपन' या विषयावर एक निबंध वाचला. पुढें त्यास प्रस्तावना व उपसंहार जोडून त्याचें 'पण लक्षांत कोण घेतो' या सुंदर कादंबरीवरील अनुकूल टीकेंत रूपांतर केलें. ती टीका १८९५ सालचे आरंभीं 'विविधज्ञानविस्तारा'त प्रसिद्ध झाली.

# ४

१८९५ सालींसुद्धां मजकडून एल्‌एल्. बी. परीक्षेची चांगली तयारी झाली नाही व त्यामुळें मला त्या परीक्षेंत दुसऱ्यांदा अपयश आलें. त्या सालीं नरसोपंत केळकर हेहि परीक्षेस बसले व ते तिच्यांत उत्तीर्ण झाले. या सुमारास 'किर्लोस्कर मंडळी'नें 'वीरतनया'च्या तालमी जोरानें सुरू केल्यामुळें मी मलकापुर येथें—माझे वडील बुलढाण्याहून तेथें बदलून गेले होते—न जातां मंडळी बरोबर पुणें, सोलापुर व बार्शी येथें गेलों. या प्रवासांत 'Conflict between science and religion' व 'Orion' ही दोन उत्कृष्ट पुस्तकें माझ्या वाचण्यांत आलीं. या अवधींत विशेष महत्त्वाची गोष्ट म्हटली म्हणजे पुणें येथें १८९५ सालच्या नाताळांत 'राष्ट्रीय सभे'ची जी बैठक झाली तिजकरितां आलेल्या व 'किर्लोस्कर मंडळी'च्या बिऱ्हाडीं पाहुणे म्हणून उतरलेल्या गृहस्थांसमोर देवलांचा व माझा त्यांच्या व माझ्या नाटकाच्या गुणावगुणांसंबंधानें खडाजंगीचा वाद झाला ही होय. ते सारे गृहस्थ देवलांच्या परिचयाचे होते या गोष्टीचा फायदा घेऊन त्यांनीं माझ्या नाटकाचा त्यांजपुढें उपहास करण्यास सुरवात केली. मी अत्यंत सहनशील म्हणून प्रसिद्ध होतों व आहें. परंतु तो उपहास मला सहन न

होऊन मी देवलांवर उलट हल्ला करून व त्यांनीं माझ्या नाटकांतील दाखविलेल्या प्रत्येक दोषाच्या जोडीचा त्यांच्या नाटकांतील दोष दाखवून त्यांचीं नाटकें स्वतंत्र नसल्यामुळें तीं मूलतःच माझ्या नाटकाहून निकृष्ट प्रतीचीं आहेत असें त्यांस जोरानें सांगितलें, व माझें नाटक लोकप्रिय करीन अशी प्रतिज्ञा केली. यापुढें माझे व त्यांचे संबंध उत्तरोत्तर निवळत गेले, पण त्यांच्या मनांतील तेढ अखेरपर्यंत पूर्णपणें नाहींशी झाली नाहीं. देवलांचा स्वभाव ज्यांस अवगत असेल त्यांस या गोष्टीचें आश्चर्य वाटणार नाहीं. देवलांच्या स्वभावांतील या मर्माचा रा. सा. नारायणराव फाटक यांनीं कोल्हापूर येथें मला पूर्वींच परिचय करून दिला होता.

१८९६ च्या मे महिन्यांत एके शनिवारी अहमदनगर येथें 'वीर-तनया'चा पहिला प्रयोग होण्याचें ठरलें. त्यापूर्वी दोन दिवस रंगीत तालीम व्हावयाची होती. तिच्याकरितां मी आपल्या धाकट्या बंधूस व कांहीं स्नेह्यांस पाचारण केलें होतें. ती मंडळी 'किर्लोस्कर मंडळी'च्या बिऱ्हाडी मजबरोबर राहिली असतां, त्यांचा मंडळीतील कांही प्रमुख गृहस्थाकडून मुद्दाम अपमान झाला असें त्यांच्या व माझ्या निदर्शनास आल्यावरून आम्ही मंडळीच्या बिऱ्हाडासमोरच एक बंगला घेऊन तेथें आपल्या बाडबिस्तारासह गेलों; बंगल्याच्या आवारांत असलेल्या एका विहिरींत मनमुराद पोहलों, व बाजारांतून बासुंदी-पुरा आणून यथेच्छ फराळ केला. त्या दिवशीं रात्रीं 'वीरतनया' चा पहिला प्रयोग व्हावयाचा होता त्याला हजर न राहतां संध्याकाळच्या गाडीनें पुण्यास कूच करण्याचा आमचा विचार होता. पण फराळ चालला असतांना समोरील रस्त्यानें नाटकमंडळीच्या बिऱ्हाडाकडे चाललेला एक टांगा दिसून त्यांत माझे वडील बसलेले दिसले. त्यावेळीं ते रजेवर असून पहिल्या प्रयोगाकरितां मुद्दाम पुण्याहून आले होते. झालें! आमचा सारा बेत फिसकटला! मी व माझे बंधु कंपनीच्या बिऱ्हाडी गेलों. तेथून निघून जातांना आम्ही गावांत एका स्नेह्याकडे जेवावयास जात आहोंत असें सांगून गेलों होतों. पण परत आल्यावर भाऊरावांस सर्व प्रकार सांगावा लागला. मला हा प्रकार पूर्वींच कां कळविला नाही असें मला खेदपूर्वक विचारून त्यांनीं त्या प्रकाराबद्दल असलेल्या मंडळीची चांगलीच खरडपट्टी काढिली. तेव्हांपासून माझ्या पाहुण्यांची बरदास्त फारच चांगल्या प्रकारची राहूं लागली हें निराळें सांगण्याचें कारण नाहीं.

भाऊराव माझ्या दशकांत होते असें म्हणतात. त्यांचा तसा समज असल्यामुळें ' वीरतनय ' नाटक बसवावयाला घेतल्यानंतर ते माझ्याशीं धाकट्या पण दूरच्या नातेवाईकाशी वागावें त्याप्रमाणें तुटकपणें वागत. प्रथम ते मजपासून पदांच्या चालीची संथा न घेतां ती मला वारंवार म्हणावयास सांगत. पण माझ्या ताना, खटके वगैरे नुसते ऐकून भागणार नाहीं अशी लवकरच खात्री झाल्यावर ते मजपाशी चाली शिकूं लागले. अण्णा किर्लोस्करांनी देवल यांस नटांस अभिनय शिकविण्याकरितां शिक्षक म्हणून ठेविलें होतें त्यावरून त्यांस मास्तर ही संज्ञा असे. त्या नावानें इतर नट मला हांक मारूं लागले होते, पण भाऊराव नुसत्या कोल्हटकर या नांवानें माझा निर्देश करीत. एकदां त्यांच्या तोंडांतून माझ्यासंबंधानें मास्तर या शब्दाचा उपयोग करण्यांत आला होता तेव्हां त्यांनी आश्चर्य दाखविलें होतें. पण मीं त्यांना चालीची अनेकदां संथा देऊन त्या त्यांस नीट वठत नाहींत असें त्यांना दिसून येऊं लागलें, तसतसा त्यांचा मजविषयीचा आदर वाढूं लागला व लवकरच तो कळसाला जाऊन पोहोंचला. बार्शी मुक्कामीं एकदां गोविंदराव कानिटकर ' वीरतनया 'ची तालीम पाहावयास आले असतां भाऊरावांनीं त्यांजपाशी " आमच्या मास्तरांच्या तोंडून आपण नाटक वाचवून घेतल्यास तालमीचें तुम्हांला कौतुक वाटणार नाही " अशा अर्थाचे उद्गार काढिले. पहिल्या प्रयोगास नाटककर्त्यांच्या पायां पडण्याचा त्या काळीं नटांमध्यें प्रघात असे; त्यास अनुसरून इतर नटांबरोबर भाऊरावहि माझ्या पायां पडले. ' अशि ही सगुणखानि ' या पदाच्या अतऱ्यांत मी सांगितलेली एक तान त्यांना नेहमी अडत असे. ती घेण्याचा ते प्रत्येक खेपेस प्रयत्न करीत व बहुधा प्रत्येक खेपेस फसत. भाऊराव एक ओळ इतकी घोळघोळून कां म्हणत आहेत याचें रहस्य माहीत नसलेले श्रोते भाऊरावांच्या गायन-कौशल्याबद्दलचा आपला आनंद टाळ्यांच्या गजरानें व्यक्त करीत. अडत असलेली तान अखेरीस गळ्यांतून निघाल्यास भाऊरावांस समाधान वाटे, न निघाल्यास ते मजकडे पाहून हसत व पुढील ओळ म्हणावयास सुरवात करीत.

'वीरतनया'च्या पहिल्या खेळाच्या दिवशीं त्याच्या भवितव्यतेबद्दल मला फारच काळजी वाटत होती. आठ वाजण्याचे सुमारास मी नाटक-गृहाच्या दारापाशी गेलों तेव्हां तेथें गर्दी नसलेली पाहून मला चर्रर् झालें.

वास्तविक पाहतां नाटकलोलूप मंडळीस माझा हा वेळपर्यंत मुळींच परिचय नसल्यामुळें प्रयोगास गर्दी झाली नसती तरी त्यांत मी वाईट वाटून घेण्यासारखें कांहीं नव्हतें. पण मी नवशिका नाटककार म्हणूनच आज गर्दी नाहीं असें वाटून माझें मन मला खाऊं लागलें. माझी भीति लवकरच निराधार ठरली. कारण खेळाच्या सुरवातीस नाटकगृह प्रेक्षकांनीं गजबजून गेलें. आतां नाटक प्रेक्षकांस कितपत आवडतें याची विवंचना सुरू झाली. पहिला प्रवेश भाऊराव ( शूरसेन ) व गोरे ( शालिनी ) यांचा होता. तो टाळ्यांशिवाय गेला. माझें मन खचूं लागलें. परंतु दुसऱ्या प्रवेशापासून चिंतोबा गुरवांच्या — शुंभसेनाच्या — भाषणांत हंशा व्हावयास लागून नाटकास रंग चढूं लागला व तो अखेरपर्यंत चढताच राहिला. प्रयोग यशस्वी झाला हें पाहून मला, माझ्या वडिलांना, बंधूंना व स्नेह्यांना अर्थातच फार आनंद झाला. खेळाचें उत्पन्न मंडळीच्या त्या मुक्कामाच्या पूर्वींच्या साऱ्या खेळांहून अधिक झालें. हा प्रयोग त्या मुक्कामांतील अखेरचाच लाविला होता. पण तो लोकांस फार पसंत पडला, असें पाहून मंडळीनें मुक्काम एक आठवडा लांबवून पुढील शनिवारीं तोच प्रयोग केला. त्यास पहिल्या प्रयोगापेक्षांहि अधिक उत्पन्न झालें.

माझी व कंपनीची ओळख होण्यापूर्वीं कंपनीनें नवीन नाटकाकरितां दोनशें रुपयांचें एक बक्षीस लाविलें होतें. मी 'वीरतनय' नाटक जरी ठरलेल्या मुदतींत पुरें करून दिलें होतें तरी तें बक्षिसाकरितां म्हणून पाठविलें नव्हतें. बक्षिसाकरितां एकंदर ३०।३२ नाटकें आलीं होतीं. त्या सर्वांत डोंगऱ्यांचें 'चंद्रसेना' नाटक माझ्या मतें उत्तम होतें. कंपनीच्या इच्छेवरून मी 'वीरतनय' नाटकाचा अंतर्भाव बक्षिसाकरितां आलेल्या पुस्तकांत होण्यास आपली अनुकूलता प्रगट केली; मात्र तसें करण्यानें माझें कोणतेंहि नुकसान होणार नाहीं असें कंपनीकडून त्याबरोबरच आश्वासन घेतलें. कंपनीनें आपला निकाल जाहीर केला. मला २०० रु. मिळण्याचें ठरलें. पुढें 'वीरतनया'स झालेल्या उत्पन्नाची सरासरी 'सौभद्रा'स झालेल्या उत्पन्नाच्या सरासरीइतकी झाली हें दिसून आल्यावर त्या दोनशें रुपयांपेक्षां आणखी तीनशें रुपये कंपनीनें मला दिले.

बक्षिसाच्या निकालानें बऱ्याच नाटककारांचीं व त्यांच्या स्नेह्यांचीं मनें दुखविलीं गेलीं. 'संगीत संभाजी' नाटकाचे कर्ते पाठारे यांचें एक नाटक

बक्षिसाकरितां आलेल्या पुस्तकांत होतें. त्यास बक्षीस न मिळाल्यामुळें मुंबई व ठाणें येथील बऱ्याच प्रभु मंडळींचीं मनें क्षुब्ध झालीं, निदान तीं क्षुब्ध करण्याचें एक उत्तम साधन मतलबी मनुष्यांस आयतेंच मिळालें. 'स्वदेशहित-चिंतक मंडळी'चे त्या वेळचे चिटणीस प्रधान नांवाचे एक प्रभु गृहस्थ होते. त्यांनीं डोंगऱ्यांचें 'चंद्रसेना' नाटक बसवावयास घेतलें; व मुबईस 'वीरतनया' नाटक १८९६ च्या सप्टेंबर महिन्याच्या सुमारास झालें, तेव्हां त्यांनीं व त्या मंडळीच्या मालकांनीं चाळींतून फिरून 'वीरतनया'ची मनसोक्त निंदा करून व 'चंद्रसेना' नाटकाचीं तिकिटें फुकट वाटून नाटक लोकांमध्यें अप्रिय होईल अशाविषयीं फार खटपट केली. एका गल्लींतून तर त्यांनीं 'वीर-तनया'ची जाहिरात गाढवाच्या पाठीस चिकटवून तिची वाद्यांसह धिंडहि काढिली. 'वीरतनया'चा मुंबईस जो पहिला प्रयोग झाला त्यास 'स्वदेश-हितचिंतक मंडळी'पैकीं बरेच लोक टवाळी करण्याच्या उद्देशानें हजर राहिले होते. 'किर्लोस्कर मंडळी'च्या सेक्रेटरींनीं प्रयोगास हजर राहण्याबद्दल मला समक्ष न कळविल्यामुळें व त्यासंबंधाचा निरोप संध्याकाळीं दिवे लागण्याच्या सुमारास एका किरकोळ मनुष्याच्या हातीं पाठविल्यामुळें मी रागावून तिकीट विकत घेऊन स्नेह्यांसह प्रयोगास गेलों होतों व स्नेह्यांच्या आग्रहा-मुळें बाहेर प्रेक्षकांमध्यें बसलों होतों. त्या सालीं मुंबईत प्रथमतःच प्लेगचा प्रादुर्भाव झाल्यामुळें नाटकगृह चिकार भरलें नव्हतें, तथापि गर्दी नव्हती असेंहि नाहीं. नाटकाबद्दल अत्यंत अनुकूल मत नगराहून मुंबई-पुण्यास आलें होतें व प्रयोगाबद्दल प्रेक्षकांस बरीच उत्कंठा वाटत होती. 'वीरतनया'-च्या आधारावर मुंबईच्या एका श्रीमान् कोळ्यानें १२००० रुपयांचे मोबदल्यांत कंपनीपासून १९ खेळांचें कंत्राट घेतलें होतें. पण प्लेगामुळें गर्दी इतकी कमी होऊं लागली कीं लवकरच त्या कोळ्यास ४००० रुपये नुकसानीदाखल देऊन आपली कंत्राटांतून मुक्तता करून घ्यावी लागली. असो. 'वीरतनया'च्या पहिल्या प्रयोगास नाटकाचे पहिले दोन अंक फारच उत्तम वठले. नाटकाचे उपरिनिर्दिष्ट हितशत्रु मधून—मधून निंदेचे फवारे सोडीत असतांहि प्रेक्षकांवर त्या दोन अंकांचा अत्यंत अनुकूल ग्रह झाला. दोन अंकांत 'वन्स मोर' मिळालें नाहीं अशीं फारच थोडीं पदें होतीं. दुसऱ्या अंकानंतर पडदा पडतांच कंपनीचे चिटणीस शंकरराव

मुजुमदार पडद्याबाहेर आले, व त्यांनीं नाटकाची व कर्त्याची अतोनात प्रशंसा आरंभिली. प्रथम-प्रथम तिला प्रेक्षकांनीं टाळ्या वाजवून दुजोरा दिला. पण पुढेंपुढें नाटकाच्या हितशत्रूंनीं नाटकांतील चाली पारशी नाटकांतून घेण्याचें कारण काय असा गिल्ला करण्यास सुरवात केली. त्यांच्या द्वेषास याप्रमाणें स्वाभिमानानें स्वरूप येतांच इतर प्रेक्षकांचेंहि त्यांना पाठबळ मिळालें व नाटकगृहांत ' न भूतो न भविष्यति ' असा गोंधळ उडाला. माझे स्नेही नागपुरचे डॉ. लक्ष्मण दाजीबा गद्रे यांनीं ( हे चांगले पहिलवान म्हणून प्रसिद्ध आहेत ) माझ्या प्रतिपक्षास माडीवरून खालीं उतरण्यास आव्हान केलें, त्यानें गोंधळांत भर पडली. भाऊराव वगैरे नट भयचकित होऊन पडद्याच्या बाहेर पाहूं लागले. मी जागच्या जागी निमूटपणें बसलों होतों. नाटकगृहांत पुन्हां शांतता व्हावयास बराच वेळ लागला. स्थिरस्थावर झाल्यावर तिसऱ्या अंकास सुरवात झाली. तो अंक मागील दोन अंकांपेक्षांहि चांगला उठावयाचा; पण घडलेल्या प्रकारामुळें नटांचा हिरमोड झाल्या-कारणानें तो त्यांनीं कसाबसा उरकून घेतला. यानंतर नाटकावर टीका व्हावयास सुरवात झाली. त्या वेळचे मुंबईचे एक प्रसिद्ध लेखक ' किर्लोस्कर मंडळी 'च्या बिऱ्हाडीं फुकट तिकीट मिळविण्याकरितां आले होते. पण त्यांस निराश होऊन हात हलवीत परत जावें लागलें होतें. त्यामुळें रागावून त्यांनीं ' प्रभाकर ' ' मुंबईवैभव ' ' इंदुप्रकाश ' ' गुराखी ' इत्यादि वर्तमान-पत्रांतून निरनिराळ्या टोपण नांवांनी टीका प्रसिद्ध केल्या. त्यांपैकीं एकीस मी स्वतः ' वीरतनया 'शी बराच परिचित असलेला ' या सहीनें उत्तर दिलें. माझे स्नेही दिनकर सखाराम वर्दे हे या टीकांमुळें इतके खवळून गेले की त्यांनींहि एक-दोन टीकांचा खरपूस समाचार घेतला. या सर्व टीकांत प्रमुख टीका नागपुरचे विनायकराव खरे यांनीं ' विविधज्ञानविस्तारां 'तून १८९८ सालीं प्रसिद्ध केलेली होय. मी ' विक्रमशशिकले 'वर केलेल्या टीकेस खरे यांनीं मुंबईच्या एका वृत्तपत्रांतून प्रत्युत्तर दिलें होतें. व त्यास मी ' मुंबईवैभवां 'तून प्रत्युत्तर दिलें होतें. या प्रत्युत्तरावरील मथळ्यावर ' शाकुंतल ' नाटकाच्या सातव्या अंकांतील " अहो बलीयः खलु भीतोऽस्मि " हें भरताचें वाक्य माझे स्नेही गोविंदशास्त्री फडके यांच्या सूचनेवरून दिलें होतें. याप्रमाणें खऱ्यांचा व माझा पूर्वपरिचय होता. त्यांनी ' विविधज्ञान-विस्तारां 'तील आपल्या टीकेंत ' वीरतनयां 'तील गुण व दोष दाखविले होते.

ती टीका प्रसिद्ध करण्यापूर्वीं ' विविध ज्ञानविस्तारा 'च्या व्यवस्थापकांनीं त्या गोष्टीस माझी संमति मिळविली असून तिला उत्तर देण्याची मला सूचना केली होती. त्या व तिच्या पूर्वींच्या साऱ्या टीकांस सविस्तर उत्तर देण्याचा माझाहि विचार होता, व तो विचार मी ' केसरी ' पत्रास एक पत्र लिहून प्रगट केला. त्या पत्रांत– " घरांत सुरवंटांचा सुळसुळाट झाल्यास एक-एक सुरवंट उचलून फेंकून देण्यापेक्षां सारे सुरवंट केरसुणीनें झाडून टाकणें बरें " – अशा अर्थाचें एक वाक्य घातलें होतें. असो. माझ्या संकल्पाप्रमाणें मी ' वीरतनया 'वरील सर्व टीकांस उत्तरादाखल म्हणून एक लेख लिहून तो ' वीरतनयाची ढाल ' या नांवानें ' विविधज्ञानविस्तारा 'तून १८९७ साली प्रसिद्ध केला. हा लेख भाषेच्या वगैरे दृष्टीनें वाचनीय असला तरी आत्मप्रौढी या दोषानें बराच दूषित झाला आहे. यापुढें मी अशा प्रकारचा लेख कधींहि लिहिला नाही.

१८९६ साली मी परीक्षेची चांगलीच तयारी केली होती; पण परीक्षेच्या पूर्वीं कांहीं महिने ' किर्लोस्कर मंडळी 'चा मुंबईस मुक्काम असल्यामुळें, त्या अवधींत ' वीरतनया 'चीं प्रुफें तपासावीं लागल्यामुळें व ' वीरतनया 'च्या प्रयोगांनी व त्यावरील टीकांच्या भडिमारानें चित्तक्षोभ बराच झाल्यामुळें, त्या तयारीची व्हावी तशी सांगता झाली नाही व या तिसऱ्या खेपेसहि माझ्या वांट्याला अपेशच आलें. या अपेशामुळें मनास अत्यंत खिन्नता आली. यापूर्वीं कांहीं वर्षें पहिल्या एल्एल्. बी. ची परीक्षा सुरू झाली होती. परंतु ज्यूरिसप्रूडन्सची परीक्षा पास झालेल्या विद्यार्थ्यास कांही वर्षांपुरती त्या परीक्षेची माफी मिळाली होती. मी ज्यूरिसप्रूडन्सची परीक्षा पी. ई. च्या वर्गात असतांच पास झालों असल्यामुळें त्या माफीचा फायदा मला हा काळपर्यंत मिळाला होता. पण त्या माफीची मुदत आतां संपली होती. पुढील वर्षी पहिल्या व दुसऱ्या एल्एल. बी. च्या परीक्षांस बसणें भाग होतें. माझे धाकटे बंधु यापूर्वींच बी. ए. झाले असून पुढील वर्षीं पहिल्या एल्एल्. बी. च्या परीक्षेस बसावयाचे होते. त्या परीक्षेंत ते पास होऊन मी नापास झालों तर खाली पाहावयाचा प्रसंग येणार; शिवाय तसें झाल्यास मी दुसऱ्या एलएल्. बी. ची परीक्षा पास होऊनहि कांहीं उपयोग होण्यासारखा नव्हता. १८९५ साली मी परीक्षेंत नापास झाल्यावर वडिलांनीं रागावून पैसे पाठविण्याचें बंद केलें होतें, तरी मला ' वीरतनया 'बद्दल

मिळालेल्या बक्षिसाच्या आधारावर मी हें वर्ष कसेंबसें काढिलें होतें. पण आतां पुढें कसें करावयाचें ? हा प्रश्न माझ्या मनांत घोळूं लागला. याच सुमारास माझ्या वडिलांना अर्धांगवायूचा विकार होऊन ते उमरावतीस माझे आतेभाऊ भास्करराव थत्ते यांचेकडे सर्व मंडळीसह राहावयास गेले होते. दुर्दैवानें भास्कररावांवरहि याच वेळीं एक विलक्षण प्रसंग गुदरला होता. ते म्युनिसिपालिटीचे सेक्रेटरी होते. त्यांच्या हाताखालील एका इसमावर पैशाची अफरातफर केल्याच्या आरोपावरून फौजदारी खटला सुरू झाला असून त्याचे शितोडे भास्कररावांवर उडाल्यामुळें त्यांना सस्पेंड करण्यांत आलें होतें. माझ्या वडील बंधूंनीं याच सुमारास अकोल्यास दवाखाना घातला होता; पण त्यांचें बस्तान अजून नीटपणें बसलें नव्हतें. या संधीस आमची आई तापानें आजारी पडली, व तिच्या आजारानंतर कांहीं दिवस मीहि तापानें फार आजारी होतों. भास्करराव थत्ते स्वत: संकटांत असतां आपण त्यांजपाशीं सहकुटुंब सहपरिवार राहणें बरें नाही असें वाटून आमचे वडील आम्हां सर्वांसह नागपुरास बिऱ्हाड करून राहिले. तेथून आम्ही जबलपुरास माझ्या चुलत्यांकडे राहावयास गेलों. वडिलांचा स्वभाव दिवसेंदिवस आजारा-मुळें अधिकाधिक चिरडखोर होत चालला होता. मनास लागलेल्या अनेक विवंचनामुळें माझाहि अभ्यास चालावा तसा चालत नसून त्या वर्षीं परीक्षेंत यश येण्याची फारशी उमेद वाटत नव्हती. एकंदरींत १८९७ हें साल मला फारच वाईट गेलें.

२

मुंबईत असतांना मी मंगळदास नथूभाईच्या चाळींत राहात होतों. त्या चाळींत एक न्हाणीघर असून त्यांत हजाऱ्याखालीं उभें राहून स्नान करण्यांत माझा कितीतरी वेळ जात असे. अशा एक-दोन प्रसंगीं ‘ मूक-नायका ’तील पहिल्या अंकांत आलेली “ पणाच्या मुळाशीं प्रेम नसून द्वेषच असतो ” ही व दुसऱ्या अंकांतील “ तुम्ही व्यंग अंगिचें दावा ” या पदांतील कल्पना मला सुचून अत्यानंद झाला. या कल्पना ज्यांत गोवितां येतील असें एक संविधानक रचण्याचा विचार होऊन तो अमलांत आणण्यास सुरुवातहि झाली. पुढें लवकरच मी परीक्षेंत नापास होऊन कथानकरचनेचें

काम कांहींसें मागें पडलें. या खेपेचें अपेश केवळ ' वीरतनया 'मुळें आलें होतें. असें असतांहि ' किर्लोस्कर मंडळी ' कडून मला दिलगिरीचें एकाहि पत्र आलें नाहीं यामुळें अतिशय वाईट वाटून नवें नाटक लिहिण्याच्या संकल्पास पुन्हां जोर आला, व आपलें सर्व कौशल्य खर्च करून एक असें सुंदर नाटक लिहावयाचें कीं त्याच्या विषयामुळें तें ' किर्लोस्कर मंडळी 'स करावेंसें वाटूं नये असा विचार मनांत डोकावूं लागला. मी १८९७ चे आरंभीं नागपुरास माझे स्नेही लक्ष्मण गणेश यांजबरोबर डॉ. गद्रे यांच्या घरी पाहुणा असतां एक दिवशी पहांटेस चार वाचतां उठून ' मूकनायका 'चा पहिला प्रवेश लिहिण्यास सुरवात केली. त्यावेळीं सबंध कथानकाची रूपरेषा मात्र मुळींच ठरलेली नव्हती. नाटकाचा एक-एक प्रवेश लिहिण्यांत येऊं लागला तसतशी ती ठरत गेली. ' वीरतनयां 'तील पहिला अंक व शेवटचा प्रवेश मी प्रथम लिहिला होता. पण ' मूकनायक ' लिहितांना आपल्या आवडीचे प्रवेश प्रथम लिहिण्याचा मार्ग न स्वीकारतां सर्व नाटक त्यांतील प्रवेशांच्या क्रमानेंच लिहिलें. जबलपुरास असतांना मी आपल्या चुलत्यांच्या देखत सकाळी अभ्यास करीत बसें, पण ते कचेरीत गेले कीं नाटकांतील प्रवेश लिहिण्यास सुरवात करी. त्या वर्षी परीक्षांत अपेश आल्यास तें वर्ष अगदी निरर्थक गेल्यासारखें वाटूं नये हा एक हेतु नाटक लवकर संपविण्यांत होता. परंतु परीक्षांत यश येण्याची तर्तूद करण्याकडे मात्र मी बरेच दिवस लक्ष पुरविलें नाहीं. गेल्या सालीं आपला अभ्यास चांगला झाला आहे या भरंवशावर मी बसलों होतों, व परीक्षांच्या सुमारें तीन महिने पूर्वीं मुंबईस गेलों तोंपर्यंत पहिल्या एल्‌एल्. बी. ची पुस्तकें जेमतेम एकदां व दुसऱ्या एल्‌एल्. बी. च्या पुस्तकांपैकी दोन पुस्तकें एकदां वाचण्यापलीकडे मी कांहीं केलें नव्हतें. मी जबलपुरास असतां माझ्या चुलत्यांनीं ' वीरतनय ' नाटक ' डेक्कन व्हर्नाक्युलर ट्रान्स्लेशन सोसायटी 'कडे बक्षिसाकरितां पाठविण्याची मला एकदां शिफारस केली. पण ती कल्पना मला पसंत पडली नाहीं. आमचें यासंबंधानें बोलणें झाल्यावर दोन-चार दिवसांतच त्या सोसायटीकडून माझ्या नांवें एक पत्र आलें, त्यांत मी सोसायटीच्या ' परीक्षक मंडळा 'पैकीं एक सभासद होण्यास तयार आहें का अशी विचारणा करण्यांत आली होती. मी तें पत्र अभिमानानें चुलत्यांस दाखवून त्यांच्या सूचनेप्रमाणें मी ' वीरतनय ' नाटक सोसायटीकडे पाठविलें नाहीं याबद्दल आनंद प्रदर्शित

केला. त्यांनाहि पत्राबद्दल आनंद वाटला; पण परीक्षक होण्याविषयी पूर्ण तयारी न दाखवितां एल्‌एल्. बी. परीक्षेंत पास झाल्यास मात्र आपण तें काम पत्करण्यास तयार आहोंत अशी शर्तीची मान्यता दर्शविण्याचा त्यांनीं मला सल्ला दिला व त्याप्रमाणें मी जबाब पाठविला. माझा जबाब शर्तीचा असल्यामुळें त्याचा विचार झाला नाहीं असें मला मागाहून कळलें. तेव्हां मला फार वाईट वाटलें. तथापि त्या वेळी मी जर परीक्षक म्हणून निवडून आलों असतों तर माझा बराच वेळ सोसायटीकडे येणारी पुस्तकें तपासण्यांत जाऊन तितकें माझें स्वतःचें लेखन कमी झालें असतें या दृष्टीनें विचार करतां झालें तें चांगलेंच झालें असें म्हटलें पाहिजे. मला सोसायटीकडून पत्र आलें होतें तशीं पत्रें एकंदर वीस गृहस्थांकडे गेली होती; त्यांपैकी विष्णु मोरेश्वर महाजनि, मोती बुलासा, हरि कृष्ण दामले इत्यादि चार-पांच गृहस्थांची निवड झाली. मी आपली मान्यता बिनशर्त दर्शविली असती तर माझी निवड होण्याचा बराच संभव होता असें मला मागाहून कळलें.

यानंतर लवकरच महादेव गोविंद रानड्यांनी मराठी वाङ्मयावर एक लेख लिहून प्रसिद्ध केला. त्यांत पदवीधर लेखकांत त्यांनीं माझें नांव दाखल केलें होतें. असो.

मी मुंबईस येण्यापूर्वीच ‘ मूकनायक ’ नाटक गद्यरूपानें लिहून तयार झालें होतें. तेथें आल्यावर लवकरच कृष्णाजी प्रभाकर खाडिलकर हे आपलें ‘ सवाईमाधवरावांच्या मृत्यू ’चें नाटक मला दाखविण्याकरितां घेऊन मजकडे आले होते. त्याजवर रावजी भवानराव पावगीसारख्या कांहीं रसिकांनीं प्रतिकूल अभिप्राय प्रगट केले होते. मला तें नाटक त्यांत दिसून येणाऱ्या कल्पकतेमुळें व बुद्धिमत्तेमुळें फारच आवडलें व मी आपलें मत खाडिलकरांपाशीं प्रगट केलें. नंतर मी ‘ मूकनायक ’ नाटक त्यांस वाचून दाखविलें. तें त्यांना इतकें आवडलें कीं ते फारसे बोलके नसतांहि त्यानी आपली पसंती प्रगट करून त्या नाटकावर टीका झाल्यास तिला उत्तर देण्याची तयारी आपण होऊन दाखविली. याप्रमाणें आमच्या ओळखीचें स्नेहांत रूपांतर झालें. तो स्नेह आजपावेतों मूळ स्वरूपांतच कायम आहे.

परीक्षा दोन-अडीच महिने राहिल्या तोंपर्यंत माझें ‘ मूकनायकां ’तील पद्यरचनेचें काम चालू होतें. त्या वेळेपावेतों मी सुमारें तीस पदें लिहिलीं असावीं. या सुमारास माझें अभ्यासाकडील दुर्लक्ष पाहून माझे

स्नेही बाबा कानडे यांनीं त्याबद्दल आपली दिलगिरी प्रदर्शित केली. माझ्या स्नेह्यांस मजबद्दल विवंचना लागली असून मला कांहींच काळजी वाटत नाहीं हें पाहून मला फार लाज वाटली व मी अभ्यास नेटानें करावयास सुरुवात केली. त्या कामी मला माझ्या धाकट्या बंधूंची फार मदत झाली. योग्य वेळी मी दोन्ही परीक्षांस बसलों. पहिल्या एल्एल्. बी.चे कागद साधारण बरे गेले. पण दुसऱ्या एल्एल्. बी. च्या कागदांपैकीं करारशास्त्र व ईक्विटी या विषयांचे कागद फार कठिण गेले. सुदैवानें ते कागद सर्वच उमेदवारांस कठिण गेल्यामुळें उत्तरें उदारपणानें तपासण्यांत येतील असें मानण्यास जागा होती. दुसरी परीक्षा आटोपल्यानंतर त्या दिवशी नाटकास रात्रीं जावयाचें असे गोड विचार करीत खोलीत जातों तों माझे वडील अत्यवस्थ स्थितीत असल्याबद्दल माझ्या वडील बंधूंचें पत्र हातीं आलें. माझ्या परीक्षेंत व्यत्यय येऊं नये म्हणून त्यांनीं ती बातमी अगोदर कळविली नव्हती. पत्र वाचतांच मी आणि माझे कनिष्ठ बंधु अकोल्यास जावयास निघालों. तिसऱ्या वर्गाच्या उतारूंस वाटेंत मनमाडास प्लेगसंबंधानें तपासणीचा त्रास होतो असें कळल्यावरून आम्ही दुसऱ्या वर्गाची तिकिटें घेतली. परंतु मनमाड येथील हिंदी डॉक्टरानें आधल्या दिवशी कांही अमेरिकन इसमांस उतरवून त्यांचा खोळंबा केल्यामुळें गोऱ्या डॉक्टरानें त्याचा सूड उगविण्याकरितां इतर हिंदी इसमांबरोबर आम्हांसहि खालीं उतरविलें व आम्हांस स्नान करावयास लावून आमच्या सर्व सामानांस वाफारा दिला. दुसऱ्या गाडीनेंच आम्ही अकोल्यास निघून गेलों. घरीं पोंचतांच वडिलांपाशी गेलों. त्यांनी खुणेनेच परीक्षेबद्दल प्रश्न केला व मला निकालाबद्दल फारशी आशा नसतांहि मी त्याचें समाधानकारक उत्तर दिलें. दुसरे दिवशी रात्रीं वडिलांचें प्राणोत्क्रमण झालें. त्यांची अखेरची भेट घेण्याकरितां माझे चुलते आले होते ते त्यांस भेटून त्यांच्या निधनापूर्वींच निघून गेले. दुसरे दिवशीं शव हलविण्याचे वेळीं केशवपनाचा प्रश्न निघाला. त्याचा निकाल आम्ही स्वत: क्षौर करण्याचें कबूल करून समाधानकारक रीतीनें लाविला.

वडिलांच्या मृत्यूनंतर लवकरच 'किर्लोस्कर मंडळीं 'तील भाऊराव, रामभाऊ, काशीनाथपंत परचुरे, मिरजकर व शंकरराव मुजुमदार हे प्रमुख गृहस्थ दुखवट्याच्या भेटीकरितां उमरावतीहून अकोल्यास आले. पण नवें

नाटक ऐकण्याचाहि त्यांचा एक हेतु होता. त्यांच्या इच्छेस मान देऊन मी त्यांस 'मूकनायक' नाटक वाचून दाखविलें. तें त्यांना बरेंच आवडलें. तथापि त्यांतून सुरापानासंबंधींचीं वाक्यें ऐकून त्यांपैकीं कांहींकांचीं तोंडें म्लान झालेली माझ्या दृष्टीस पडली. वाचन संपल्यानंतर मी नाटकांतील पदें लवकरच तयार करून त्यांस नाटक उमरावती मुक्कामी द्यावें अशी त्यांनीं इच्छा प्रदर्शित केली व नंतर ते निघून गेले. दुसऱ्या दिवसापासून मीं उरलेल्या पदांचें काम हातीं घेतलें व १५–२० दिवसांत तें पुरें केलें. बरींच पदें मी अशौचांत नदीवर गेलों असतां तेथें केलेली आहेत. नाटकास संगीताचें रूप आल्यावर तें घेऊन मी उमरावतीस गेलों. तेथें मी भास्करराव थत्त्यांकडेच उतरलों होतों. त्यांजवरील अरिष्ट नाहींसें होऊन त्यांनीं नुकताच पुनर्विवाहहि केला होता; ज्या दिवशी परीक्षांचा निकाल व्हावयाचा होता त्या दिवशीं रात्रीं भास्कररावांनी नाटक-मंडळीतील प्रमुख ८–१० मंडळीस जेवावयास बोलाविलें होतें. जेवण्याचे पूर्वीं व तें चालू असतां मी साचितच होतों. जेवण झाल्यावर मंडळी गप्पा छाटीत बसली. जों जों वेळ जाऊं लागला तों तों माझी काळजी वाढूं लागली. अखेरीस रात्रींचे ११ वाजतां तारेचा शिपाई येतांना मी पाहिला. मीं तार फोडून भीत भीत वाचली. तों तिच्यांत मी दोन्ही परीक्षांत पास झालों असल्याबद्दलचा मजकूर मुंबईहून माझे स्नेही लक्ष्मण गणेश महाजनि यांनीं कळविलेला दिसला. मंडळींनी टाळ्यांचा एकच गजर केला. तथापि मला पास होण्याची विशेष आशा नसल्यामुळें माझें नांव वृत्तपत्रांतून छापून येईपर्यंत तार माझ्या एखाद्या हितशत्रूनेंच केली असावी असा मला संशय होता.

नागपूर येथें पुन्हां एकदां नाटक ऐकून त्यासंबंधाचा निकाल कळवूं असें 'किर्लोस्कर मंडळी'नें सांगितल्यावरून मी नागपूर येथें गेलों. तेथें पुन्हां एकदां 'मूकनायक' नाटक वाचून दाखविलें. तें वाचन फारच परिणामकारक झालें असावें असें श्रोत्यांच्या मुद्रांवर व मुजुमदारांच्या उद्गारांवरून दिसलें. मी त्यांना विचाराकरितां ३।४ दिवसांची मुदत देऊं लागलों तेव्हां– "मुदतीचें मुळीच कारण नाही. नाटक आम्ही बसवावयास घेणार याबद्दल शंकाच नको." –असें ते म्हणाले. तथापि नाटकाचा विषय सुरापान हा असल्यामुळें भाऊराव यांस नाटक घेणें कितपत आवडेल याची मला त्यांच्या चर्येवरून शंका आल्यावरून मी त्यांना ३।४

दिवसांची मुदत दिली. मुदतीचे दिवस निघून गेले, वर आणखी २।३ दिवस लोटले, तरी शंकररावांचा पत्ता नाहीं. कारण काय असावें तें मी समजून चुकलों. तथापि तें स्पष्ट करून घेण्याकरितां मी भाऊरावांच्या भेटीकरितां मंडळीच्या बिऱ्हाडीं गेलों, पण ते त्यावेळी झोंप घेत असल्यामुळें त्यांची भेट झाली नाही. तेव्हां मनाला विशेषच वाईट वाटलें. त्या सुमारास मंडळीनें ' शाकुंतल ' नाटकाचा प्रयोग लाविला, त्यास मी तिकीट घेऊन डॉ. गद्र्यांसह गेलों व अखेरपर्यंत पडद्यांत गेलों नाहीं. त्यानंतर एके दिवशीं मुजुमदार डॉ. गद्र्यांकडे आले. पण बराच वेळ नाटकाबद्दल गोष्ट काढीनात. अखेरीस नाटक लेखनकलेच्या दृष्टीनें चांगलें झालें आहे, पण रंगभूमीच्या दृष्टीनें तें कसें रंगेल-वठेल याची शंका वाटते असें त्यांनीं मला सांगितलें. " मलाहि त्याबद्दल कुतूहल असल्यामुळें मी दुसऱ्या एखाद्या कंपनीकडून या नाटकाचा प्रयोग करवून तो कसा काय वठतो हें पाहणार आहें."—अशा अर्थाचें मीहि बोलून गेलों. त्यानंतर लवकरच मुजुमदारांनीं निरोप घेतला. त्यापुढें मी कंपनीकडे जाणेंयेणें बंद केलें. नाटक रसिक मंडळीस कसें वाटतें हें पाहण्याकरितां तें मी एके दिवशीं नागपूर येथील प्रसिद्ध हरिपंत पंडित यांस वाचून दाखविलें. तें ऐकून ते फारच खूष झाल्यासारखे दिसले. हें नाटक ' विविधज्ञानविस्तारां 'त प्रसिद्ध केल्यास त्यांतील भाग इतरांनी चोरूं नये अशाबद्दल काय तजवीज करावी असा मी त्यांस प्रश्न केला असतां—" राजाच्या दागिन्यांची कोणी चोरी करीत नाहीं, केल्यास ती लागलीच उघडकीस येते "—असें त्यांनीं उत्तर दिलें. ' मूकनायक ' नाटक ' विविधज्ञानविस्तारां 'त प्रसिद्ध करावें असा विचार माझ्या मनांत चालला होता खरा, पण गेलीं तीन वर्षें माझा त्या मासिकाशीं व्यवहार बंद पडला असतां केवळ नाटकाकरितां त्याजकडे धांव घेणें मला कमीपणाचे वाटलें. परंतु या वेळीं एक चमत्कार घडून आला. माझ्या मनांत हे विचार घोळूं लागल्यानंतर ३—४ दिवसांनीच रामकृष्णपत मोरमकरांचें एक पत्र नागपूर येथेंच माझ्या हातीं आलें. नाडकर्ण्यांनी ' विविधज्ञानविस्तारा 'च्या व्यवस्थेचें काम वृद्धावस्थेमुळें आपले तरुण भाचे—मोरमकर—यांजकडे सोंपविल्यावरून त्यांनीं त्या मासिकास हरतऱ्हेनें मदत करण्याबद्दल मला पत्रद्वारें विनंति केली होती. पत्रांत माझ्या तोंपर्यंतच्या सेवेचा गौरवपर उल्लेख केला होता. पत्राच्या शेवटीं—" आपलें एखादें नाटक ' विविधज्ञानविस्तारां 'त

ासिद्ध करण्याची आपली इच्छा असल्यास तें पाठवून द्यावें.”— अशा र्थाचें एक वाक्य होतें. माझ्या संकल्पास तो शुभशकुन समजून मी तो ायम केला.

## ६

१८९७ साली मी जबलपूर येथें असतां माझे स्नेही मनोहर कृष्ण ोळवेलकर—हे पुढे माझे मेव्हणे झाले—यांनी आपल्या पित्याच्या निधनाची रुण कहाणी सांगितली. त्या कहाणीत आपल्या लहान मुलाचें पुढें कसें ोईल याबद्दलची तीव्र चिंता त्यांच्या अखेरच्या उद्गारांत पूर्णपणें प्रतिबिंबित ालेली स्पष्ट दिसत होती. या कहाणीवरूनच माझी पहिली स्फुट कविता— तो दिन’—लिहिण्याची कल्पना मला सुचली. ती मला माझ्या वडिलांच्या ेधनावरून सुचली असा कित्येकांचा त्यावेळीं समज झाला होता, पण तो ुकीचा होता. ती कविता मी ‘विविधज्ञानविस्तारां’त सन १८९८ चे ारंभी प्रसिद्ध केली. ती बरीच लोकप्रिय झाली. ती ‘मनोरंजनां’त ापण्याची परवानगी घेऊन त्या मासिकाचे संपादक काशीनाथ रघुनाथ ित्र यानी ती त्यांत प्रसिद्ध केली. या वेळेपासून माझा ‘मनोरंजना’शीं ंबंध सुरू झाला. पण तो कांही वर्षे कवितांपुरताच होता. ‘तो दिन’ ा कवितेनंतर ‘अनुपम सुख’ ‘खरी भाऊबीज’ ‘तुळशीचें लग्न’ छत्रीचे उपकार’ व ‘भयंकर जागृति’ या कविता १८९८–९९ ालांत एकामागून एक त्या मासिकांत प्रसिद्ध झाल्या; व ‘एका स्त्रीची र्जन्यविषयक कल्पना’ ‘मृत अपत्याचें शेवटचें चुंबन’ ‘सुखकर जागृति’ स्थित्यंतर’ व ‘विलक्षण न्यायसभा’ या कविता १९००–१९०१ ालांत प्रसिद्ध झाल्या. शेवटच्या कवितेचें रहस्य आपणांस मुळींच कळलें ाही असे नापसंतीचे उद्गार मित्रांनीं काढिल्याचें एका मध्यस्थाच्या तोंडून ानी आल्यावरून व मला कवितालेखनाची मनापासून हौस नसून मी तें द पाडण्याला निमित्तच पाहत होतों म्हणून त्यापुढें बरींच वर्षें मी मनोरंजन’कडे एकहि कविता पाठविली नाहीं. पुढें १९१३ साली माझे नेही व त्यावेळचे ‘मनोरंजन’चे एक संपादक विठ्ठल सीताराम गुर्जर ांच्या विनंतीवरून मी ‘सृष्टिदेवता व हृदयदेवता’ या मथळ्याची

एक कविता त्या मासिकाकडे पाठविली. ती ज्या ‘ काव्यकुंजां ’त आली तो सर्वच कुंज ‘ सिंधुसुता ’ या रसिक लेखिकेस बराच आवडून तिनें त्यावर एक प्रशंसापर कविताहि रचून ‘ मनोरंजना ’कडे पाठविली होती असें मागाहून मला गुर्जरांकडून कळलें. या कवितांशिवाय १९१३ साली माझी ‘ आगगाडी ’ ही कविता ‘ विविधज्ञानविस्तारां ’त प्रसिद्ध झाली, तिचाहि येथेंच निर्देश केलेला बरा.

वरील कवितांपैकी ‘ अनुपम सुख ’, ‘ छत्रीचे उपकार ’, ‘ मृत अपत्याचें शेवटचें चुंबन ’ व ‘ सुखकर जागृति ’ या कविता १९१० साली प्रसिद्ध झालेल्या ‘ अभिनवकाव्यमाले ’च्या पहिल्या भागांत लक्ष्मण गणेशशास्त्री लेले यांनी छापून प्रसिद्ध केल्या. त्यांनी कवितांची निवड अत्यंत मार्मिकपणें केली हें कबूल केलें पाहिजे. पण कवितांची प्रुफें मी मागितलीं असतांहि त्यांनीं मजकडे पाठविली नाहीत हें गैर झालें. त्यामुळें कवितांत अनेक चुका राहून गेल्या.

‘ वीरतनय ’ व ‘ मूकनायक ’ नाटकांतील कविता आतिशय कठिण व मासिकांतून प्रसिद्ध झालेली माझी कविता बरीच सोपी असण्याचें कारण इतकेंच कीं नाटकांतील पदें ज्या चालींवर केलेलीं आहेत त्या चालींस ऱ्हस्व अक्षरांचें बरेंच मोठें प्रमाण व अक्षरांची विशेष मांडणी आवश्यक असल्यामुळें त्यांत संस्कृत शब्दांची योजना करावी लागली व यामुळें त्यांची रचना बरीच दुर्बोध झाली. पण स्फुट कविता, दिंडी, साकी या सोप्या वृत्तांच्या किंवा सोप्या चालींवरील पदांच्या रूपानें बहुधा लिहिली असल्यामुळें व त्यांस कोणतेहि कडक निर्बंध नसल्यामुळें ती कविता सोपी झाली. पहिल्या-पहिल्या संगीत नाटकांतील पदें मी पारशी नाटकांतील पदांच्या चालींवरच बहुधा केलेलीं आहेत. हीं नाटकें माझीं, माझ्या ज्येष्ठ बंधूंची व डॉ. गद्रे वगैरे आमच्या स्नेह्यांचीं अत्यंत आवडीचीं असून त्यांतील चाली मिळविण्याकरितां आम्ही अनेक प्रयोग पाहिले होते. एखादी विशेष चालच घेणें असल्यास माझे बंधु व गद्रे मिळून त्या चालीचें पद प्रयोगांत ज्या वेळीं येई त्या वेळीं नाटकगृहाच्या बाहेर येऊन उभे राहत व पद संपल्यानंतर मेडिकल कॉलेजकडील आपल्या बिऱ्हाडीं परत जात. रिपन नाटकगृहाच्या मागील बाजूस लागूनच एक अरुंद रस्ता असल्यामुळें तें नाटकगृह या दृष्टीनें फार सोयीचें असे.

माझ्या स्फुट कविता मी अत्यंत जलदीनें व सौकर्यानें लिहीत आलों आहें. याचें कारण त्यांच्या चाली फार सोप्या आहेत हें आहे. ‘ अनुपम सुख ’ या कवितेंतील ओळी मी भराभर एकामागून एक लिहीत गेलों. ‘ मृत अपत्याचें शेवटचें चुंबन ’ ही कविता माझा तृतीय पुत्र दांतांच्या दुखण्यामुळें अत्यवस्थ स्थितींत असतां फार थोड्या वेळांत लिहिली. त्याच सुमारास ‘ सुखकर जागृति ’ ही कविताहि मी अतिशय लवकर लिहिली. अलीकडे लिहिलेल्या नाटकांतील पदांच्या चाली बऱ्याच सोप्या असल्यामुळें एकेका नाटकांतील पदें मी ४—५ दिवसांतच तयार केली आहेत.

मी नागपुराहून अकोल्यास परत आलों; पण ‘ मूकनायका ’संबंधानें नागपूर येथें झालेली निराशा मनास इतकी लागून राहिली की लवकरच मला भयंकर ताप भरला. त्या तापांतून उठतों न उठतों तोंच माझ्या हातीं मुजुमदारांचें पत्र पडलें. त्यांत त्यांनीं आपला हेतु ‘ मूकनायक ’ न बसविण्याचा नसून त्यासंबंधानें मी आपला गैरसमज करून घेतला आहे असें लिहिलें असून मला वर्धा मुक्कामीं बोलाविलें होतें. यापूर्वीं नुकतेच रा. देवल वर्धेस कंपनींत आले होते व त्यांना झालेला प्रकार कळल्यावर त्यांनी मंडळीची जी कानउघाडणी केली तिजमुळेंच तें पत्र आलें होतें असें मला मागाहून कळलें. मी लवकरच वर्धेस गेलों. तेथें मंडळीनें नुकतीच ‘शारदा’ नाटक बसविण्यास सुरुवात केली होती. मी ‘ मूकनायक ’ नाटक देवलांस वाचून दाखविलें. त्यांना तें बरेंच आवडलें असावें असें त्यांच्या उद्गारांवरून दिसलें. “ तुम्ही पुढें किती मोठे लेखक होणार आहांत याची नाटकावरून चांगली अटकळ करितां येते. पण घाई करूं नका. ‘ शारदा ’ नाटक बसविल्यावर मी तुम्हांला योग्य सूचना करीन. ”—असें ते म्हणाले. माझा स्वभाव फार उतावळा असल्यामुळें तोंपर्यंत थांबणें मजकडून होणार नाहीं असें मीं म्हटलें, तेव्हां ते ताबडतोब सूचना करण्यास कबूल झाले. मी नाटक पुन्हां वाचावयास सुरुवात केली. परंतु पदोपदी वाटेल तसे आक्षेप पुढें करून माझा हिरमोड करण्याचा देवलांचा संकल्पच दिसला. एका स्थलावर त्यांचा माझा वाद इतका विकोपास गेला की मी वाचन बंद केलें व पुन्हां त्यांस कोणतेंहि नाटक वाचून दाखवावयाचें नाही असा निश्चय केला. ‘शारदा’ नाटक बसल्यानंतर ‘मूकनायक’ नाटक बसविण्याचें मंडळीनें ठरविलें व मी अकोल्यास परत आलों.

१८९८ साली मी अकोल्याची सनद घेतली; व तेथें डिसेंबरपर्यंत पांच-सहा महिने वकिलीचें कामहि केलें. या सुमारास 'किर्लोस्कर मंडळी' कडून बक्षिसाव्यातिरिक्त तीनशें रुपये आले व मी 'वीरतनया'च्या १४०० प्रती मंडळींतीलच व्यंकटराव नांवाच्या इसमास विकल्या. त्यांच्या किमती-बद्दल ७०० रुपये आले. याप्रमाणें जमा झालेल्या रकमेंत कांहीं स्वत:चीं भर घालून मी व माझ्या वडील बंधूंनीं वडिलांना ऋणमुक्त केलें. १८९८ सालांत मी ' अनुपम सुख ' इत्यादि बऱ्याच कविता व ' संगीत नाटकत्रय ' ' मुक्ता ' व 'वीरतनयाची ढाल' हे लेख लिहिले. 'मुक्ता' हा लेख हरिपंत पंडितांस बराच आवडला.

मला १८८९ पासून जडलेला इसबाचा विकार मधून-मधून इतकी उचल खात असे कीं माझे दोन्ही पाय चिडून चालणेंहि जड जाई. अकोला येथें मला अनेक कोर्टांत काम करणें भाग असल्यामुळें अशा प्रसंगीं माझी फार गैरसोय होई. १८९८ च्या नाताळांत माझे पाय इतके चिडून गेले कीं मी अगदीं रडकुंडीला आलों. अकोल्यास राहण्यापेक्षां जेथें एकच कोर्ट आहे अशा गांवीं राहण्यानें मला सुख होईल असें वाटूं लागलें. एकच कोर्ट असून काम मुबलक असें तेल्हारा हें एकच गांव होतें. तेथें जाण्याचा मी संकल्प केला व तो ताबडतोब अमलांतहि आणिला. मी नऊ-दहा वर्षांचा असतां ज्या अधिकाऱ्यांवर कविता केली होती तेच यावेळीं तेल्हारा येथील कोर्टाचे न्यायाधीश होते. मी त्यांच्याच घरीं उतरलों व माझें कुटुंब येईपर्यंत त्यांच्याच घरीं राहिलों. हळूंहळूं काम मिळण्यास सुरवात झाली. तथापि मी व माझा कारकून नवशिके असल्यामुळें बरेच दिवस कामाचा विशेष जम बसला नाहीं.

## ७

' किर्लोस्कर मंडळी ' वर्धेहून एरंडोलास गेली. ती तेथें असतां मला 'मूकनायका'च्या चाली देण्याकरितां मंडळीनें एका लहानशा सुट्टींत तेथें बोलाविलें. मी तेथें गेलों. चाली घेण्याच्या कामावर मिरजकरांची योजना झाली. त्यांस चाली देऊन मी परत आलों. देवल जवळचें एक प्रेक्षणीय स्थान पाहण्याकरितां गेले असल्यामुळें त्यांची या खेपेस भेट झाली नाहीं.

यानंतर मुंबईस 'शारदा' नाटकाच्या पहिल्या प्रयोगास मला 'किर्लो-स्कर मंडळी'कडून निमंत्रण आलें. त्यांस मी उत्तरादाखल असें कळविलें कीं—" 'शारदे'चे प्रयोग पाहण्याची संधि मला पुढें अनेकदां येणार आहे; 'मूकनायका'च्या तालमी सुरू होणार असतील तर मी येईन; मी उमरावती, नागपूर, वर्धा, एरंडोल येथें स्वतःच्या खर्चानें कंपनीकडे गेलों होतों; पण या खेपेस कंपनीनें मला प्रवासाच्या खर्चाचे पैसे दिले पाहिजेत." या पत्रास उत्तरादाखल कंपनीकडून तार आली. त्या तारेंत मला आग्रहाचें निमंत्रण केलें होतें. ही तार माझे स्नेही बाबूराव पंडित यांनी मुजुमदार यांच्या संमतीनें कंपनीच्या त्रिऱ्हाडीं लिहिली होती असें मला मागाहून कळलें. मी मुंबईस गेलों व माझे स्नेही काका महाजनि यांजकडे राहिलों. भाऊरावांनी गोऱ्यांस मजपासून चाली घेण्यास सांगितलें. पण यापेक्षां विशेष आंच कोणा-मध्येंच दिसली नाहीं. मंडळीच्या बिऱ्हाडीं 'शारदे'च्या तालमी चालू होत्या. मी तालमीच्या वेळी गेल्यास देवल माझ्या आवाजांतून एखादी तान किंवा मेंड वाढवून तिचें 'शारदें'तील पात्रांस अनुकरण करावयास सांगत. 'शारदा' नाटकाचा प्रयोग फारच उत्तम वठला. पण मी ज्या कामाकरितां गेलों होतों त्या कामाकडे कंपनीचें दुर्लक्षच होत असलेलें पाहून मनाचा हिरमोड झाला व मंडळीचा मनस्वी रागहि आला. मी निघण्याच्या आदल्या दिवशीं रात्रीं शंकररावांनी गोविंदराव सोरटीच्या हातीं माझ्या प्रवासाच्या खर्चा-करितां रक्कम पाठविली. पण ती आम्हांमध्यें ठरलेल्या रकमेच्या मानानें फारच अपुरी असल्याकारणानें—" ही रक्कम कशाबद्दल आहे हें मला माहीत नाहीं "— असें म्हणून मी ती परत केली. त्यानंतर मुजुमदार स्वतः आले. पण ते येतांना पाहून मी झोंपेचें सोंग घेऊन पडलों. ते बराच वेळ महा-जनींशी बोलत उभे होते. पण त्यांनीं त्यांस प्रवासाच्या खर्चाची रक्कम दिली नाही. दुसरे दिवशी मी परत तेल्हाऱ्यास आलों. इतःपर कंपनीशी संबंध ठेवावयाचा नाही अशी मी मनाशीं खूणगांठ बांधून ठेविली होती.

१८९९ च्या नाताळांत ' किर्लोस्कर मंडळी ' ग्वाल्हेरास होती. तेथून मुजुमदारांनीं पुन्हां मला नाटकाच्या चाली देण्याकरितां बोलाविलें. " आतां नाटक बसविण्यास खरोखर सुरवात करणार आहोंत, शिवाय आपण येथें आल्यास मोठ-मोठ्या लोकांशीं परिचय होऊन आपला बराच फायदा होण्यासारखा आहे "—वगैरे बराच मजकूर निमंत्रणपत्रांत होता. तें

पत्र येण्यापूर्वींच मी माझ्या चुलत्याबरोबर लखनौच्या राष्ट्रीय सभेस जाण्याचें कबूल केलें होतें. पण तें कबूल केलें नसतें तरी मी ग्वाल्हेरास गेलों नसतों. मी मुजुमदारांच्या पत्रास पाठविलेल्या उत्तरांत— " 'मूकनायक' नाटक पुढें येण्यास आपल्या साहाय्याची मला जरूर आहे असें कंपनी समजत असल्यास ती तिची चूक आहे. मी आजपर्यंत कंपनीकडे खेटे घालण्यांत बराच कालापव्यय केला, पण यापुढें तो करण्याची इच्छा नाहीं. "— वगैरे बराच झणझणीत मजकूर लिहिला होता. असो.

मी नाताळांत लखनौस गेलों. तेथें देवलहि आले होते. तेथें काशीनाथपंत छत्र्यांशी प्रथम परिचय झाला. मार्तंडराव दवणे नांवाचे तालज्ञानाविषयी प्रसिद्ध गृहस्थ तेथें आले होतें, त्यापासून मी तालांमधलि बारकाव्यांची बरीच माहिती करून घेतली. राष्ट्रीय सभेनंतर सामाजिक परिषदेची बैठक झाली, तिच्यांत मी माझ्या चुलत्यांच्या इच्छेवरून बालविवाहावर इंग्रजीत भाषण केलें. तयार केलेलें भाषण फार लांब असल्यामुळें रानड्यांनीं दिलेल्या घंटेच्या इशाऱ्यास मान देऊन तें मध्येंच पुरें करावें लागलें.

लखनौहून परत आल्यावर 'मूकनायक' 'विविधज्ञानविस्तारां'त प्रसिद्ध करण्याच्या विचारास जोर आला व त्याप्रमाणें तें १९०० सालीं प्रसिद्ध झालें. पहिला अंक प्रसिद्ध होतांच 'डेक्कन कॉलेजा'तील फेलो गोडबोले यांनीं त्या सालच्या समेलनांत त्या नाटकाचा प्रयोग करण्याची कॉलेजतर्फें परवानगी मागितली. 'किर्लोस्कर मंडळी'कडे इतके खेटे घालूनहि त्याचें चीज होऊं नये व कॉलेजच्या विद्यार्थ्यांनीं एक अंक वाचल्याबरोबर पुढील अंकाची माहिती नसतां प्रयोग करण्यास उत्सुक व्हावें हें पाहून माझ्या डोळ्यांत अश्रु उभे राहिले. मी अर्थातच परवानगी दिली. संपूर्ण नाटक छापून आल्यावर गोडबोले स्वत: नाटकांतील चाली घेण्याकरितां तेल्हाऱ्यास आले. त्यांनी त्या मजकडून वारंवार म्हणवून घेतल्या. पण सर्दीच्या सबबीवर स्वत: त्या म्हटल्या नाहींत. लवकरच नाटकाची रंगीत तालीम झाली. ती फार चांगली झाली असें मला मागाहून कळलें. मुख्य प्रयोग मात्र मुळीच वठला नाहीं. याचें कारण असें कीं पात्रांची बहुतेक मदार पेटीवाल्यांवर होती व पेटीवाले प्रयोगाच्या दिवशीं आले नाहींत. यामुळें गोडबोले वगैरे पात्रांना आळी-पाळीनें पेटी वाजविण्याचें काम करावें लागलें. हे पेटीवाले म्हणजे माझे पुढील टीकाकार सदाशिव

नारायण ठोसर हेच होत. यांचें एक नाटक ( हें नाटक ‘ लीलावती ’च होतें असें वाटतें ) त्यावेळीं तयार असून तें संमेलनप्रसंगी कॉलेजनें करावें असा त्यांचा आग्रह होता. परंतु कॉलेजनें ‘ मूकनायक ’ केल्यामुळें त्यांना साहजिकच वाईट वाटलें होतें.

१९०० सालचे अखेरीस ‘ किर्लोस्कर मंडळी ’चे प्रमुख चालक भाऊराव उदराच्या व्यथेनें आजारी पडले. त्यांच्या जागीं काम करण्यास योग्य असा पुरुष कंपनीच्या सुदैवानें लवकरच मिळाला. हा पुरुष म्हणजे नारायण दत्तात्रय जोगळेकर हे होत. त्यावेळीं वकिलीचा अभ्यास करीत होते. ते बळवंतराव टिळकांच्या संमतीनें कंपनीस मिळाले. यावेळीं कंपनीस नवीन नाटकांची जरूर भासूं लागली. त्यानीं ‘ मूकनायक ’ नाटकाबद्दल मला लिहिलें. मी अर्थातच प्रयोगाची परवानगी दिली; पण मी तालमीकरितां यावें अशी इच्छा असल्यास दुसऱ्या वर्गाचें येतां-जातांचें भाडें आगाऊ पाठवावें लागेल असेंहि त्याबरोबर कळविलें. कंपनीनें ती अट मान्य केली. कंपनी त्यावेळीं बाळासाहेब मिरजकरांच्या आश्रयानें मिरज मुक्कामीं नाटकें बसवीत राहिली होती. मी १९०० सालच्या नाताळांत मिरज मुक्कामी गेलों व चाली सांगून परत तेल्हाऱ्यास आलों. मी निघतांना मंडळींतील सारे इसम माझ्या टांग्याजवळ उभे राहिलेले पाहून माझें मन द्रवून गेलें.

‘ गुप्तमंजूष ’ नाटकाचें संविधानक १८९९ सालाच्या पहिल्या सहामाहींतच तयार झालें होतें. तें नाटक त्या सालच्या मे महिन्यांत लिहिण्याचा विचार होता. परंतु माझे धाकटे बंधु उन्हाळ्याची सुटी घाल-विण्याकरितां तेल्हाऱ्यास सहकुटुंब आल्यामुळें मी मे महिन्यांत नुसतीं पदेंच केलीं, व नाटकाचें गद्य माझे बंधु तेल्हाऱ्याहून गेल्यावर जूनच्या ४ थ्या तारखेपासून १४ व्या तारखेपर्यंत लिहून टाकिलें, तथापि पहिल्या अंकांतील कांहीं प्रवेश व दुसऱ्या अंकांतील पहिला प्रवेश लिहावयाचा राहिला होता; व मी पूर्वीं केलेल्या ८५-९० पदांशिवाय बाकीचीं पदें करावयाचीं राहिलीं होतीं. आठ-दहा दिवस लागोपाठ बसून संपूर्ण नाटक लिहितां येतें हा एक नवाच अनुभव या खेपेस मला आला. यापुढील सारीं नाटकें मी या रीतीनेंच लिहिलीं. असो.

मी ‘ शारदा ’ नाटकाच्या पहिल्या प्रयोगाच्या सुमारास मुंबईस गेलों त्या खेपेस नाटकाचा लिहून झालेला भाग भाऊराव वगैरे मंडळींस

वाचून दाखविला. मात्र तो वाचण्यापूर्वी देवल त्या बैठकीत असतां कामा नयेत अशी अट मी घातली होती. नाटक ऐकून मंडळींची बरीच करमणूक झाली असावी. पण त्यांतील नायिकेचें काम फार मोठें असून तें काम करण्याजोगा इसम कंपनींत नाही या सबबीवर भाऊरावांनीं तें त्या वेळेपुरतें मागें टाकिलें. नाटकाचें कथानक देवलांच्या कानांवर गेलें असावें. कारण ते मला लखनौस भेटले तेव्हां तें त्यांस फार आवडल्याचें त्यांनीं मला बोलून दाखविलें. सौदामिनी नवऱ्यास बुद्धिपुर:सर सोडून जाते त्याबद्दल तारूं फुटून किंवा अन्य रीतीनें तिचा व त्याचा विरह होतो असें दाखवावयास पाहिजे होतें असें त्यांचें म्हणणें पडलें. देवलांशीं पुन्हां नाटकासंबंधानें बोलणें काढावयाचें नाहीं असें मी यापूर्वीच ठरविलें असल्यामुळें मी हूं-हूं करण्यापलीकडे कांहींच केलें नाहीं.

यानंतर मी ' मूकनायका ' संबंधानें मिरजेस गेलों असतां मुजुमदार वगैरे कांहीं इसमांस ' गुप्तमंजूष ' नाटकाचें संविधानक सांगितलें. तें त्यांस आवडून त्यांनीं तें नाटक पुढील मे महिन्यापर्यंत पुरें करण्याची मला विनंति केली. त्याप्रमाणें मी उरलेले प्रवेश लिहून काढिले. उरलेलीं पदेंहि घाई-घाईनें तयार केलीं. त्यांपैकीं १८ पदें तर मी बेळगांवपर्यंतच्या प्रवासांतच लिहिलीं. मंडळी यावेळीं बेळगांवास होती. तेथें मला फार दिवस राहण्यास सवड नव्हती. कारण जून महिन्याच्या आरंभीं माझ्या एका सावत्र बहिणीचा ( हिचें नांव बया आहे ) मनोहर कृष्ण गोळवेलकर या कऱ्हाडे गृहस्थाशीं विवाह होण्याचें ठरलें होतें. या पोटजातींतील विवाहास माझे वडील बंधु फारसे अनुकूल नव्हते; व कनिष्ठ बंधूंची वकिली उमरावतीस नीट चालत नव्हती; म्हणून विवाहाचा सारा खर्च मीच सोसण्याचें ठरविलें होतें. खर्चाची मदार ' मूकनायक ' व गुप्तमंजूष ' या नाटकांबद्दल मिळावयाच्या मोबदल्यावरच होती. बेळगांवास मी सुमारें १०।१२ दिवस राहिलों. त्या अवधींत मंडळीस चाली देऊन मंडळीची नकलांवरून एकदां तालीमहि घेतली. त्यावेळीं येथें भास्करबोवा बखले आले होते, त्यांजपासून व इतर एका-दोघां इसमांकडून नवीन चाली घेऊन त्यांवर पदेंहि केलीं. बेळगांवाहून निघतांना कापड व रोख रुपये मिळून मंडळीनें मला सुमारें ६७५ रुपये दिले. मंडळीची सांपत्तिक स्थिति समाधानकारक नसल्यामुळें ही रक्कम तिच्या

मानानें भारीच होती असें म्हटलें पाहिजे. ‘ मूकनायक ’ व ‘ गुप्तमंजूष ’ या दोन नाटकांबद्दल यावयाची एकंदर रक्कम १६०० रुपये ठरली.



या खेपेस मुजुमदारांचें मन मजविषयीं कलुषित होण्यास एक विशेष कारण झालें. मी सांगलीस गेलों होतों त्यापूर्वीं माझ्या वाटखर्चीची रक्कम त्यांनीं ठरल्याप्रमाणें आगाऊ पोहोंचती केली होती. बेळगांवास जाण्यापूर्वीहि माझा प्रवासाचा खर्च मजकडे आगाऊ रवाना होईल अशा भरंवशावर मी अकोला मुक्कामी त्याची वाट पाहत बसलों. पण रक्कम आली नाही. अखेरीस रक्कम तारेनें रवाना करावी असें मुजुमदार यांस मला कळवावें लागलें. त्याप्रमाणें तारेनें रुपये आले व नंतर लागलाच मी बेळगांवास चालता झालों. झालेल्या प्रकारामुळें मुजुमदारांस साहाजिकच वैषम्य वाटलें. तें त्यांच्या वर्तनांतहि दिसावयास लागलें. ‘ किर्लोस्कर मंडळीं ’त पूर्वी ठराविक माना-पानाच्या बाबी असत. त्यांपैकी नाटककाराचें पान पंक्तीत पहिलें असावयाचें ही एक असे. कंपनीचे मालक आपापल्या पानांपुरत्या निराळ्या पंक्ती मांडावयास लावून आपला बोज राखीत. रामभाऊ किजवडेकर हे मात्र—अंगच्या लीनतेमुळें म्हणा किंवा त्यांचा पक्ष कमी असल्यामुळें म्हणा—नाटककाराच्या पंक्तींत त्याच्या पानाच्या खालचें पान घेत. देवलांचा ‘ मूकनायक ’ ऐकल्यापासून मजविषयी इतका अनुकूल ग्रह झाला होता कीं ते दुपारच्या पंक्तीस जरी पहिल्या पानावर बसले तरी रात्रीच्या पंक्तीस दुसऱ्या पानावर बसून पहिल्या पानावर मला बसवीत. मुजुमदारांचें पान रामभाऊंच्या पानाच्याहि खालचें असे. मी बेळगांवास असतांना एके दिवशीं रात्री मी नाटकांतील शेवटच्या कोरसाची चाल बसविण्यांत गुंतलों आहें हें पाहून मुजुमदार पंक्तींतील पहिलें पान धरून बसले. मला अर्थातच दुसरें पान घ्यावें लागलें. घडलेला प्रकार केवळ चुकीमुळें घडला असावा असें समजून मी त्या दिवशी त्याकडे लक्ष दिलें नाहीं. परंतु दुसऱ्या दिवशीं रात्रीहि तोच प्रकार घडून आला. रात्रीच्या पंक्तीस जोगळेकर नसत, त्यामुळें त्यांस दोन्ही रात्रीचा प्रकार त्यावेळीं कळला नाहीं. पण तिसऱ्या दिवशीं सकाळीं मी आपलें जेवण मंडळीच्या मुख्य पंक्तीच्या

पूर्वींच उरकण्याचा बेत केला व तो अमलांतहि आणला. देवल आपलें जेवण याप्रमाणें पंक्तीच्या पूर्वींच उरकीत असल्यामुळें माझ्या कृत्याचें कोणासहि नवल वाटलें नाहीं. त्याच दिवशीं मी सारा प्रकार जोगळेकरांच्या कानांवर घातला. ते नवे असल्यामुळें त्यांचें मुजुमदारांवर फारसें वजन नव्हतें. तथापि त्यांची कानउघाडणी करण्याचा आपला विचार त्यांनीं मजपाशीं बोलून दाखविला. पण—" मुजुमदारांसारख्या कर्तबगार पुरुषाची कंपनीस जरूर आहे, शिवाय बाब क्षुल्लक असल्यामुळें तिजबद्दल बोभाटा करणें पोरकटपणाचें होईल "— वगैरे बाबी पुढें करून मी तो विचार मोडून काढिला. मी बेळगांवाहून निघण्याच्या पूर्वीं कंपनींतील सर्व इसम मला निरोप देण्याकरितां माझ्या टांग्या-भोवतीं उभे करण्याची खबरदारी मुजुमदारांनीं सांगितल्याप्रमाणेंच घेतली होती.

या सुमारास मुजुमदारांनी पुण्याच्या देव नांवाच्या प्रकाशकाची गांठ घालून दिली. त्यांनीं आम्हांमध्यें ठरलेल्या शर्तींवर १९०१ सालांत 'वीरतनया'ची दुसरी व 'मूकनायका'ची पहिली आवृत्ति व १९०३ सालांत 'गुप्तमंजूषा'ची पहिली आवृत्ति काढिली. सर्व प्रती कापडी बांधणीच्या काढावयाच्या असें ठरलेलें असतां त्यांनी अनेक प्रतींस कापडाप्रमाणें दिसणाऱ्या कागदाची बांधणी केली; 'वीरतनया'च्या पहिल्या आवृत्तीच्या प्रस्तावनेच्या ज्या भागांत मी स्नेह्यांचे आभार मानिले होते तो भाग ती प्रस्तावना छापितांना गाळिला; 'वीरतनया'च्या पहिल्या आवृत्तीत मीं पदांवर नुसते राग व ताल दिले होते त्यांबद्दल त्यांस वाटत असलेल्या चाली घातल्या; 'गुप्तमंजूष' नाटकाची पहिली ५४ पृष्ठें मजकडे न पाठवितांच छापिलीं व याशिवायहि कांहीं प्रकार केले असतील, पण ते मला माहीत नाहीत. अखेरीस देवांनी माझे मुंबईचे मुखत्यार महाजनि यांजवर एक फौजदारी खटला उपस्थित केला व उलट महाजनींनीहि त्यांजवर एक खटला सुरू केला. त्याचा कोर्टाकडून जो निकाल झाला त्यांत महाजनि दोषमुक्त ठरून देवांस महाजनींच्या घराजवळ न जाण्याची व त्यांस त्रास न देण्याची ताकीद मिळाली.

'मूकनायक' प्रसिद्ध झाल्यावर लवकरच त्याजवर 'सरस्वती-मंदिर' नांवाच्या मासिकांत एक प्रतिकूल टीका प्रसिद्ध झाली. ती मुंडले या नांवाच्या गृहस्थांनी लिहिली असून तिच्यांत दामोदरपंत चिपळूणकरांचेंहि अंग होतें असें मागाहून मला चिपळूणकरांकडून कळलें. त्या टीकेंत नाटकास व त्याच्या कर्त्यास

मनसोक्त शिव्या दिल्या होत्या. ‘ गुप्तमंजूष ’ नाटकावर सदाशिव नारायण ठोसर, मराठे वगैरे गृहस्थांनीं १९०५ साली ‘ ज्ञानप्रकाशां ’त ‘ नाट्य-कला-रुक्कुठार ’ नांवाची टीका प्रसिद्ध केली. ती पुढें स्वतंत्र पुस्तकरूपानें छापून निघाली. या टीकेंतील कांहीं भाग मार्मिकपणें लिहिले आहेत, पण तिचा बहुतेक भाग पोरकट व थिल्लर आहे.

‘ गुप्तमंजूष ’ नाटकाचा पहिला प्रयोग १९०१ सालांत झाला. त्यानंतर दोन वर्षांनीं तें छापून निघालें. छापण्यापूर्वीं मी तें त्या वेळीं तेव्हांत्यास न्यायाधीशाच्या जागेवर असलेले गोपाळ वामन बापट यांच्या मदतीनें चांगल्या प्रकारें सुधारलें होतें. देवलांचें कथानकाच्या स्वाभाविकपणाकडे जितकें लक्ष असे तितकेंच बापटांचें असून शिवाय कलेकडेहि त्यांचें विशेष लक्ष असे. त्यांच्याशी झालेल्या वादविवादांत मला एक नवीन दृष्टि प्राप्त झाली. ती दृष्टि माझ्या पुढील नाटकांत व टीकांत ठळकपणें दिसून येते. बापटांपासून मला जसा लाभ झाला तसा मजपासूनहि त्यांस झाल्याचें त्यांनी मजपाशीं एक-दोनदां बोलून दाखविलें आहे. हा वेळपर्यंत त्यांचें लेखन-सामर्थ्य गूढ होतें, त्यास आमच्या वादविवादानें प्रगट होण्यास अवसर मिळाला. त्यांनी त्यानंतर ‘ ज्योतिष्मती ’ इत्यादि कांहीं नाटकें लिहिली. त्यांपैकी ‘ ज्योतिष्मती ’ नाटक दत्तोपंत हल्लयाळकरांची कंपनी कांहीं दिवस करीत असे. त्यांच्या ‘ शांकुतल ’ ‘ मृच्छकटिक ’ इत्यादि नाटकां-वराल टीका ‘रंगभूमी’त प्रसिद्ध झालेल्या असून त्या रसिकजनांस बऱ्याच आवडल्या आहेत.

मी बेळगांवाहून परत येतांना वाटेंत पुण्यास उतरलों, तेव्हां भाऊराव शरपंजरीं पडलेले दिसले. त्यांनी मला ‘ मूकनायकां ’तील व इतर त्यांच्या आवडीची काही पदें म्हणावयास सांगितलीं व ती ऐकून समाधान व्यक्त केंल. या भेटीनंतर ८–१० दिवसांच्या आंतच त्यांचें निधनवृत्त वृत्तपत्रांतून वाचावयास मिळालें.

## ९

इकडे ‘ विविधज्ञानविस्तारां ’तून माझें टीकालेखन चाललेंच होतें. १८९९ च्या पहिल्या सहामाहींत ‘ हिंदुधर्म आणि सुधारणा ’ या पुस्तका-

वरील माझी प्रतिकूल टीका प्रसिद्ध झाली. ती ‘ फर्ग्युसन कॉलेज ’च्या प्रोफेसरांस फार आवडली असल्याचें मला प्रो. भाट्यांकडून मागाहून कळलें. या टीकेच्या प्रती फुकट वाटत असल्यास खर्चाची निम्मी रक्कम आपण देण्यास तयार आहों असें शांताराम अनंत देसाई व इंदूरचे भांडारकर यांचें मोरमकरांस पत्र आलें. १९०१ सालीं ‘ वामन दाजी ओक यांचें पुष्प-भाषात्मक चरित्र आणि वस्त्राच्छादन किंवा वस्त्रें’, ‘दोन समाजविषयक नाटकें’ व ‘ माधवनिधन नाटक ’ या मथळ्यांच्या टीका प्रसिद्ध झाल्या. यावेळीं मजकडून ‘ विविधज्ञानविस्तारा ’स होणाऱ्या मदतीमुळें मोरमकरांकडून माझा अनेक महत्त्वाच्या बाबतींत सल्ला घेण्यांत येत असे. या सुमारास विष्णु मोरेश्वर महाजनि मला भेटले असतां त्यांनी—“ हल्ली ‘ विविधज्ञानविस्तारा ’चे संपादक तुम्ही आहांत असें ऐकतों तें खरें का ? ”—असा मला प्रश्न केला होता. १९०१ साली ‘ मॅकबेथ नाटकाची दोन भाषांतरें ’ या मथळ्याची टीका प्रसिद्ध झाली; व १९०२ साली ‘ गायकवाड सरकारच्या पुस्तकमाले’वरील टीका प्रसिद्ध झाली. या लेखांत मी बेंथॅमच्या वर्गीकरणांच्या धर्तीवर कांहीं वर्गीकरणें केली आहेत. ही टीका सयाजीराव गायकवाडांस फार आवडली व त्यांचें मान्यतादर्शक पत्रहि त्यांच्या खाजगी कारभाऱ्यांच्या मार्फत मोरमकरांकडे आलें. तें वाचून मला अर्थातच फार आनंद झाला.

माझ्या बहुतेक टीकांतून विनोदाची झांक दिसून येत असे. ‘ मुक्ते ’ वरील टीकेसारख्या ज्या टीका केवळ विनोदमय असत त्यातील विनोद शोभून जाई. पण गंभीर टीकांतून एखादेच स्थळीं विनोद—व तोहि अत्युक्तिरूप—दिसल्यास तो अप्रासंगिक वाटे. बडोद्याच्या ‘ ग्रंथमाले ’पैकीं पाकशास्त्रावरील एका पुस्तकावर टीका करितांना मी अशा प्रकारचा अप्रासंगिक विनोद केला आहे. अशा विनोदास स्वतंत्र स्थानच दिल्यास बरें होईल असें मला कित्येक दिवसांपासून वाटूं लागलें होतें. त्या विचारास मूर्त स्वरूप १९०२ सालांत मिळाले. त्याचे पूर्वीं माझ्या वाचनांत जेरोम, मार्क ट्वेन इत्यादि विनोदी ग्रंथकारांचे लेख आले होते. त्या लेखांच्या धर्तीवर ‘ साक्षीदार ’ हा लेख लिहून तो १९०२ साली प्रसिद्ध केला. त्या लेखाचें गुजराथी भाषांतर एका गुजराथी पत्रांत माझे स्नेही लक्ष्मण गणेश महाजनि यांच्या वाचनांत आलें, तेव्हां त्यांनी लेखाच्या खाली तो लेख कोणत्या लेखाच्या आधारें लिहिला होता हें दिलें नसतांहि तो माझ्या एखाद्या

लेखावरून लिहिला असला पाहिजे असा त्यांतील कल्पनांवरून तर्क बांधिला. यानंतरचा माझा विनोदी लेख ' कुलूप ' हा होय. हा १९०३ सालीं प्रसिद्ध झाला. यांतील सर्व कल्पना एका तापांत सुचल्या होत्या. त्यांपैकीं कांहा कल्पना बीभत्स असल्याबद्दल दा. ग. पाध्यांनीं वृत्तपत्रांतून विनाकारण आरड केली. यानंतर त्याच साली पांच विनोदी लेख प्रसिद्ध झाले. त्यांपैकीं पहिला ' शिमगा ' हा होय. ' कुलूप ' या लेखांतल्याप्रमाणें याहि लेखांत हिंदुधर्मावर कोरडे ओढिले असल्यामुळें धर्माभिमान्यांची अशा लेखास अधिकाधिक प्रतिकूलता दिसून येऊं लागली. मोरमकरांकडे या लेखांविरुद्ध अनेक कागाळ्या आल्या. त्यामुळें त्यांनी मला एक टापण नांव धारण करून त्याखाली ही लेखमाला प्रसिद्ध करण्याची सूचना केली. तिला अनुसरून मी पुढील लेखापासून लेखमालेस " सुदाम्याचे पोहे " हें नांव दिलें.

पुढील लेख ' गणेशाचतुर्थी ' हा होय. या लेखाच्या जन्माची कथा गणेशजन्मकथेइतकीच मनोरंजक आहे. माझी चुलतबहीण आवडी उर्फ बनी हिचा हरिपंत घारपुऱ्याशीं पुणें येथे १९०३ च्या मे महिन्यांत विवाह झाला. त्या विवाहाची सूत्रें माझ्या चुलत्यांनी माझ्या स्वाधीन केली होती. अक्षतीची मिरवणूक फार जंगी व थाटाची निघाली. असो. सुधारकी थाटाचा विवाह पुण्यास फार वर्षांत झाला नसल्यामुळें त्यास विघ्नें आणण्याचें धर्माभिमान्यांचें ठरलें होतें, व त्या बेतास अनुसरून त्यांनी अक्षत कसब्याच्या गणपतीजवळ येतांच देवळाचा बाहेरचा दरवाजा बंद करून घेतला. त्या विघ्नाची कुणकुण पूर्वीच आमच्या मंडळीच्या कानी आलेली असल्यामुळें त्यांनी मोठ्या अक्षतीच्या अगोदर भास्करराव थत्ते व एक बाई यांजबरोबर एक छोटी अक्षत पाठविली होती व दरवाजा बंद होण्यापूर्वीच ती देवास मिळाली होती. पण ती गोष्ट त्यावेळी माहीत नसल्यामुळें मी अक्षतीस घडलेल्या विघ्नाचा सूड उगविण्याचा निश्चय केला व तो ' गणेशाचतुर्थी ' हा लेख लिहून पार पाडिला. या लेखानें बरेच धर्माभिमानी लोक खवळून गेले व 'विविधज्ञानविस्तार'कर्त्यांकडे मासिक बंद करण्याच्या धमक्या वर्गणीदारांकडून येऊं लागल्या. पुढील लेख ' गवई ' धर्मपर नसल्यामुळें तो बऱ्याच लोकांस आवडला. त्या वर्षीं आणखी दोन लेख—'हजामतीची नीतिमीमांसा' व ' भविष्यकथनाचीं साधनें ' —प्रसिद्ध झाले. यांपैकी पूर्वोक्त लेखाविरुद्ध विनायक कोंडदेव ओकांनीं एक पत्र 'इंदुप्रकाशां'त प्रसिद्ध केलें. त्यास मी

पुढें इतर टीकांबरोबर ' माझे टीकाकार ' या लेखांत उत्तर दिलें.

बापटांशीं झालेल्या चर्चांमुळें मला जी नवी दृष्टि उत्पन्न झाली म्हणून वर लिहिलें तिची झांक त्या चर्चानंतर लवकरच 'विविधज्ञान-विस्तारां'त प्रसिद्ध झालेल्या 'सौभद्रा'वरील टीकेंत प्रथम दिसून आली. ही टीका १९०३ साली प्रसिद्ध झाली. यापूर्वीं मी केलेल्या अनेक टीका बऱ्याच लोकप्रिय झाल्या असून त्यांपैकी कांहींतून ' मराठी रंगभूमि ' सारख्या पुस्तकांत अनेक उतारे घेण्यांत आले होते. पण त्या टीकांचे विषयीभूत ग्रंथ कांहीं अपवाद वर्ज्य केले असतां फारसे प्रसिद्ध नसल्यामुळें त्यामुळें विशेष खळबळ उत्पन्न झाली नाही. पण 'सौभद्रा'वरील टीकेनें बरीच खळबळ उडविली. त्या टीकेचा उपयोग बेलसऱ्यांनी आपल्या ' शेक्सपियरच्या भाषांतरमाले'तील पहिल्या पुष्पाच्या प्रस्तावनेंत किर्लोस्करांविरुद्ध केलेला पाहून मला फार वाईट वाटलें. शेक्सपियरच्या मागें लपून आधुनिक मराठी स्वतंत्र व कल्पक ग्रंथकारांवर गोळीबार सोडण्याचा जो प्रयत्न अनेक शिखंडींकडून करण्यांत येत असतो त्याच मासल्याचा तोहि प्रयत्न होता. त्यानतर ' अण्णासाहेब किर्लोस्कर यांचें चरित्र ', ' सद्य:स्थितिप्रेरित दोन नवी नाटकें ', ' मराठी भाषेचे संप्रदाय व म्हणी ', ' महामाया व देवयानी अथवा विद्यासाधन ' या मथळ्यांच्या टीका अनुक्रमें १९०५, १९०७-०८, १९१० व १९१४ साली ' विविधज्ञानविस्तारां'त प्रसिद्ध झाल्या. त्या संबंधानें विशेष लिहिण्यासारखें कांहीं नाहीं.

१९०४ साली ' माझ्या भीष्मप्रतिज्ञेचा विजय ' व ' लग्नसमारंभ ' हे दोन विनोदी लेख ' विविधज्ञानविस्तारां'त प्रसिद्ध झाले. त्यांनी धर्माभिमान्यांच्या क्रोधाग्नींत तेल जरी ओतलें नसलें तरी तो धुमसत ठेवला यांत शंका नाही. पण पुढील लेख — ' श्रावणी '— इतका झणझणीत होता की तो 'विविधज्ञानविस्तारां'त प्रसिद्ध करून त्या मासिकाचा बळी घेण्याचें धाडस मला झालें नाहीं म्हणून मी तो 'सुधारकां'त प्रसिद्ध केला. त्यानें पुराणाभिमान्यांचा क्रोधाग्नि भडकून त्यांतून अनेक अपशब्दरूप ठिणग्या मजवर उडूं लागल्या. या व पुढें झालेल्या भडिमारांत सुधारकी म्हणविणाऱ्या वृत्तपत्रांकडून किंवा मासिकांकडून मला मुळींच पाठिंबा मिळाला नाहीं. माझ्या लेखांविरुद्ध मजकूर मात्र त्यांत कधीं-कधीं प्रसिद्ध होत असे. ही नियतकालिकें माझ्या इतर लेखांसंबंधानेंसुद्धां मूग गिळून बसत किंवा प्रतिकूल टीकांना स्थान

देत. अशा स्थितींत मला कांहीं गृहस्थांचें नेहमीं विशेष पाठबळ असे. एक माझे चुलते; दुसरे माझे स्नेही रामचंद्र भास्कर ऊर्फ भाऊसाहेब जयवंत. हे तेल्हारा येथील कोर्टांत मी तेथें गेल्यापासून बरींच वर्षें क्लार्क ऑफ दि कोर्ट होते. त्यांच्यापाशी निवडक इंग्रजी ग्रंथांचा चांगला संग्रह असल्यामुळें माझी वाचनाची उत्तम सोय झाली होती. हे माझ्या विनोदी लेखांस नेहमीं उत्तेजन देत असत. यांचें प्रथम-प्रथम माझ्या नाटकांसंबंधानें फारसें अनुकूल मत नसे. पण माझीं पुढील-पुढील नाटकें यांना फारच आवडूं लागली. यांजविषयीचा आदरभाव मी त्यांस ‘ वधूपरीक्षा ’ नाटक अर्पण करून प्रकट केला. तिसरे गृहस्थ प्रसिद्ध राजारामशास्त्री भागवत हे होत. यांचा माझ्या चुलत्यांशीं चांगला परिचय होता, पण माझ्याशी मुळीच नव्हता. त्यांनीं एकदां माझ्या चुलत्यांस पत्र लिहिलें; त्यांत— “ अलीकडे आपले एक पुतणे ‘ सुदाम्याचे पोहे ’ या नांवाची लेखमाला प्रसिद्ध करीत असतात. ती संपूर्ण होऊन स्वतंत्र पुस्तकरूपानें प्रसिद्ध झाल्यास दहा प्रती मजकडे त्यांची किमत आकारून व्ही. पी. नें पाठवाव्या.”— या अर्थाचा मजकूर होता. त्यानंतर मी जेव्हा मुंबईस गेलों तेव्हां त्यांस मुद्दाम भेटलों. ते माझ्याशीं फारच प्रेमानें वागले. मला ‘पोह्यां’च्या मुष्टि तयार करितांना उपयोगीं पडावी अशी यहुदी वगैरे लोकांसंबंधानें बरीच माहिती त्यांनीं मला दिली. मी या सुमारास ‘ मराठी वाङ्मयांतील विशेष व त्यांचे उगम ’ हा निबंध लिहीत होतों. त्यांतील एका वादग्रस्त विधानास पोषक अशी माहिती मी त्यांस विचारली असतां ती त्यांनीं पत्रद्वारां कळविण्याचें मला अभिवचन दिलें व तें लवकरच पूर्णहि केलें. एकंदरीत त्यांजबद्दल माझ्या मनांत फारच पूज्यभाव उत्पन्न झाला. तो मी पुढें “सुदाम्याच्या पोह्यां”ची पहिली आवृत्ति त्यांस अर्पण करून व्यक्त केला.

माझे स्नेही रा. रा. नरसोपंत केळकर यांस माझा ‘ श्रावणी ’ हा लेख बराच आवडला; पण ते मला पुढें आणण्याची जी खटपट करीत होते तिला माझे असे लेख विघातक होत असलेले पाहून त्यांना बराच विषाद वाटला व तो त्यांनीं पत्रद्वारां माझ्यापाशीं व्यक्त केला. अशा लेखांनी पुष्कळदां इष्ट हेतु बाजूला राहून वाचकांचें मन विनाकारण प्रतिकूल होतें असें माझ्या चुलत्यांचेंहि मत पडलें. म्हणून यापुढील बहुतेक लेख मी बऱ्याच सौम्य स्वरूपाचे लिहिले. ‘ वर्तमानपत्रकर्ता ’ व ‘ मुंबईचा दीपोत्सव ’ हे लेख

१९०४ साली ' विविधज्ञानविस्तारां 'त प्रसिद्ध झाले. यांपैकीं उत्तरोक्त लेख स्वानुभवावरूनच लिहिला होता. यापुढील लेख—' माझे टीकाकार '—पुढील साली त्याच मासिकांत प्रसिद्ध झाला. माझ्या विनोदी लेखांचा ' विविधज्ञान-विस्तारा 'स उपसर्ग पोंहोचूं नये म्हणून ते लेख त्या मासिकांत न देतां इतरत्र देण्याचा माझा विचार झाला होता; व तसें करण्यापूर्वीं तोंपर्यंतच्या साऱ्या टीकांस उत्तर देण्याच्या इराद्यानें तो लेख लिहिला होता. त्यांत विनायक कोंडदेव ओक, पाध्ये वगैरे बहुतेक टीकाकारांचा परामर्श घेतला होता. माझे स्नेही गोविंदराव ओक यांनी श्रीकृष्णाच्या लीलांच्या समर्थनार्थ ' विविधज्ञानविस्तारा 'त एक लेख लिहिला होता, त्यासहि त्यांत उत्तर दिलें होतें. त्याचा राग न धरितां त्या सद्‌गृहस्थानें माझ्याशी पूर्ववत् वर्तन ठेविलें ही गोष्ट त्याच्या थोरपणास साजेशीच होती.

यापुढील विनोदी लेख — ' मुंबईचें प्रदर्शन ' — स्वानुभवावरून लिहिला असून तो १९०५ साली ' करमणूक ' पत्रांत प्रसिद्ध झाला. त्यापुढील त्या प्रकारचे लेख १९१६ सालापर्यंत ' मनोरंजनां 'त व त्यानंतर ' उद्यानां 'त प्रसिद्ध झाले.

' मराठी वाङ्मयांतील विशेष व त्यांचे उगम ' हा लेख १९०४ साली लिहून तयार झाला. तो बरीच वर्षें माझ्याजवळ तसाच पडून होता. १९०९ सालीं बडोदा येथील ' साहित्यसंमेलना 'करितां तो साफसूफ करून पाठवून दिला व त्याच साली ' विविधज्ञानविस्तारां 'त तो प्रसिद्ध केला. त्यांतील बरीच विधानें ग्रथित केलेला असा एक निबंध पुढीलच सालीं त्या मासिकांत दुसऱ्या एका लेखकानें माझ्या लेखाचा निर्देश न करितां प्रसिद्ध केला हें आश्चर्य होय.

या सुमारास ' नटेसन आणि कंपनी 'नें सामाजिक सुधारणेवर प्रसिद्ध लेखनपटु सुधारकांकडून इंग्रजी लेख मागवून ते ग्रंथरूपानें प्रसिद्ध करण्याचा विचार करून अनेक सुधारकांस त्यासंबंधानें विनंतिपत्रें लिहिलीं. त्यांत एक पत्र माझ्या चुलत्यांकडे गेलें. ते त्यावेळी डिव्हिजनल जज्जच्या जागेवर असून त्यांना क्षणाचीहि फुरसद नव्हती. सबब त्यांनी मजकडे व आपल्या एका स्नेह्याकडे ' पुनर्विवाह ' या विषयावर एक-एक निबंध लिहिण्याची कामगिरी सोंपविली. दोघांच्या निबंधांत जो सरस ठरेल तो प्रकाशकाकडे पाठविण्याचा त्यांचा संकल्प होता. माझें इंग्रजी भाषेचें ज्ञान

पहिल्यापासून बऱ्यापैकीं होतें. परंतु कॉलेज सोडल्यापासून इंग्रजी निबंध लिहिण्याचा मला कधीं प्रसंग पडला नव्हता. यामुळें माझ्या चुलत्यांनीं सोंपविलेली कामगिरी मजकडून कशी काय पार पडते याची मला काळजीच होती. निबंधाचें कच्चें साहित्य मी रा. रा. मोरमकरांच्या मदतीनें गोळा केलें व एक महिन्यांत निबंध लिहून माझ्या चुलत्याकडे पाठवून दिला. त्यांनीं तोच पसंत करून ' नटेसन आणि कंपनी 'कडे पाठवून दिला व तो ' Indian Social Reform ' या ग्रंथांत छापून आला. पण त्याची प्रुफें मजकडे छापण्यापूर्वी न आल्यामुळें त्यांत अनेक चुका राहून गेल्या. तो निबंध कांहीं वर्षांनीं पुन्हां छापण्यांत आला. त्यावेळी त्या चुका मी दुरुस्त केल्या. या निबंधांतील बऱ्याच विचारांचा अनुवाद मी पुढें ' प्रेमाभास ' नाटकावरील टीकेंत केला.

## १०

मला विद्यार्थिदशेपासून ज्योतिषाचा फार नाद असे. तेल्हारा येथें वकिली करूं लागल्यानंतर लवकरच ' ग्रहलाघवां 'तील ग्रहसाधनाच्या रीति वाचण्यांत आल्या असतां त्याच्या उपपत्तीबद्दल जिज्ञासा उत्पन्न झाली. परंतु ती कांहीं केल्या लागेना. म्हणून ती अवगत करून घेण्याकरितां मल्लारी दैवज्ञाची टीका मुंबईहून आणविली. त्या टीकेंत वारंवार ' सिद्धांत-शिरोमणी 'चा हवाला दिलेला आढळल्यामुळें प्रथम ' गोलाध्याय ' व नंतर ' गणिताध्याय ' आणविला. त्यांतील ज्या साधनांच्या रीति पाश्चात्य रीतीशीं जुळतांना पाहून फार आनंद वाटला. तथापि जवळ जवळच्या कोणांच्या भुजज्यांमधील अंतर कोटिज्येवर अवलंबून असतें हा सिद्धांत कांहीं केल्या कळेना. त्यावर पाश्चात्य गणितानें प्रकाश पडेल, असें वाटून त्याचें अध्ययन करण्याची आवश्यकता वाटूं लागली. मी विद्यार्थी असतां गणितांत फारच कच्चा असें. प्रवेशपरीक्षेंतील सिक्लेर शिष्यवृत्ति तर माझ्या त्या विषयांतील कच्चेपणामुळेंच गेली होती. माझ्या शंकांचें समाधान करणाराहि कोणी गणितज्ञ माझ्या ओळखीचा नव्हता. या सुमारास मी जबलपुरास गेलों असतां मनोहरपंत गोळवेलकरांचे मामा केशवराव फणसे यांजपाशीं केरोपंतांचें ' ग्रहसाधनाची कोष्टकें ' व अंकगणितापासून शून्ययुतीपर्यंत गणिताच्या

साऱ्या शाखांतील प्रमुख सिद्धांत ग्रथित केलेला एक ग्रंथ अशीं दोन पुस्तकें पाहण्यांत आलीं. पूर्वोक्त पुस्तकांतील तिथीच्या व तारखेच्या साधनाच्या व ग्रहसाधनाच्या रीति मी जबलपूर येथील प्रोफेसर डोळे यांजपासून समजावून घेतल्या. तेल्हाऱ्यास परत येतांना मी तीं दोन्हीं पुस्तकें फणसे यांजपाशीं मागितलीं व त्यांस त्यांचा उपयोग नसल्यामुळें त्यांनींहि तीं मला दिलीं. यानंतर मी उच्च प्रतीच्या गणिताचा अभ्यास कोणाच्या मदतीवांचून सुरू केला. हा अभ्यास जारीनें सुरू करण्यास एक विशेष कारण झालें. याच्यापूर्वीं नुकतीच मी जूल्स व्हर्नेची चंद्रलोकच्या सफरीवरील कादंबरी वाचिली असून तिच्यांत दिलेल्या एका सारणीचें मला मोठें गूढ पडलें होतें. त्या सारणीची उपपत्ती शून्ययुति गणिताच्या अध्ययनाशिवाय कळण्यासारखी नव्हती. अर्थातच तें व त्याच्या अध्ययनास लागणारें शून्यलब्धि पृथक्करणात्मक भूमिति इत्यादि गणित अवगत करून घ्यावें लागलें. मी पहिल्या बी. ए. च्या वर्गात टॉड हंटरच्या त्रिकोणमितीचे पहिले सोळा भाग शिकलों होतों; पण आतां पुढील सर्व भाग वाचावे लागले. तसेंच पूर्वीं स्थितिशास्त्राचेंहि अध्ययन केलें होतें; पण आतां गतिशास्त्राचेंहि करावें लागलें. त्यांतील कांही सारण्यांच्या साह्यानें मी व्हर्नच्या कादंबरींतील सारणी स्थूल मानानें सोडविली. त्यावेळी मला अनिर्वचनीय आनंद झाला. मी आपली रीत ताबडतोब रॅंगलर परांजप्यांस लिहून पाठविली. असो. यानंतर लवकरच मी पाश्चात्य ज्योतिर्गणितावरील गॉडफ्रेचा ग्रंथ वाचावयास घेतला; पण त्यांत मंदफलाच्या सारणीची उपपत्ति अर्धवटच दिलेली असल्यामुळें मला तिच्याकरितां व इतर कांही साधनांच्या रीतीकरितां मेनचा ग्रंथ वाचावा लागला. यानंतर ‘ गणिताध्याय ’ व ‘ गोलाध्याय ’ वाचावयास घेतला. सुदैवानें या सुमारास ‘ गोलाध्याया ’चें वुइलकिनसननें केलेलें भाषांतर वासुदेवशास्त्र्यांच्या टीपांसह नागपुरास वाचावयास मिळालें व ‘ सूर्यसिद्धांत ’हि तेथेंच मिळाला. या सुमारास मी वेंकटेश बापूजी केतकरांचा ‘ ज्योतिर्गणित ’ हा संस्कृत ग्रंथहि वाचून टाकिला. त्याचा व शंकर बाळकृष्ण दीक्षितांच्या ‘ भारतीय ज्योतिःशास्त्र ’ या ग्रंथाचा आर्य व पाश्चात्य ज्योतिर्गणिताची तुलना करण्याचे कामीं मला चांगला उपयोग झाला. जवळ पुरतें साहित्य जमल्यावर मी माझा ‘ भारतीय ज्योतिर्गणित ’ हा निबंध लिहिण्यास सुरवात केली. भारतीय ग्रंथांत विषयाचें ज्या क्रमानें विवेचन केलेलें असतें तो क्रम

बदलून मी पद्धतशीर वर्गीकरणास अनुरूप अशा क्रमाचा अंगीकार केला. पहिल्या भागांत स्थानमापनाच्या व कालमापनाच्या रीती देऊन दुसऱ्या भागांत ग्रहांच्या क्रांतिवृत्तीय स्थानांची व तिसऱ्या भागांत ग्रहणें, युति इत्यादि खगोलीय चमत्कारांचीं साधनें उपपत्तीसह दिली. १९०६ सालीं पहिल्या तीन भागांचा कच्चा खर्डा तयार झाला. त्यानंतर थोड्याच दिवसांनीं भारतीय ज्योतिर्गणितास आवश्यक असणाऱ्या शुद्ध गणिताचें ( pure mathematics ) विवेचन करणारा चौथा भाग तयार केला. हा चतुर्भागात्मक निबंध प्रथम फारच अपूर्ण व अशुद्ध होता; व त्याच स्थितींत तो २–३ वर्षें पडून राहिला. पुढें १९०९ सालीं पुणें येथें एका वेधयंत्रामुळें प्रसिद्धीस आलेले धोंडशास्त्री ज्योतिषी वर्णाी गोळा करण्याकरितां खामगांवास मजकडे आले असतां त्यांनीं माझी ज्योतिःशास्त्रांतील गति पाहून मजकडून आपल्या कांही शंकांचें समाधान करून घेण्याची इच्छा दर्शविली व रोज एक-दोन शंका मला विचारण्याचा क्रम सुरू केला. हा प्रकार १५–२० दिवस चालू राहिला. या अवधीत शास्त्रीबुवांच्या शंकांचें समाधान करण्याकरितां मला समग्र ' सिद्धांतशिरोमणी 'ची उजळणी करावी लागली. माझ्या ज्योतिषाच्या ज्ञानास याप्रमाणें आपोआप मिळालेल्या चालनाचा उपयोग माझा ज्योतिषावरील निबंध शुद्ध व पूर्ण करण्याच्या कामी करण्याचा माझा विचार झाला व त्या कामास लवकरच सुरवात करण्याचें मी ठरविलें. पण शास्त्रीबुवांच्या शंका कांही केल्या थांबेनात. अखेरीस मी एक दिवस मुक्रर करून त्यापूर्वीं उरलेल्या साऱ्या शंका मला विचारण्यास शास्त्रीबुवांस निक्षून सांगितलें. माझा निग्रह पाहून त्यांनींहि आटोपतें घेतलें. ते खामगांवाहून परत जातांना मी त्यांजपासून त्यांच्यापाशीं असलेल्या दोन लहान वेधयंत्रांपैकीं एक गुरुदक्षिणा म्हणून मागून घेतलें. ते गेल्यानंतर मी निबंधाच्या मागें लागलों. एका महिन्यांत पहिला भाग सुधारून लिहिला. पुढें नाताळांत दुसरा भाग व त्यानंतर ५–७ महिन्यांत तिसरा व चौथा भाग लिहून निबंध सुधारण्याचें काम पुरें केलें. तो आपल्या ग्रंथमालेंत प्रसिद्ध करण्याचें दामोदर सावळाराम यंदे यांनीं कबूल केलें. १९१२ सालांत छापण्याचें काम सुरू होऊन १९१३ सालीं तें पुरें झालें. तें चालू असतां निबंधांतील चुका सुधारण्याचेंहि काम सुरू होतेंच. निबंध प्रसिद्ध झाल्यावर मला डोक्यावरून एक मोठा बोजा खालीं उतरल्यासारखें वाटलें. त्या

निबंधाकरितां मी कितीतरी परिश्रम केले होते ! गणितात माझी मुळींहि गति नसतां व कोणाचीहि विशेष मदत नसतां त्यांतील प्रमुख सिद्धांत अवगत करून घेण्यासाठी मी कितीतरी दिवस खर्ची घातले होते ! एक-दोनदां तर मला डोक्यांत सतत घोळत असलेल्या शंकांमुळें महिना-महिना निव्वळ जाग्रणें काढावीं लागलीं होतीं. त्या निबंधाकरितां मी कितीदां तरी आपली प्रकृति बिघडवून घेतली होती ! इतकी वर्षे समंधाप्रमाणें जडलेल्या विषयापासून मुक्त होतांच मला हायसें वाटावें यांत कांहीं आश्चर्य नाहीं. मला पूर्णपणें स्वतंत्र झाल्यासारखें वाटूं लागलें व यापुढें ज्योतिषाच्या वाऱ्यालाहि उभें रहावयाचें नाहीं असा मी निश्चय केला. या निबधांत भारतीय व पाश्चात्य पद्धतींची तुलना व भिन्नभिन्न विषयांची पद्धतशीर रचना या दोन गोष्टी नवीन आहेत. विशेषेंकरून या रचनेबद्दल मला बराच अभिमान वाटतो.

## ११

१९०५ सालच्या सप्टेंबर अखेर वऱ्हाडप्रांत मध्यप्रांतास जोडण्यांत आला. विजयादशमीच्या मुहूर्तावर वऱ्हाडचें सीमोल्लंघन झालें; व त्याच मुहूर्तावर आमचें कोर्टहि मोडण्यांत येऊन त्याजकडे असलेल्या दोन तालुक्यांपैकीं एका तालुक्याचें काम अकोल्यास व दुसऱ्याचें खामगांवास गेलें. अकोल्यास गेल्यास पुन्हां अनेक कोर्टांत जावें लागून पायपीट करावी लागणार या भीतीनें मी खामगांवास जाण्याचा विचार केला व लवकरच तेल्हाऱ्यास राम-राम ठोकला. प्रवासांत पावसाची झड लागल्यामुळें फार त्रास झाला. अदुरा येथें पूर्णा नदीस पूर आलेला असल्यामुळें आम्हांला ती नदी तेथें उतरण्याचा विचार सोडून देऊन निराळ्या रस्त्यानें अकोल्यास व तेथून खामगांवास जावें लागलें. प्रवासांत पावसाची व वाऱ्याची फार पीडा झाल्यामुळें खामगांवास आल्यापासून एक-दीड महिना घरांतील बहुतेक मंडळी आजारी होती. त्यामुळें त्या अवधींत कोर्टांत जाण्यास उत्साह वाटला नाहीं. माझ्या मोकद्दम्यांच्या नेमलेल्या तारखा त्या अवधींत पडत नसल्याकारणानें माझ्या गैरहजेरींत माझें विशेष नुकसान होणार नाहीं असें मला वाटलें. पण ती चूक होती. कारण मी घरीं बसल्यामुळें मी खामगांवास आल्याचें माझ्या अशिलांशिवाय इतर कोणासहि फारसें कळलें नाहीं व यामुळें तेल्हाऱ्याहून

खामगांवास आलेल्या कामापैकीं बहुतेक भाग तेथील दोन वकिलांतच वाटला गेला. माझे श्वशुरहि खामगांव येथेंच वकिली करीत होते. पण त्यांच्या वृद्धत्वामुळें व अंधत्वामुळें त्यांचें काम संपुष्टांतच आलें होतें. असो.

मला खामगांव येथील निर्दिष्ट वकिलांपेक्षां जरी काम मिळत गलें तरी तेल्हाऱ्यापेक्षां माझी पैदास बरीच वाढली. तेल्हारा येथें मी नवशिकाच असल्यामुळें माझी प्राप्ति १००–२०० रुपयांहून अधिक नसे. त्या प्राप्तींतून खर्च वजा जाऊन बचत उरणाऱ्या रकमेंतून मला एका सावत्र बहिणीच्या लग्नाचा सर्व खर्च, दुसरीच्या लग्नखर्चापैकीं मजवर येणारा हिस्सा व माझ्या वडील मुलाच्या मुंजीचा खर्च भागवावा लागला होता. मी खामगांवास आलों तेव्हां मजपाशी फक्त ३००–४०० रुपये शिल्लक होते.

खामगांवास मला दरमहा २५ रु. भाड्याचें घर राहावयाकरितां घ्यावें लागलें; खुर्च्या, कपाटें, पुस्तकें वगैरे साहित्य बाळगावें लागलें; नोकरांची संख्या वाढवावी लागली व इतर खर्चहि वाढवावा लागला. तेल्हारा येथें वर्षांतून एखाद्या वेळींच घरीं पाहुणा यावयाचा, पण खामगांवास पाहुण्यांची ये-जा सारखी सुरू झाली. पुढें-पुढें तर माझ्या घराचा माझे स्नेही थट्टेनें ' रॉयल हिंदु हॉटेल ' या नांवानें निर्देश करूं लागले. पण इतका खर्च भागूनहि दरमहा शिल्लक मागें पडावी इतकें उत्पन्न मला होऊं लागलें. १९०८ सालीं शिलकेंतील रक्कम ३९०० रुपये झाली. त्याच सुमारास एका मारवाड्यानें एक खुली जागा विकावयास काढिली. ती गोष्ट माझ्या कानी येतांच मी ताबडतोब एका मध्यस्थामार्फत ती जागा १४०० रुपयांस त्या मारवाड्याकडून विकत घेतली व तिजवर एक दुमजली घर बांधण्यास आरंभ केला. बांधण्याच्या कामावर देखरेख करण्याचें काम माझे स्नेही रामचंद्र हरि सावरकर यांनीं आपल्याकडे घेतलें होतें व तें त्यांनीं फारच उत्तम रीतीनें पार पाडिलें. खर्चाच्या अंदाजानें मी घाबरून जाऊं नये म्हणून त्यांनीं घरास सारा २५०० रुपये खर्च येईल असें मला प्रथम सांगितलें होतें. पण ती रक्कम अखेरीस ६५०० रुपयांवर गेली. यानंतर १९१२ सालीं त्याच मारवाड्याकडून घराच्या पूर्वेकडील १५०० चौरस फूट जागा १५०० रुपयांस खरेदी घेऊन तिच्यांत एक विहीर बांधली व लहानसा बगीचा केला. त्याच सुमारास पश्चिमेकडील एक १० फूट रुंद व २५–३० फूट लांब जागा एका तेलिणीकडून विकत घेऊन त्या बाजूस

इतरांकडून मोठी इमारत होणें अशक्य करून टाकलें. या एकंदर कामास मला जवळ-जवळ ११०००–१२००० रु. खर्च लागला. पण त्यासाठीं मला कोणाचेंहि कर्जपाणी करावें लागलें नाही. जवळची पुंजी संपल्यास बांधण्याचें काम बंद ठेवावें व पुन्हां शिल्लक जमल्यास तें पुन्हां सुरू करावें असा क्रम चालू होता.

खामगांव येथें पहिली कांही वर्षें मजवर कोर्टाच्या कामाचा फार बोजा असे. पुढें-पुढें वकिलांची संख्या वाढून धंद्यांतील चढाओढीमुळें व्हावयाच्या दुष्परिणामांचा अनुभव येऊं लागला. तसतसें काम कमी व्हावयास लागलें. तरी १९१६ सालापर्यंत मला बरेंच काम असे. इतकें काम असूनहि माझ्या हातून खामगांव येथील तेरा वर्षांच्या अवधींत जितकी ग्रंथरचना झाली तितकी मजकडून पूर्वी कधीहि झाली नव्हती व पुढेंहि होण्याची आशा नाहीं.

‘मूकनायक’ व ‘गुप्तमंजूष’ या दोन नाटकांची मोबदल्याची रक्कम १६०० रुपये ठरली होती. तिच्यांतून बेळगांव येथें मिळालेले ६७५ रुपये वजा जातां मला ‘किर्लोस्कर कंपनी’ कडून ९२५ रुपये घ्यावयाचे होते. ते वास्तविक पाहतां मला कंपनीचे मालक जोगळेकर व रामभाऊ किजवडेकर या उभयतांकडून मिळावयाचे. परंतु मी १९०२ च्या नाताळांत मुंबईस गेलों असतां जोगळेकर व मुजुमदार मला भेटून त्यांनीं त्या रकमेबद्दल रामभाऊ किजवडेकरांचा हवाला घेण्याविषयीं गळ घातली. “रामभाऊंचा व माझा विशेष स्नेह आहे, सबब तुम्ही मला त्यांजकडून रक्कम मागावयास लावूं नका”–असें मी त्यास परोपरीनें सांगितलें, पण त्यांचा फारच आग्रह दिसल्यावरून मी ती गोष्ट कबूल केली, पण लागलीच रामभाऊंकडून यावयाच्या रकमेपैकीं ४०० रुपयांची सूट देण्याचा मनोदयहि त्यांस कळविला. तसें करून स्वतःचें नुकसान करून घेऊं नका असें त्या उभयतांनी मला आग्रहानें सांगितलें. पण झालेल्या प्रकारामुळें माझें मन त्यांजबद्दल विटून गेलें असल्यामुळें मी सुटीचा विचार तहकूब केला नाहीं. ही चारशें रुपयांची सूट वजा जातां उरलेल्या रकमेपैकीं निम्मे-शिम्मे रुपयेच रा. किजवडेकरांकडून वसूल झाले.

मी खामगांव येथें स्थायिक झाल्यावर रा. मुजुमदारांकडून नवीन नाटकाबद्दल निकडीची मागणी होऊं लागली. त्यावेळी माझ्या डोक्यांत

एक पुनर्विवाहविषयक कथानक घोळत होतें. त्यावर नाटक लिहिण्याचा आपला मनोदय मी त्यांस कळविला. व त्यावर लिहावयाचें नाटक पुढें सवडी-प्रमाणें लिहावें, तूर्त दुसऱ्या एखाद्या विषयावर लिहावें असें त्यांजकडून लिहून आलें. पण डोक्यांत एक कथानक घोळत असतां दुसऱ्याचा विचार करणें मला अशक्य आहे असें मी त्यांस कळविल्यावरून त्यांनीं त्या गोष्टीस मान्यता दिली. १९०६ सालचे मे महिन्यांत ' किर्लोस्कर मंडळी ' बार्शी येथें असतां मी तेथें नाटक लिहावयास गेलों. माझ्याबरोबर माझे धाकटे बंधु, माझे आतेभाऊ भास्करराव थत्ते व दोन-तीन स्नेही होते. मजकरितां मुजुम-दारांनीं एका स्वतंत्र घराची योजना केली होती. त्या घरांत आम्ही ५–७ दिवस गप्पागोष्टींत व गाण्या-बजावण्यांत मोठ्या आनंदानें काढिले. त्या दिवसांत मंडळीचे जे प्रयोग झाले त्यांसहि आम्ही गेलों होतों. आम्ही बार्शीच्या रस्त्यांतून फिरतांना लोकांस आम्ही ' किर्लोस्कर मंडळी 'पैकीच वाटून ते आम्हांकडे कुतूहलानें पाहत असत. आम्हांपैकीं हरि शिवराम मुंजे हे फार थट्टेखोर आहेत. त्यांनीं अशा एका प्रसंगीं भास्करराव थत्त्यांच्या स्थूलपणावरून त्यांस बळिरामदादा, माझ्या बंधूंच्या उग्र मुद्रेवरून त्यांस घटोत्कच व अशींच आम्हांपैकीं उरलेल्या मंडळीस त्यांच्या-त्यांच्या विशेष गुणांप्रमाणें ' सौभद्र ' नाटकांतील इतर पात्रांचीं नांवें देऊन आपणांकडे लोक तीं-तीं पात्रें म्हणून अंगुलिनिर्देश करीत आहेत असें विधान केलें. त्याबरोबर आम्हांमध्यें एकच हंशा उडाला. ज्याप्रमाणें परदेशी दूर-दूरच्या प्रांतांतील लोक भेटले असतां ते लवकरच जिवलग स्नेही होतात त्याप्रमाणें देशांतल्या देशांतच पण अगदी एकीकडच्या ठिकाणीं भिन्न-भिन्न वयांची माणसें मिळालीं असतां तीं थोड्याच काळांत एकमेकांशीं अत्यंत सलगीनें वागूं लागतात. भास्करराव थत्ते मजपेक्षां वयानें वीस वर्षांनीं तरी वडील असून वडिलांप्रमाणेंच आम्हांस पूज्य वाटत होते. पण बार्शी येथील स्वतंत्र वाता-वरणांत आम्हांपैकींच ते एक होऊन बसले. या ५–७ दिवसांत रोज संध्याकाळीं जोगळेकर, नारायणराव राजहंस ( हे नुकतेच कंपनींत कृष्णराव गोऱ्यांच्या जागीं आले होते ), मंगळूरकर व पेटी-तबला वाजविण्यास आणखी दोन इसम अशी मंडळी आमच्या बिऱ्हाडीं येऊन पुढें लिहिण्यांत येणाऱ्या नाटकाकरितां चाली देत असत. आमचीं स्नानें आमच्या बिऱ्हाडी होत, पण जेवणें कंपनीच्या बिऱ्हाडी होत. एकदां भोजनप्रसंगी माझ्या

पाहुण्यास किंचित् अपमानकारक अशी एक गोष्ट घडून आली होती, पण आम्ही तिच्याकडे दुर्लक्ष केलें.

माझ्या पाहुण्यांचा परत जाण्याचा दिवस आला, तशी मला फार हुरहुर वाटावयास लागली. आजपर्यंत माझ्या स्नेह्यांच्या पाहुणचाराची सबब तरी होती, पण उद्यांपासून ती नाहींशी होऊन नाटक लिहिण्याचें त्रास-दायक काम करावें लागणार हा विचार फार उद्वेगजनक होता. असो. मी, मुजुमदार, जोगळेकर, बालगंधर्व वगैरे मंडळी पाहुण्यांस पोंचवावयास स्टेशनवर गेलों. आम्हां स्नेह्यांस गांवकरी लोक नाटक-मंडळीपैकींच समजत होते याचें एक ताजें प्रत्यंतर स्टेशनावर आमच्या नजरेस आलें. स्टेशनावरील एका ख्रिस्ती इसमानें आम्हांस कंपनीकडून पुरेशीं तिकिटें येत नाहींत अशी तक्रार करून अधिक तिकिटें पाठविण्याची हरिभाऊ मुंज्यांस विनंति केली. त्याबरोबर मुंज्यांनीं मालकाचा आव आणून लागलीच नाटक-मंडळींतील एका मुलास मुजुमदारांस ताबडतोब बोलावण्यास फर्माविलें, व ते येतांच त्यांस स्टेशनावरील मंडळीकडे अधिक तिकिटें पाठविण्याचा हुकूम सोडिला. मुजुमदारांस आपलें हंसूं दाबतां-दाबतां पुरेवाट झाली, तरी त्यांनीं तें दाबून आपणांस तो हुकूम मान्य असल्याचें कबूल केलें. ख्रिस्ती इसम खूष झाले व आज बुधवार असतां आपल्यासारखे प्रमुख नट बाहेरगांवीं कसे जातात असा त्यानें मुंज्यांस सवाल केला. हजरजबाबी मुंज्यांनींहि ताबडतोब— बुधवारच्या खेळास आमची जरूर नाही, किरकोळ नट कामें करतील. आम्ही शनिवारच्या खेळास परत येऊंच. ''— असा जबाब दिला. असो. हे ५—६ दिवस जितके आनंदाचे गेले त्यापेक्षां अधिक आनंदाचे दुसरे दिवस गेल्याचें मला आठवत नाहीं.

दुसऱ्या दिवसापासून नाटक लिहिण्यास सुरवात झाली. हें नाटक ' मतिविकार' होय. त्यांतील तरंगिणी विहारास सोडून माहेरीं जाण्यास निघते व नंतर चकोर तिचें मन वळवून तिला आश्रमांत राहावयास अनुकूल करितो वगैरे कांहीं महत्त्वाच्या बाबींची सुसंगत घटना मला तोंपर्यंत सुचली नव्हती, व त्यामुळें मी बराच फिकिरींत होतों. पहिल्या दिवशीं मी रात्रीं दहा वाजे-पर्यंत लिहीत बसलों होतों. त्यामुळें डोकें तापून जाऊन पहांटेच्या चार वाजेपर्यंत झोंप आली नाहीं. परंतु दुसऱ्या दिवशीं सात वाजतां उठून पुढील

भाग लिहिण्याच्या विवंचनेस लागावें लागलें. त्या दिवशी संध्याकाळी पांच वाजतांच लिहिणें बंद करून मी जोगळेकरांबरोबर फिरावयास गेलों. गांवाच्या बाहेर पडल्यावर कांहीं वेळ थकवा येईपर्यंत धांवलों व नंतर बिऱ्हाडी परतलों. बिऱ्हाडीं आल्यावर लिहिण्याचें काम न करितां चाली घेण्याचे सुखदायक कामच केलें. या दिवशी बिछान्यावर पडल्यानंतर लवकरच झोप आली. हा अनुभव आल्यामुळें तिसऱ्या दिवसापासून मी दुसऱ्या दिवसाचा कार्यक्रम कायम केला. तिसऱ्या अंकाचा कांहीं भाग लिहून होईपर्यंत मुजुमदारांनी नाटकाची प्रगति समाधानकारक रीतीनें चालली आहे का असा एक-दोनदां प्रश्न केला व त्यास मला नकारार्थीच उत्तर द्यावें लागलें. परंतु उपर्युक्त भानगडीच्या बाबीचा मजकडून समाधान-कारक रीतीनें उलगडा झाल्यावर आपण होऊनच त्यांस नाटक चांगलें होईल असें सांगितलें. नाटक लिहिण्याची सुरवात होईपर्यंत किंबहुना ते भानगडीचे भाग येत तोंपर्यंत त्यांचा घोळ पडून ते लिहितांना त्यांचा आपोआप उलगडा होत जातो व हे भाग संपून नाटक उतरणीला लागलें म्हणजे पुढील भाग लिहिणें फार सुलभ जातें असा मला या नाटकाच्या वेळीं जो अनुभव आला त्याची पुनरावृत्ति पुढील नाटकांच्या लेखनप्रसंगी झाली.

सात दिवसांत नाटक लिहून तयार झालें; व माझ्या डोक्यावरील एक मोठा बोजा उतरल्यासारखें होऊन मला हलकें वाटूं लागलें. शेवटच्या दिवशी रात्री मी मुजुमदारांस नाटक पूर्ण झाल्याचें कळविलें. दुसऱ्या दिवशीं सकाळी मी प्रातर्विधि आटोपून बसतों न बसतों तोंच मुजुमदार, जोगळेकर, राजहंस, बोडस वगैरे नट, सदाशिवराव भावे ( हे त्यावेळी कंपनीत पाहुणे म्हणून होते ), गडकरी ( हे त्यापूर्वी नुकतेच कंपनीत शिक्षक म्हणून नोकरीस राहिले होते ), शंकरराव कुळकर्णी ( ' सुमति 'कर्ते, हेहि त्यावेळी कंपनीबरोबर होते ), देवळे ( हे एक कर्नाटक ब्राह्मण असून त्यांनीं ' उत्तर-रामचरिता 'च्या आधारें एक बऱ्यापैकी संगीत नाटक लिहून तें कंपनीस देण्याकरितां आणिलें होतें )—इत्यादि सुमारें १५—२० मंडळी मजकडून नाटक वाचून घेण्याकरितां माझ्या बिऱ्हाडीं आली. तें पाहून मी अगदीं गोंधळून गेलों. मी नाटक लिहिल्यावर अजून वाचून पाहिलें नाहीं, त्यांत बरेच शब्द व वाक्येंहि गळलीं असतील इत्यादि सबबी पुढें करून मी वाचन टाळूं लागलों. पण मंडळीचा फारच आग्रह पाहून अखेरीस मला त्या

गोष्टीस कबूल व्हावें लागलें. मात्र मी जात्या कातर स्वभावाचा असल्यामुळें वाचनाचे सुरवातीस फार गांगरून गेल्यासारखा झालों होतों. हळू-हळू मन स्थिरावूं लागलें, व एक-दोन प्रवेशांनंतर श्रोतृगण जसजसा अधिकाधिक आकृष्ट होऊं लागला तसतसें मनास अधिकाधिक धैर्यहि येऊं लागलें. वाचन सुमारें सव्वा दोन तास चाललें होतें. नाटक चांगलें वठलें आहे असेच सर्वांचे अभिप्राय पडले व मी त्याचें संगीत रूपांतर लवकरच करून द्यावें अशी कंपनीनें इच्छा दर्शविली. पुनर्विवाहासारख्या अप्रिय विषयावरील नाटक 'किर्लोस्कर मंडळी'सारख्या साधारण सोंवळ्या कंपनीनें आवडीनें बसवावयास घ्यावें ही गोष्ट मला फारच समाधानकारक व उत्तेजक वाटली. मी दोन-तीन दिवसांतच बार्शीहून परत जाण्याकरितां निघणार असल्यानें नाटकाच्या नकलेचें काम जारीनें सुरू झालें. नक्कल करावयास कुळकर्णी, देवळे यांसहि बसविलें होतें असें मला मागाहून कळलें. तेव्हां फार उद्वेग वाटला. कुळकर्णी व गडकरी यांच्या मनांत तें एक शल्यच होऊन बसले. पुढें गडकरी यशस्वी नाटककार होऊन कंपन्यांस छळूं लागले तेव्हां त्या छळाचें एक कारण ते नाटक-मंडळ्या नाटककारांस अत्यंत वाईट रीतीनें वागवितात हें देऊं लागले. असो.

१९०६ चे पावसाळ्यांत 'मतिविकारां'तील पदें लिहून तयार झाली व १९०७ साली तें नाटक रंगभूमीवर आलें. या नाटकानें समाजांत बरीच चळवळ उडविली. यावर बऱ्याच प्रतिकूल टीका होण्याचा संभव होता. परंतु माझे स्नेही नरसोपंत केळकर यांची कांहीशी अनुकूल व कांहीशी प्रतिकूल अशी टीका 'ज्ञानप्रकाशां'त प्रसिद्ध झाल्यामुळें इतर साऱ्या टीका गर्भावस्थेंतच जिरल्या. केळकरांनी आजवर माझ्यावर जे अनेक उपकार करून ठेविले आहेत त्यांतच या टीकेची गणना केली पाहिजे. त्यांनी यानंतर आपला 'सुभाषित व विनोद' हा निबंध मला अर्पण केला तोहि मला पुढें आणण्याच्या उद्देशानेंच.

## १२

माझ्या आयुष्यावर ज्या कांही व्यक्तीचा चिरस्थायी परिणाम झालेला आहे त्यांपैकी एका व्यक्तीशी माझा या सुमारास परिचय झाला. १९०१

सालीं प्रसिद्ध गवई भास्करबुवा बखले यांस मी त्यांच्या कांहीं गायनपटु शिष्यिणींचें गाणें ऐकविण्याची विनंति केल्यावरून त्यांनीं मजबरोबर त्यांचे शिष्य व 'किर्लोस्कर मंडळीं'तील प्रसिद्ध नट चितोबा गुरव यांस देऊन कांहीं नायकिणींच्या घरीं मला जावयास सांगितलें होतें. मी २—३ नायकिणींकडे गेलों. पण त्यांचे अंगचा गर्विष्ठपणा, चालीरीतीचा अभाव वगैरे दुर्गुण पाहून माझें मन लवकरच विटून गेलें व मीं चितोबांपाशीं परत कंपनीच्या बिऱ्हाडी जावयाची गोष्ट काढिली. परंतु—"आणखी एका ठिकाणीं जाऊं. तेथें आपणांस कदाचित् निराळा अनुभव येईल."— असें त्यांचें म्हणणें पडल्यावरून आम्ही त्या ठिकाणीं गेलों. तेथें आमचें एका १८—२० वर्षांच्या बाईकडून स्मितपूर्वक स्वागत करण्यांत आलें असून त्यावर सौजन्याची छटा स्पष्टपणें दिसत होती. या सुमारास भाऊराव कोल्हटकरांचे बंधु अप्पाराव तेथें आले व नंतर लवकरच गाण्यास सुरवात झाली. चिजेच्या पहिल्याच ओळीपासून बाईचें गानकौशल्य दिसावयास लागलें. अप्पाराव गाण्यांतील चांगले दर्दी असून त्यांनीं पूर्वीं अनेक नामांकित गाणीं ऐकिलीं होतीं. पण तेसुद्धां त्या गाण्यानें खूष होऊन गेले. एक-दोन चिजा झाल्यावर गाणें संपलें व आम्ही अतृप्त कर्णांनीं घरीं परत आलों.

यानंतर एक वर्षानें मी मुंबईस दीपोत्सवप्रसंगीं गेलों असतां गोविंदराव देवल मला 'किर्लोस्कर कंपनी'च्या बिऱ्हाडीं भेटले व माझ्या हातीं एक लहान छापील पुस्तक देऊन ते म्हणाले—"हें नाटक एका सुशिक्षित नायकिणीनें लिहिलें आहे. तुमचें या नाटकासंबंधानें अनुकूल मत झाल्यास तें तुम्हीं 'विविधज्ञानविस्तारां'त प्रसिद्ध करावें; प्रतिकूल झाल्यास मात्र कांहीं करूं नये, या अटीवर मी हें पुस्तक तुम्हांस देत आहें. नाटककर्त्री फार मानी आहे व प्रतिकूल टीकेनें तिचा फारच हिरमोड होईल." पुस्तकावर कर्त्रींचें नांव हिराबाई पेडणेकर असें दिलें होतें. नाटकांतील पदांची रचना सरळ व सुंदर असून देवलांच्या कवितेच्या धर्तीवर होती. "कर्त्रींचें हें अपत्य तुमच्याच साह्यानें निर्माण झाल्यासारखें दिसतें"— असें मी त्यांस थट्टेनें म्हटलेंहि पण—"या नाटकाच्या रचनेशीं माझा कांहीं संबंध नाहीं. कर्त्री स्वतःच पद्यरचनेंत कुशल आहे."—असें त्यांनीं मला खात्रीपूर्वक सांगितलें. नाटकांतील पदांच्या चाली कवयित्रीच्या तोंडून ऐकण्याची इच्छा आहे काय असें त्यांनीं मला विचारतांच मी पडत्या फळाची आज्ञा घेऊन

होकारार्थी उत्तर दिलें. तेव्हा त्यांनीं जोगळेकर यांस त्या दिवशी संध्याकाळीं मला बाईच्या घरी घेऊन जाण्यास सांगितलें. त्याप्रमाणें जोगळेकर व मी तेथें संध्याकाळीं गेलों. आमच्या मागून लवकरच देवलहि आले. बाईनें नाटकांतील कांही पदें मधुर स्वरांत म्हणून दाखविलीं. त्या पदांच्या सुंदर रचनेस बाईच्या गानकौशल्याची जोड मिळाल्यावर माझें मन साहजिकच तल्लीन होऊन गेलें. पदें खरोखरच बाईचीं आहेत का असा मीं देवलांस इंग्रजीत प्रश्न केला असतां बाईनें त्याचा भावार्थ ओळखून उत्तर दिलें की—" मला लिहिण्या-वाचण्याचा नाद असल्याचें आपणांस आश्चर्य वाटतें. पण माझ्यासारख्या कितीतरी नायकिणी तो नाद असलेल्या आपणांस सांपडतील. " गेल्या वर्षीं मी जें गाणें ऐकिलें होतें तें याच ठिकाणी व याच बाईचें ऐकिलें होतें असें भाषणाच्या ओघांत बाईच्या तोंडून मला कळून आलें व त्यामुळें मला विशेषच आनंद झाला. घरी जाण्याकरितां उठतांना मी देवलांस 'गुड् नाईट' हे शब्द हंसत-हंसत बोललों, तेव्हां त्यातील गूढ भावार्थ ओळखून ते मला इंग्रजीत रागानें म्हणाले—" ही बाई मला मुलीसारखी आहे. तुम्ही आप्तां-सबंधानें भलताच संशय घेणें रास्त नव्हे. " त्यावर मी दिलगिरी प्रदर्शित करून तेथून निघून गेलों. मागाहून देवलांनीं असें स्पष्टीकरण केलें कीं त्यांचा जो एक भाऊ एका जुन्या नाटक-मंडळीत शिरून राक्षसपुठ्यांत प्रसिद्धीस आला होता त्यानें हिराबाईच्या आईस ( किवा मावशीस ) ठेविलें होतें, त्यामुळे तिच्या कुटुंबाशीं त्यांचा फार दिवसांपासून घरोबा होता, व तिला कविता रचण्यास स्फूर्ति व शिक्षणहि त्यांजकडूनच मिळालें होतें. असो.

त्यावेळीं हिराबाई जोगळेकरांनी ठेविली होती. पण ती गोष्ट देवलांसहि माहीत नव्हती. व मलाहि त्यानंतर ३ वर्षांनीं म्हणजे मी बार्शीस ' मतिविकार ' लिहिण्याकरिता गेलों असतां जोगळेकरांच्या तोंडून कळली. त्यांच्या प्रणयाची हकीकत काव्यमय ( ' रोमॅन्टिक ' ) आहे. हिराबाई त्यावेळी आपल्या एका मावशीच्या देखरेखीखाली राहत असे. त्या मावशीचें मत हिराबाईनें वेश्येचा धंदा करावा असें होतें. पण जोगळेकरावर प्रेम जडल्यामुळें हिराबाईनें त्यांच्याच आश्रयानें फार अल्प वर्षासनावर राहण्याचा हट्ट धरिला व तो तडीलाहि नेला. जोगळेकरांचें शरीर भव्य, चेहरा चित्ताकर्षक व रुबाबदार आणि स्वभाव मोकळा व दिलदार असल्यामुळें ते अशा प्रेमास सर्वथा पात्र होते. त्यांचें प्रेम जडण्याच्या संधीस हिराबाईच्या चाळींतील

नायकिणींनी 'वीरतनया'च्या पहिल्या अंकाचा प्रयोग केला होता व त्यांत हिराबाईनें नायकाचें काम केलें होतें. या प्रयोगास जोगळेकर, गोरे, मिरजकर ( यांस एका वेश्येपासून झालेल्या मुलीनें त्या प्रयोगांत नायिकेचें काम केलें होतें ) वगैरे 'किर्लोस्कर मंडळीं'तील प्रमुख इसम हजर होते. हिराबाई गाण्याप्रमाणें अभिनयांतहि कुशल असल्यामुळें जोगळेकरांचें त्यांजवर प्रेम जडण्यास किंवा जडलेलें प्रेम दृढ होण्यास या प्रयोगाचा बराच उपयोग झाला असला पाहिजे. असो.

मी १९०६ सालच्या दिवाळीच्या सुट्टींत 'मतिविकार' बसविण्याकरितां मुंबईस गेलों तेव्हां जोगळेकरांबरोबर हिराबाईस भेटलों. त्या वेळेपासून आमचा परिचय वाढत जाऊन त्याचें स्नेहांत रूपांतर झालें; व तो स्नेह बरीच वर्षे कायम राहिला. हिराबाईच्या घरी जाण्यापूर्वी मी कधींहि नायकिणीच्या घरी गेलों नव्हतों. 'वीरतनय' बसवितांना मी 'किर्लोस्कर मंडळी'बरोबर होतों तेव्हां नायकिणीच्या घरीं जाऊन गाणें ऐकण्याबद्दल मला अनेकदां आग्रह करण्यांत आला होता; पण मी ती गोष्ट वरच्यावर उडवून टाकीत असे. सौंदर्याबद्दल मला लहानपणापासून आदर असतांहि नायकिणींच्या वर्गाबद्दल मला फारसा आदर नसे. कारण त्या वर्गांतील स्त्रिया निरक्षर, हेंगाडी भाषा बोलणाऱ्या, बाह्य भपक्यानें भुलणाऱ्या व भुलविणाऱ्या, व बहुधा दिमाखखोर, हलकट अशाच असतात. शिवाय माझ्या ओबड-धोबड चेहऱ्यामुळें व बोजड अंगविक्षेपांमुळें त्यांजकडून अपमान होण्याची गूढ भीतीहि माझ्या मनांत वसत असावी. परंतु हिराबाई-संबंधानें तशी भीति बाळगण्याचें मला कारण नव्हतें. त्या वेश्यावर्गास अपवाद होत्या व त्यांना मजसंबंधानें आदरहि होता. अर्थातच त्यांच्याशी स्नेह करण्यांत मला कमीपणा वाटण्यासारखें कांहीं नव्हतें. उलट त्या स्नेहापासून माझ्या नाटकरचनेस साहाय्यच होणार होतें. ज्याप्रमाणें समोर सुंदर नमुना असल्यावांचून चित्रकारास सुंदर चित्र निर्माण करितां येत नाहीं त्याप्रमाणें सौंदर्याची व विभ्रमाची उज्ज्वल कल्पना समोर असल्याशिवाय ललित-वाङ्मयाच्या निर्मितीस आवश्यक अशी स्फूर्ति उत्पन्न होत नाही असा माझा आजपर्यंतचा अनुभव आहे. बुद्धिहीन मनुष्याचें सौंदर्य आजपर्यंत माझ्या मनास कधींहि पटलें नाही. अंतरंगांतील विचारांमुळें व विकारांमुळें ज्या चेहऱ्यावर तात्बडतोब विकार दिसून येत नाहीत त्यास पाहिजे तर रूढ

अर्थानें सुंदर म्हणावें; पण तो विभ्रमयुक्त नसल्यामुळें त्यास परमार्थतः सुंदर म्हणतां येणार नाहीं. याप्रमाणें माझ्या मनांत सौंदर्याची बुद्धीशीं दृढ सांगड जडल्यामुळें व आपणांकडील स्त्रियांचीं मनें बहुधा असंस्कृत असल्यामुळें बरीच वर्षे स्त्रियांच्या सौंदर्यापेक्षां मुलांच्या सौंदर्याचाच माझ्या मनावर विशेष अनुकूल ग्रह होत असे. जुन्या ग्रीक लोकांमध्यें व आधुनिक मुसलमान लोकांत स्त्रियांपेक्षां मुलांवर वैषयिक प्रेम करण्याचा जो परिपाठ दिसून येतो त्याचें रहस्य मुलांप्रमाणें स्त्रियांच्या चेहऱ्यावर बुद्धीचें तेज दिसून येत नाहीं हेंच असावें असें वाटतें. माझे विद्यालयीन स्नेही रघुनाथ शंकर रानडे यांचें सौंदर्य मी बरेच दिवस नाटकरचनाप्रसंगीं समोर आदर्श म्हणून ठेवीत होतों. हिराबाईशी परिचय झाल्यापासून एका बुद्धिमान् स्त्रीच्या सौंदर्याचा व विभ्रमाचा एक बराच चांगला आदर्श मिळाल्यासारखा होऊन माझ्या सौंदर्याभिरुचीचें पोषण होऊं लागलें, व त्याचा परिणाम माझ्या पुढील कृतींवर दिसूं लागला. माझ्या नाटकांतील नायकांपेक्षां नायिका अधिक सचेतन व चित्ताकर्षक वाटतात असें म्हणतात. त्याचें कारण माझ्या मनावर जनानी सौंदर्याचा जसा शीघ्र व चिरस्थायी ग्रह होतो तसा मर्दानी सौंदर्याचा होत नाहीं हें असावें. तथापि माझ्या नायिकांकडे विशेष बारकाईनें पाहिल्यास १९०६ सालाच्या पूर्वीं जन्म पावलेल्या नायिकांपेक्षां त्यानंतर उदयास आलेल्या नायिका अधिक स्वाभाविक दिसून येतील. याचें कारण पूर्वोक्त नायिका रेखाटण्याचे वेळीं मला केवळ कल्पनेचाच आधार असे व उत्तरोक्त नायिका रंगविण्याचे प्रसंगीं कल्पनेस अनुभवाचें पाठबळ असे हें होय.

## १३

या सुमारास दुसऱ्या एका व्यक्तीशीं माझा परिचय झाला. मात्र तिजपासून मला प्रेरणा न होतां मजपासून तिला मिळाली. ही व्यक्ति म्हणजे प्रसिद्ध कवि, नाटककार व विनोदी लेखक राम गणेश गडकरी हे होत. यांच्या नांवाचा निर्देश वर नुकताच करण्यांत आला आहे. हे प्रथम माझ्या द्वेष्टयांपैकीं होते. माझी नाटकें स्वतंत्र नसून इतर पुस्तकांच्या आधारें लिहिलेलीं आहेत असा यांचा समज असे. पण तो केवळ दुराग्रह आहे

अशी यांची बऱ्याच वाचनाअंतीं खात्री झाल्यावर ते माझ्या नाटकांचे निस्सीम भक्त बनले. ' नाट्यकलारुक्कुठारां 'त ' गुप्तमंजूष ' नाटकाचें वेड लागलेली जी व्यक्ति त्या पुस्तकाच्या कर्त्यांनी वर्णिली आहे तिचें मूळ गडकरी हेच होत. मी बार्शीला जाण्यापूर्वीं पुण्यास असतांना हे माझी भेट घेण्याचा प्रयत्न करीत होते. मी संध्याकाळीं बहुधा बुधवारांतील पंपूशेट ( मुजुमदारांचे स्नेही व ' किर्लोस्कर कंपनी 'चे हितचिंतक आहेत ) नांवाच्या गंध्यांच्या दुकानीं बसत असे, म्हणून ते मला पाहण्याला त्या दुकानापासून कांही अंतरावर येऊन उभे राहत. परंतु त्यांची-माझी दृष्टादृष्ट मी बार्शीला जाईपर्यंत झाली नाही. त्या सुमारास त्यांना कांही कारणामुळें वैराग्य उत्पन्न झालें असून ते वेडे होण्याच्या मार्गाला लागले होते; परंतु माझ्या लेखांनी त्यांच्या मनाला खाद्य पुरवून त्यांचें वेडापासून रक्षण केलें असें ते पुढें-पुढें म्हणत असत. त्यांच्या भक्तीचें कारण कोणतेंहि असलें तरी तिच्याइतकी उत्कट व अकृत्रिम भक्ति या काळांत फारच विरळा दिसून येते. तिची कांहीशी छटा त्यांच्या ' प्रेमसंन्यास ' नाटकाच्या अर्पण-पत्रिकेंत दिसून येते. त्यांचा माझ्या नाटकांवरील व्यासंग व मजवरील प्रेम एका प्रसंगी चांगलेंच प्रत्ययाला आलें. माझ्या नाटकांतील निवडक उतारे काढणारास ' किर्लोस्कर मंडळी 'नें एका संमेलनाचे प्रसंगीं बक्षीस ठेविलें होतें. पण अखेरच्या दिवसापर्यंत एकहि निबंध लिहून आला नाहीं. ती गोष्ट जाहीर झाली असती तर ती एक थट्टेचा विषय होऊन बसली असती. परंतु गडकऱ्यांनी मुजुमदारांच्या सूचनेवरून अत्यंत अल्प अवधींत एक निबंध तयार केला. मुजुमदारांनी बक्षिसाचा निकाल जाहीर करतांना त्या निबंधाशिवाय आणखी दोन-तीन निबंध बक्षिसाकरितां आले असें म्हटलें होतें, पण तें खरें नव्हतें.

येथें माझ्या आणखीहि एका स्नेह्यासंबंधानें संक्षिप्त माहिती दिली असतां अनाठायी होणार नाहीं. ' मूकनायक ' नाटक प्रसिद्ध झाल्यानंतर लवकरच म्हणजे १९०१ च्या सुमारास मजकडे मुंबईहून विठ्ठल सीताराम गुर्जर या नांवाच्या एका विद्यार्थ्याचें त्या नाटकासंबंधानें स्तुतिपर पत्र आलें. त्यांत त्यानें दृढ परिचयाची इच्छाहि दर्शविली होती. मी नेहमी प्रेमाचा अत्यंत भुकेलेला असल्यामुळें या नूतन परिचयाला आपली मान्यता दर्शविली. यानंतर मी १९०२ चे नाताळांत मुंबईस गेलों असतां तेथें नाटकगृहांत

आम्हां उभयतांची गांठ पडली. उभयतांच्या अभिरुची, मनें वगैरे जुळल्यामुळें आमच्या ओळखीचें लवकरच अत्यंत गाढ स्नेहांत पर्यवसान झालें. पुढें गुर्जर ' मनोरंजना 'चे एक संपादक झाल्यावर आमच्या स्नेहास विशेषच गाढता आली. तो स्नेह १९१८ च्या मे महिन्यापर्यंत जवळ-जवळ सारख्याच उत्कटतेंत कायम राहिला. या अवधींत मी जी जी नाटकें लिहिली त्या संबंधानें सूचना, प्रुफें तपासणें वगैरे कामांत गुर्जरांनीं मला बरीच मदत केली. ' मतिविकारां 'तील " तो नीलकंठ दयाळु ", " नच दे दोष कोणी ", " माता करी प्रीति ", " स्थानें एका वस्तुसि ", " प्रेम हो परि निजानुरागें ", " तनु ही स्वीकरुनी ", " हृदय मम रमण हा नेत ", " विकल कारिति तव बोल " व " पादि याच गुंतुनी जाइ " हीं ९ पदेंहि त्यांनीं रचली. त्यांतील बहुतेक आशय मात्र माझाच आहे. गुर्जरांची काव्य-रचना नेहमीं मनोरम व सरस असते हें त्यांच्या ' प्रणयमुद्रा ' नाटकांतील ( हें नाटक मलाच अर्पण केलें आहे ) व इतर कवितांवरूनहि दिसून येईल. याशिवाय माझ्या इतर लेखांवर अभिप्राय प्रगट करून व त्यांना उत्तेजन देऊनहि त्यांनी मला उपकृत केलें. माझें मुंबईतील कोणतेंहि काम असो, गुर्जरांनी ताबडतोब करावें.

' स्वदेशहितचिंतक ' नामक नाटक-मंडळीचे मालक जनुभाऊ निमकर यांनी ' वीरतनय ' नाटकाविरुद्ध बरीच खटपट केल्याबद्दलचा मजकूर यापूर्वीं आलाच आहे. त्यांचें व मुजुमदारांचें जें वैमनस्य होतें तें फारच तीव्र स्वरूपाचें होतें. त्याचाच परिणाम ' वीरतनया 'स भोंवला होता. १९०५ साली जनुभाऊंनी कृष्णराव गोऱ्यांस ' किर्लोस्कर मंडळीं 'तून ' स्वदेशहित-चिंतक मंडळी 'त काढून नेलें, त्याचाहि संबंध त्या वैराशींच होता. गोरे ' स्वदेश-हितचिंतक नाटक मंडळीं 'त गेल्यावर त्यांस साहजिकच त्या कंपनीकडून ' किर्लोस्कर मंडळी 'ची नाटकें व्हावींशी वाटूं लागलीं. त्यांनीं ' मूक-नायका 'च्या प्रयोगाची मजपाशीं परवानगी मागितली व मीहि ती आनंदानें दिली. त्या कंपनीचा त्या नाटकाचा प्रयोग ' किर्लोस्कर मंडळी 'च्यापेक्षांहि सरस वठत असे. असो. ' मतिविकार ' नाटक तयार झाल्याचें कळतांच जनुभाऊंनीं त्या नाटकाबद्दल मागणी घातली व मोबदल्यादाखल १००० रुपये देण्यासहि ते कबूल झाले. मी तें नाटक ' किर्लोस्कर मंडळी 'करितां लिहिलेलें असल्यामुळें व जोगळेकरांनी त्याबद्दल जनुभाऊंइतकेच रुपये देण्याचें

कबूल केल्यामुळें मी तें ' स्वदेशहितचिंतक मंडळी 'स देण्याचें नाकारिलें. जोगळेकरांनीं याप्रमाणें १००० रुपये देण्याचा स्पष्ट करार केला असतांहि ' मतिविकारा 'चे प्रयोग सुरू होऊन बरेच दिवस झाले तरी त्यांजबद्दल त्यांजकडून पैसे मिळण्याचें मुळींच चिन्ह दिसेना. विशेष ऋणानुबंध असलेल्या गृहस्थांपाशीं पैशाची गोष्ट काढणें माझ्या नेहमी जिवावर येतें. माझ्या स्वभावांतील हें मर्म मुजुमदारांनीं व जोगळेकरांनीं ओळखिलें असून त्यांनीं ' मतिविकारा 'च्या रकमेसंबंधानें त्याचा चांगलाच फायदा करून घेतला. अखेरीस त्रासून मी पुढें कोणतेंहि नाटक ' किर्लोस्कर मंडळी 'स न देण्याचा निश्चय केला. इतकेंच नाहीं, तर पुढील नाटक गद्यरूपानें व ' किर्लोस्कर मंडळी 'स करावयास जड जाईल असें लिहावयाचें ठरविलें व त्याकरितां त्या नाटकांत जुळी भावंडें घालण्याचा संकल्प केला.

त्यापूर्वीं मी डयूमाचें ' Count de Bregelon ', मार्क ट्वेनचें ' Prince and Pauper ' व इतर कांहीं ग्रंथकारांची दोन-तीन सदृश पुस्तकें जुळ्या भावंडांसंबंधाच्या संविधानकांचीं वाचिलीं होतीं. त्यांमधील कथानकांच्या धर्तीवर नवीन नाटकाचें संविधानक रचिलें व ८—१५ दिवसांत सुरू होणाऱ्या उन्हाळ्याच्या सुट्टीत नाटक लिहिण्याचें मुक्रर केलें. परंतु हिंदुधर्मशास्त्राप्रमाणें जुळ्या भावंडांत वडील कोण व धाकटा कोण ठरतो हें मला आठवत नसल्यामुळें प्रारंभीच एक मोठी अडचण येऊन उभी राहिली. आधीं जन्म पावणारा जर वडील ठरता तर नाटकाचा एक आधारस्तंभ ढांसळल्यासारखा झाला असता. माझ्या शंकेचें निरसन करून घेण्याकरितां मी अनेकांस विचारून पाहिलें; पण कोणासच निश्चयात्मक उत्तर देतां येईना. सुट्टी ४—५ दिवसांवर येऊन ठेपली व माझें मन फारच अस्वस्थ झालें. इतक्यांत ' विविधज्ञानविस्तारा 'चा ताजा अंक हातीं आला. त्यांत मला पडलेल्या कोड्याचा समाधानकारक रीतीनें उलगडा केलेला आढळला. तो उलगडा माझ्या नाटकाच्या संविधानकास पोषक असाच होता. दैव माझ्या नवीन नाटकाच्या लेखनास अनुकूल आहे असें लागलीच माझ्या मनानें घेतलें. माझ्या नाटकाच्या संविधानकांत एक विवाहित जोडपें अनेक वर्षें शुद्धभावानें एकत्र राहतें असा भाग होता. तसा भाग आरंभींच असलेली झोलाची ' रोम ' नांवाची कादंबरी याच सुमारास माझे हातीं

पडून माझ्या मनांत उत्पन्न झालेली श्रद्धा दृढतर झाली. दैवावर माझा पूर्वीपासूनच विश्वास होता. तो विश्वास उत्पन्न व दृढ होण्यास अनेक कारणें झाली होतीं. माझ्या हातीं विशेष शिल्लक जरी कधीं राहत नसे तरी मला पैशाची फारशी अडचणहि कधीं पडली नाहीं. एखाद्या वेळीं एखादी मागणी भागविण्याचा प्रसंग पडल्यास ती भागविण्यापुरती रक्कम कोणीकडून तरी माझ्या हातीं येत असे. कधी-कधी तर बरोबर मागणीइतकीच रक्कम हातीं येई. असे अनुभव बरेच आल्याकारणानें माझा दैवावर बराच विश्वास बसला होता. त्यास नवीन नाटकासंबंधानें आलेल्या अनुभवानें बळकटी आली.

१९०८ सालची उन्हाळ्याची सुट्टी सुरू झाल्यानंतर ५–७ दिवसांतच नाटक लिहिण्यास आरंभ केला व तें साडेपांच दिवसांत संपविलें. या नाटकांतील नायिकेचा स्वभाव हिराबाईबद्दलची माझी या वेळी जी कल्पना होती तिच्यावरून रेखाटला होता. नाटकाचें नांव ‘ प्रेमशोधन ’ असें ठेविलें होतें. मला स्वत:च्या लेखनसामर्थ्याबद्दल प्रथमपासूनच अत्यंत अविश्वास असे. नाटक लिहिण्यास सुरवात करितेवेळीं तें आपल्या हातून पुरें होईल कीं काय अशी शंका, व तें पुरें झाल्यावर त्याच्या गुणांबद्दल संशय, व यापुढें आपल्या हातून दुसरें नाटक होण्याचा संभव नाहीं अशी खात्री,— हे भाव प्रत्येक नाटकाच्या जन्मकाळी माझ्या अनुभवास आले आहेत. इतर लेखांसंबंधानेंहि माझा हाच अनुभव आहे. ‘ प्रेमशोधन ’ नाटकाची प्रत माझे त्यावेळचे कारकून शंकरराव जोशी यांजकडून ५–७ दिवसांत करून घेऊन मी त्या प्रतीसह मुंबईस गेलों. हिराबाई व गुर्जर यांस प्रत दाखविण्यास प्रथम धीरच होईना. त्यांनी ती वाचून तिजवर अनुकूल अभिप्राय दिला तेव्हां कोठे माझा जीव खाली पडल्यासारखा झाला.

यानंतर १९०९ च्या एप्रिल महिन्यांत खामगांव मुक्कामी ‘ महाराष्ट्र नाटक मंडळी ’ आली असतां तिच्यांतील गणपतराव भागवत, कारखाननीस वगैरे प्रमुख इसमांनी तें वाचिलें. तें त्यांना बरेंच आवडल्यासारखें दिसलें. परंतु गणपतराव भागवतांनीं किंवा इतरांनीं त्याबद्दल निश्चित मागणी केली नाहीं, त्यामुळें त्यावेळीं ती गोष्ट तितकीच राहिली. मजकडून नाटकाबद्दल जबर रकमेची मागणी होईल अशी भागवतांस भीति वाटत असल्याचें त्यांच्या वर्तनावरून व कांही उद्गारांवरून मी अनुमान केलें.

यानंतर मुजुमदारांनीं नाटकाबद्दल पत्रोपत्रीं मागणी केली. परंतु हें नाटक गद्य मंडळ्यांकरितां लिहिलें असून त्यांतील जुळ्या भावांचीं कामें करण्यासारखे सदृश तोंडवळ्याचे नट किर्लोस्कर मंडळींत नाहीत असा मी त्यांस जबाब पाठविला. जोगळेकरांचा विशेष राग येण्याला या सुमारास एक कारणाहि घडलें होतें. 'मतिविकारा'ची रक्कम केव्हां देणार असा गुर्जरांनी त्यांस प्रश्न केला असतां कोल्हटकरांनी मागितल्याशिवाय रक्कम देण्याचा विचार नाही असें त्यांनीं उत्तर दिलें होतें, व तें गुर्जरांनीं मला कळविलेंहि होतें. माझ्या संकोची स्वभावाचा गैरवाजवी फायदा घेऊन वर ती गोष्ट त्यांनीं बोलून दाखवावी या गोष्टीची मला फार चीड आली होती. माझा मुजुमदारांस वर लिहिल्याप्रमाणें जबाब गेल्यावर मुजुमदार, जोगळेकर, बोडस इत्यादि कांही प्रमुख मंडळी १९०९ सालच्या अखेरीच्या सुमारास खामगांवास आली व त्यांनीं मला नाटकाबद्दल आग्रहाची मागणी केली. मंडळीच्या मागील वर्तनामध्यें व माझे पक्षपाती स्नेही रामभाऊ सावरकर यांजमध्यें निकराचें भांडण झालें. अखेरीस मी मोठ्या नाखुषीनें 'किर्लोस्कर मंडळी'स 'प्रेमशोधना'च्या प्रयोगाची परवानगी देण्यास कबूल झालों. प्रयोगाचा अव्यभिचारी अथवा असाधारण अधिकार ('मोनोपॉली') घेण्याची जोगळेकरांनी इच्छा दर्शविली. पण मी त्यापूर्वींच नुकतेंच 'स्वदेशहितचिंतक मंडळी'स प्रयोगाची परवानगी देण्याचें कबूल केलें असल्यामुळें ती गोष्ट मी ताबडतोब अमान्य केली.

यानंतर १९१० च्या मार्च महिन्यांत मी १० दिवसांतच नाटकांतील पदें तयार केलीं. कचेरीचें रोजचें काम साधून रोज आठ-दहा पदें रचीत असें. पदें तयार झाल्यावर लवकरच जी शिमग्याची सुट्टी आली तिच्यांत तीं पदें घेऊन मी 'किर्लोस्कर मंडळी'कडे वर्धेस गेलों. त्यांपैकी ज्या १०–२० पदांच्या चाली मंडळीस आवडल्या नाहींत त्यांबद्दल मंडळीच्या आवडीच्या चाली त्याच सालच्या ईस्टरनंतर दोनच दिवसांत करून देऊन मी त्या नाटकातून मोकळा झालों.

'वीरतनया' नंतर नाटक स्वतःच्या देखरेखीखालीं बसविण्याचा योग मला पूर्वीं कधी आला नव्हता तसा तो याहि खेपेस आला नाही. पुढील उन्हाळ्याच्या सुट्टीत पुण्यास गेलों तेव्हां खाडिलकरांची 'किर्लोस्कर मंडळी'शी बरीच घसट दिसून आल्यावरून व त्यांचें 'मानापमान' नाटक

त्या कंपनीकरितां तयार होत असल्यावरून मी त्यासच 'प्रेमशोधना'च्या तालमी घेण्याची विनंति केली व ती त्यांनीं मान्यहि केली.

त्यानंतर लवकरच 'प्रेमशोधन' नाटक प्रयोगरूपानें बाहेर आलें. नाटकांतील कांहीं भाग फार बीभत्स आहे अशी एक खोटीच बातमी हरिभाऊ आपट्यांच्या कानांवर गेल्यामुळें ते त्यावरून बरेच चिडून गेले. गोविंदराव कानिटकर तर इतके चवताळून गेले की त्यांनीं त्यावर टीकास्त्र उपसलें व त्याचा 'ज्ञानप्रकाश' द्वारां भडिमार करण्याकरितां तें हरिभाऊ आपट्यांच्या मार्फत त्या पत्राकडे पाठविलें. टीका त्या पत्रांत छापून आली. तिला समर्पक उत्तर मथुराबाई चाफेकर (हल्लीं मथुराबाई द्रवीड) यांनीं 'विमला' या सहीनें त्याच पत्रांत दिलें. बाई लेखनात फारच निष्णात असल्यामुळें त्यांनीं कानिटकरांच्या टीकेच्या चिंधड्या उडविल्या होत्या. त्यानें तर ते फारच बेफाम झाले व त्यांनीं 'विमले'स उद्देशून शिव्या-शापांनीं परिपूर्ण असें एक असभ्य प्रत्युत्तर 'ज्ञानप्रकाशा'कडे प्रसिद्धीकरितां पाठविलें. त्या पत्राचे संपादक त्या प्रत्युत्तरांत बरेच फेरफार केल्याशिवाय तें छापण्यास कबूल होईनात. हरिभाऊंनीं बरीच मध्यस्ती केली, पण तिचा कांहीं उपयोग झाला नाहीं. अखेरीस त्या प्रत्युत्तरांत बरीच छाटाछाट होऊन तें प्रसिद्ध झालें. या भानगडींत हरिभाऊ आपट्यांचा जो पाणउतारा झाला त्यामुळें ईर्षेस पेटून त्यांनीं 'सुधारक' पत्र पुन्हां चालू केलें. हें सारें वर्तमान माझे स्नेही व 'ज्ञानप्रकाशा'च्या संपादकवर्गांतील एक प्रमुख गृहस्थ गोपाळराव देवधर यांजकडून मला मागाहून कळलें. कानिटकरांचें प्रत्युत्तर छापण्याचें नाकारण्यांत त्यांचेंच अंग असावें असें मला वाटतें. हरिभाऊ आपट्यांची मजसंबंधानें दुसऱ्याहि एका प्रसंगीं प्रतिकूलता दिसून आली. 'मूकनायक' नाटक 'मुंबई विश्वविद्यालया'च्या एम्. ए. च्या परीक्षेकरितां नेमण्याचें विष्णु मोरेश्वर महाजनी यांच्या प्रयत्नानें घाटत होतें, परंतु त्यास हरिभाऊंनीं खो घातला असें मला मागाहून कळलें. असो. 'प्रेमशोधन' नाटक लिहिल्यानंतर तीन वर्षांनीं म्हणजे १९११ सालीं प्रसिद्ध झालें. तें प्रसिद्ध झाल्यानंतर त्यावर म्हणण्यासारख्या टीका झाल्या नाहींत. गडकऱ्यांच्या व इतरहि कांहीं टीकाकारांच्या मतें हें व 'मतिविकार' नाटक माझ्या सर्व नाटकांत उत्तम आहेत.

गोपाळराव देवधरांस माझ्या लेखांबद्दल बराच आदर आहे. हा

आदर त्यांनीं एका वर्षीं ते ‘ मुंबई विश्वविद्यालया ’च्या प्रवेशपरीक्षेसाठीं मराठी भाषेचे परीक्षक असतां “ सुदाम्याच्या पोह्यां ”तील कांही वाक्यें भाषांतराकरितां देऊन व्यक्त केला आहे.

# १४

१९०८ साली माझा ‘ चोरांचें संमेलन ’ हा लेख ‘ मनोरंजनां ’त प्रसिद्ध झाला. त्यानंतर लवकरच ( बहुधा गुर्जरांच्या प्रेरणेमुळें ) माझे तोंपर्यंत प्रसिद्ध झालेले सर्व विनोदी लेख स्वतंत्र पुस्तकरूपानें प्रसिद्ध करण्याची सूचना मित्र यांनी मला केली. ती मलाहि पसंत पडली. परंतु त्या लेखाची संख्या पंधरा असून ती आड-नीड होती व त्या लेखांचें पुस्तक विशेष मोठेंहि होण्यासारखें नव्हतें. सबब त्यांत आणखी तीन लेखांची भर घालून अठरा लेखांचें पुस्तक काढण्याचें ठरलें. सुदाम्यासारख्या दरिद्री ब्राह्मणाच्या पोह्यांत अठरा विलग धान्यें दिसून यावयाचीच, तेव्हां पुस्तकाला दिलेलें “ अठरा धान्यांचें कडबोळें ” हें वैकल्पिक नांव त्या लेखमालेच्या मूळच्या नांवास शोभण्यासारखेंच होतें.

पुस्तकाची विक्री विशेष होईल अशी मित्रांची अपेक्षा नसल्यामुळें त्यांनी त्याच्या एक हजार प्रतीच काढण्याचें ठरविलें व त्यांचा मोबदला म्हणून फक्त २५ रु.च व तेहि माझ्या नांवें धर्मार्थ कार्यासाठीं देण्याचें त्यांनी कबूल केलें. मलाहि पुस्तकाच्या लोकप्रियतेबद्दल मनांतून शंका होतीच. शिवाय पुढें कांही वर्षांनी मला पैशाची जशी अडचण पडूं लागली तशी त्यावेळीं मुळीच पडत नव्हती. माझा वकिलीचा धंदा चांगला चालला असून माझा कटाक्ष द्रव्यप्राप्तीपेक्षां कीर्तिलाभावरच विशेष होता. त्या सुमारास ‘ अभिनवकाव्यमाला ’ नांवाची आधुनिक कवीच्या कवितांची एक माला निघण्याचें घाटत असून तिच्या पहिल्या भागाचें संपादकत्व माझे स्नेही लक्ष्मण गणेशशास्त्री लेले यांनीं आपणाकडे घेतलें होतें. ज्यांच्या कविता प्रसिद्ध व्हावयाच्या त्यांपैकी प्रत्येकानें पुस्तकाच्या प्रकाशनाकरितां म्हणून साडेबारा रुपये देण्याचें ठरलें होतें. गरीब स्थितीतील किंवा मृत कवीच्या काव्यांच्या वांट्याला येणारा खर्च मात्र इतर कवी उभा करणार होते. मी स्वतःच्या कवितेकरितां साडेबारा व केशवसुतांच्या काव्याकरितां साडेबारा

देण्याचें कबूल केलें होतें. ही पंचवीस रुपयांची रक्कम ‘ सुदाम्याच्या पोह्यां ’च्या पहिल्या आवृत्तीचा मोबदला म्हणून लेलेशास्त्र्यांकडे पाठविण्यास मी मित्रांस कळविलें व त्याप्रमाणें त्यांनीं ती रक्कम त्यांजकडे पाठवून दिली.

अठरा लेखांची भरती व्हावयास लागणारे तीन लेख ‘ याचक ’ ‘ म्हातारपणाचे फायदे ’ व ‘ चित्रगुप्ताचा जमाखर्च ’ यापूर्वींच ‘ मनोरंजनां ’त प्रसिद्ध झाले होते. लवकरच पुस्तक छापण्यास सुरवात झाली व १९१० सालांत तें छापून प्रसिद्ध झालें.

प्रतींचा खप आमच्या अंदाजापेक्षां फारच झपाट्यानें सुरू झाला. २—३ वर्षांच्या आंतच सर्व आवृत्ति खपून गेली; व पुस्तकाबद्दल मागणी वाढत्या प्रमाणावर चालू राहिली. मित्रांच्या मनांत पूर्वींच्या सारख्याच स्वल्प अटीवर पुस्तकाची दुसरी आवृत्ति मिळावी असें होतें, परंतु मी अर्थातच त्या गोष्टीस कबूल झालों नाही. पहिली आवृत्ति निघाल्यानंतर माझे जे विनोदी लेख प्रसिद्ध झाले होते त्यांत जरूर पडल्यास कांहीं लेखांची भर घालून पंचवीस लेखांची “ वाचाळ-पंचविशी ” नांवाची वाढविलेली दुसरी आवृत्ति काढण्याचा माझा विचार होता व त्या आवृत्तीचें मूल्य म्हणून मी तीनशें रुपयांची मागणी केली होती. ती मित्रांना कबूल न झाल्यामुळें ती गोष्ट त्या वेळी तितकीच राहिली. पुढें-मागें स्वतःच नवीन आवृत्ति काढण्याचा माझा विचार होता. परंतु लवकरच युरोपांतील महायुद्ध सुरू होऊन कागद वगैरे साहित्याच्या किमती आहाराबाहेर वाढल्या व तो विचार तहकूब करणें भाग पडलें. हल्ली नुकतेंच युद्ध थांबलें आहे. भडकलेल्या किमती आतां भराभर उतरावयास लागतील. त्या पूर्वीइतक्या होतांच गेली चार वर्षें खोळंबून राहिलेली आवृत्ति माझे नूतन स्नेही पडवळ यांजमार्फत काढण्याचा विचार आहे.

१९०९ सालीं बडोद्यास जें ‘साहित्य-संमेलन’ भरलें त्यास मी हजर होतों. तेथें खाडिलकरांनीं दिवाण रमेशचंद्र दत्त यांस माझा परिचय ‘ महाराष्ट्रांतील सर्वांत उत्तम नाटककार ’ या शब्दांनीं करून दिला. त्या शब्दांस मी कितपत पात्र आहे याबद्दल जरी मला शंका होती तरी खाडिलकरांचें सौजन्य पाहून मला उपकृत झाल्यासारखें वाटलें. मी ताबडतोब— “ मलाहि खाडिलकरांचा परिचय त्याच शब्दांनी करून देतां येईल ”— असे उद्गार काढिले. यानंतर कांहीं वेळ महाराष्ट्राच्या व बंगालच्या रंगभूमी-

संबंधानें त्या दोघांचें तुलनात्मक संभाषण झालें. सयाजीराव महाराजांनीं कांहीं निवडक ग्रंथकारांस भेटण्याची इच्छा दर्शविली होती; त्यांत मी नव्हतों याबद्दल मला जरा वाईट वाटलें. इंदूर येथें १९१७ साली भरलेल्या संमेलनप्रसंगीं मला बराच निराळा अनुभव आला. असो. एखादा-दुसरा अपवादक प्रसंग वर्ज्य करितां माझे बडोदें येथील दिवस फारच आनंदाचे गेले असें म्हणण्यास हरकत नाहीं. भिन्न-भिन्न मतांच्या व परस्परांबद्दल गैरसमज करून बसलेल्या ग्रंथकारांची परस्परांविषयी सहानुभूति उत्पन्न करण्यांत अशा संमेलनांचा बराच उपयोग होतो यांत संशय नाहीं. पांगारकरांचा मजबद्दल पूर्वीं अत्यंत प्रतिकूल ग्रह असे. पण साताऱ्याच्या व व बडोद्याच्या संमेलनांनी तो बहुतांशीं नाहींसा केला. माझ्या लेखांवरून मजबद्दल ज्यांचें अत्यंत प्रतिकूल मत होतें पण तें प्रत्यक्ष भेटीअंतीं नाहींसें होतें असा मला आजपर्यंत अनेकदां अनुभव आला आहे.

१९०९ सालीं मित्रांनीं 'मनोरंजना'चा दिवाळीचा खास अंक काढिला. अंक फार मोठा असून तो अनेक विद्वान् व रसिक लेखकांच्या लेखांनीं व सुंदर चित्रांनीं अत्यंत चित्ताकर्षक झालेला होता. असें साहस पूर्वीं कोणत्याहि मराठी मासिकानें केलें नव्हतें. मी त्या अंकाकरितां 'लेखनकलेंतील स्थित्यंतरें' हा लेख लिहिला होता. त्यांत वर्णिलेली लेखनकलेंतील प्रगति बहुतांशीं माझ्या स्वतःच्याच अनुभवावरून दिली होती. मला दिवसेंदिवस अनुप्रासादिकांबद्दल व श्लेषादिकांबद्दल अरुचि उत्पन्न होत चालली होती व घोटाळ्याच्या रचनेपेक्षां साधी रचना आवडूं लागली होती. ही नवी अभिरुचि माझ्या पुढील नाटकांत स्पष्टपणें दिसून येऊं लागली.

'मनोरंजना'नें खास अंकांचा क्रम ६-७ वर्षें चालू ठेविला. १९११ व १९१२ सालच्या दिवाळीच्या अंकांत माझे अनुक्रमें 'आमचे बैठे खेळ' व 'यांत्रिक चमत्कार' हे विनोदी लेख प्रसिद्ध झाले. १९१२ सालीं 'दिल्ली-दरबारा'निमित्त 'मनोरंजना'चा डिसेंबरचा खास अंक निघाला, त्यांत माझा 'भाषा व इतिहास' हा लेख प्रसिद्ध झाला. १९१४ व १९१५ सालीं 'मनोरंजना'चे वसंताचे खास अंक निघाले, त्यांत माझे अनुक्रमे 'साहित्यपरिषदेची तयारी' व 'चित्रकार' हे लेख प्रसिद्ध झाले. उत्तरोक्त लेखाच्या पुरवणीदाखल लिहिलेला 'छायाचित्रें उर्फ फोटो' हा लेख

१९१५ च्या जुलईच्या अंकांत छापून आला; व १९१६ च्या वसंत अंकांत ‘ साधुसंत ’ हा लेख छापून निघाला.

यापुढें माझा ‘मनोरंजना’शीं असलेला लेखनसंबंध तुटल्यासारखाच झाला आहे. यास विशेष कारण घडलें तें येणेंप्रमाणें :— मित्र इतर लेखकांस जशीं मोबदल्याची आश्वासनें देत असत तशीं मलाहि देत. परंतु मी आपल्या लेखांबद्दल त्यांजपासून कधींहि मूल्याची अपेक्षा केली नाहीं. १९१४ साली मी ‘ वधूपरीक्षा ’ नाटक ‘ मनोरंजन छापखान्यां’त छापून काढिलें, त्याबद्दल मित्रांनीं खर्चाची जबर आकारणी केली होती; पण छपाईचें, बांधणीचें वगैरे सर्व काम फार सुबक व सफाईदार झालेलें असल्यामुळें त्या आकारणीबद्दल कुरकुर करण्याला मला मुळींच जागा नव्हती. शिवाय मित्रांनीं आपल्या छापखान्याचे नोकर सारखे बसवून व त्यांच्या जोडीला इतर छापखान्यांतील इसम देऊन पुस्तकाच्या प्रती फारच अल्प अवधींत म्हणजे ७—८ दिवसांतच तयार केल्या होत्या. सारांश या साऱ्या प्रकारांत कुरकुरीपेक्षां समाधानालाच विशेष कारण झालें होतें. प्रती तयार झाल्यावर मी त्या पुस्तकविक्रीच्या इतर दुकानांत ठेवण्यापेक्षां ‘ मनोरंजन छापखान्यां ’तच ठेवून दिल्या. त्यावेळीं आम्हां उभयतांमध्यें असें ठरलें की मित्रांनीं ‘ मनोरंजना ’च्या प्रत्येक अंकांत ‘ वधूपरीक्षे ’ची जाहिरात छापावी व त्याबद्दल प्रतीच्या विक्रीच्या उत्पन्नावर शेंकडा पंचवीस टक्के कमिशन घ्यावें. हा क्रम कांहीं महिने बिनबोभाट चालला. पण पुढें दोन महिने जाहिरात मुळींच आली नाहीं. तेव्हां मला फार वाईट वाटलें. त्याबद्दल मित्रांचा खुलासा मागतां त्यांनीं तें विस्मरणानें घडल्याचें सांगितलें. यानंतर कांहीं महिन्यांनी पुन्हां एकदां अंकांत जाहिरात दिसेना. तेव्हां मात्र मला मनस्वी चीड आली. मित्रांस विचारतां त्यांनीं असें स्पष्टीकरण दिलें कीं कधीं—कधीं इतर जाहि-रातीनी एखादां फॉर्म बरोबर भरून एकच जाहिरात शिल्लक राहते तेव्हां तिच्यासाठीं सबंध चार पृष्ठें खर्चीं घालणें इष्ट नसतें. हें स्पष्टीकरण प्रथम-दर्शनीं रास्त वाटलें. पण त्या इतर जाहिरातींत खुद्द ‘ मनोरंजन छाप-खान्या ’च्या व मासिकाच्या जाहिराती असून त्यांनी पृष्ठेंचीं पृष्ठें अडविलीं असतात ही गोष्ट जेव्हां लक्षांत आली तेव्हां त्या स्पष्टीकरणाचा फोलपणा

नजरेस आला. तेव्हांपासून आजपर्यंत 'वधूपरीक्षे'ची जाहिरात 'मनोरंजनां'त नियमितपणें येत असते, पण माझ्या मनांतलि अढी अजून दूर होत नाहीं.

मित्रांबद्दल माझें मन कलुषित होऊं लागल्यापासून मी आपले विनोदी लेख माझे स्नेही गणेश विठ्ठल कुलकर्णी यांनी चालविलेल्या 'उद्यान' मासिकाच्या संक्रांतीच्या खास अंकांत देण्यास सुरवात केली. आतांपर्यंत त्या मासिकांत माझे दोनच लेख प्रसिद्ध झाले आहेत. पहिला लेख 'पांडुतात्यांची निर्जळी एकादशी' हा १९१७ च्या व दुसरा लेख 'मरणोत्तर' हा १९१८ च्या खास अंकांत प्रसिद्ध झाला. उत्तरोक्त लेख अत्यंत झणझणीत असतांहि त्यावर प्रतिकूल टीका न होतां उलट त्याची प्रशंसाच झाली. मजकडे पाहण्याच्या जनतेच्या दृष्टिकोणांत इतकें अंतर पडलें आहे !

## १५

सुदाम्याच्या लेखांतील बंडुनाना व पांडुतात्या ही जोडी मी आपल्या अनुभवांतून काढिली आहे की कल्पनेनें निर्माण केली आहे याबद्दल अनेक ठिकाणी कुतूहल जागृत झालेलें दृष्टीस पडतें. सबब त्यासंबंधानें थोडा खुलासा केल्यास अस्थानीं होणार नाहीं. मी तेल्हारा येथें असतां तेथील कोर्टात बंडुनाना नांवाचे एक सुनावणी कारकून व तात्याबा चांदेकर या नांवाचे एक जप्ती कारकून असत. त्यांवरून मला त्या दुकलीची प्रथम कल्पना सुचली. परंतु पुष्कळदां कल्पना व तिचें मूर्तस्वरूप यांत जमीन-अस्मानाचें अंतर असतें, तसें याहि बाबतीत झालें. शिवाय प्रत्येक लेखाबरोबर त्या दोघांवर नव्या-नव्या गुणांचा आरोप होऊं लागला. तात्याबा जरा जड बुद्धीचे व स्थूल दृष्टीचे असून त्यांची त्याबद्दल थट्टाहि होत असे. पण ते अंगानें स्थूल नसत व खाण्या-पिण्यांताहि ते विशेष प्रसिद्ध नसत. यांपैकी दुसरा गुण मी माझे स्नेही वासुदेवराव पिंपळीकर यांजवरून उचलला. हे गृहस्थ मलकापूर येथें वकिली करीत असून अत्यंत धिमे, शांत, व्यवहारदक्ष, परोपकारी, स्नेहाचे भुकेलेले असे आहेत. या त्यांच्या गुणांमुळें त्यांस तेथील समाजाचें अध्वर्युत्व प्राप्त झालें आहे ! त्यांचें शरीर उंच व बळकट असून मलकापूर येथील इतर अनेक गृहस्थांप्रमाणें जेवणाच्या

कामांत ते फार तरबेज आहेत. मलकापूर येथील मेजवान्यांच्या प्रसंगीं तेथील लोकांच्या आहाराचा चांगलाच प्रत्यय येत असे. तूप वाढतां-वाढतां वाढणारानें एखादें सत्पात्र पाहून त्याच्या पानांत सबंध तपेली रिकामी करावी व त्या तुपाच्या झऱ्यास आधार म्हणून लागलींच भाताचा एक डोंगर आणून त्यांत रिचवावा असे अनेक चमत्कार माझ्या पाहण्यांत आले आहेत. वासुदेवराव दादांनीं एकदां सकाळच्या उपहाराच्या वेळीं एकोणवीस पेले चहा घशाखालीं उतरविला, व दुसऱ्या एका प्रसंगीं लोणच्यानें भरलेल्या सहा-सात बशा पार केल्या. यांना झोंपहि फार येत असे. ते सहज मंडळींत बोलत बसले असतां पेंगावयास व घोरावयास लागतात. या झोंपाळू-पणामुळें त्यांच्या कितीतरी गाड्या चुकल्या असतील याची गणतीच करितां येणार नाही. एकदां ते उमरावतीहून मलकापुराकडे परत येत असतां वाटेंत बडनेरा स्टेशनवर गाडी बदलण्याकरितां थांबले व झोंपेमुळें एकामागून एक तीन गाड्या दवडून बसले ! गाडीनें निघतांना शीळ फुंकली म्हणजे दादांनीं जागें होऊन धांवत धांवत प्लॅटफॉर्मवर जावें व गाडी गेलीसें पाहून निराश मनानें पुन्हां झोंपेच्या दुसऱ्या हप्त्याच्या तयारीला लागावें ! खामगांवहून मलकापुरास जाण्याकरितां निघालेले दादा पुन्हां जलंब जंक्शनहून त्याच गाडीतून कितीदां तरी परत आले असतील ! एकदां ते मलकापुराहून अकोल्यास जाण्याकरितां निघून झोंपेमुळें बडनेऱ्यास गेले व तेथें तिकीट तपासनिसाच्या टोंचणीमुळें जागे होऊन परत अकोल्यास जाण्याकरितां गाडीत बसले ते थेट भुसावळेस जागे झाले ! अशा त्यांच्या कितीतरी गंमतीच्या आख्यायिका आहेत. त्यांचा लवकरच योग्य उपयोग करण्याचा माझा विचार आहे.

मला कथालेखन कितपत साधतें हें पाहण्याचा माझा बऱ्याच दिवसांपासून विचार होता. तो १९१० सालांत कृतीत उतरविला. 'गाणारें यंत्र' ही माझी पहिली गोष्ट होय. तिचें कथानक बऱ्याच वर्षांपासून माझ्या डोक्यांत घोळत होतें. मी तेल्हाऱ्यास असतां तेथें एक इसम फोनोग्राफ घेऊन आला होता व त्यांतील ' कन्हय्या जरा बन्सी बजा जा रे' या चिजेनें मला मोहून टाकिलें होतें. त्या चिजेंत विशेष आलापदारी होती असें नाही. ती एखाद्या बालकानें किंवा बालिकेनें आपल्या निसर्गकोमल स्वरानें म्हटलेली एक साधी चीज होती. पण तिच्या श्रवणानें माझ्या सर्व चित्तवृत्ती

उचंबळून येऊन ‘ रम्याणि वीक्ष्य मधुरांश्च निशम्य शब्दान् ’ या श्लोकांत वर्णिल्याप्रमाणें माझी स्थिति होई. त्या चिजेची बांगडी यंत्रावर चढविण्यास मी व माझ्या स्नेह्यांनी यंत्राच्या मालकांस कितीदांतरी सांगितलें, तरी तृप्ति म्हणून होईना ! त्यानंतर एका खेडेगांवीं एका लग्नानिमित्त गेलों असतां तेथेंहि तो इसम आपल्या यंत्रासह आलेला दिसला. त्यास पाहून मला जुना स्नेही भेटल्याप्रमाणें आनंद झाला. पुन्हां मी आपले कान त्या चिजेनें कांठोकांठ भरून घेतले. ते स्वर व ते शब्द माझ्या कानांत व त्या शब्दांतील अर्थ माझ्या अंतःकरणांत माझ्या अंतापर्यंत तरंगत राहतील यांत संशय नाही. रूपाच्या काय, स्वराच्या काय किंवा काव्याच्या काय सौंदर्यात कितीतरी अद्भुत सामर्थ्य आहे ! मी हल्लीं आयुष्याच्या उतरणीला लागलों आहे. परतु ती चीज आठवली की माझ्या अंगांत तारुण्याचा संचार होऊन मी गोकुळांत गोप-गोपीसह श्रीकृष्णाचें मुरलीवादन ऐकत बसलों आहें असा क्षणभर भास होतो. ही चीज माझ्या इतकी आवडीची झाली कीं मी तिच्या चालीवर ‘ मतिविकारां ’तील प्रमुख प्रवेशांत सरस्वतीच्या तोंडीं एक पद घातलें. ‘ गाणारें यत्र ’ या गोष्टीत त्या यंत्रांतून निघणारे मधुर पदहि अर्थात् त्याच चालीवर आहे. ती माझी पहिलीच गोष्ट असल्यामुळें वठावी तशी मुळींच वठली नाही.

तिच्यापुढील गोष्ट ‘ पति हाच स्त्रीचा अलंकार ’ तिच्यापेक्षां बरीच सरस वठली. ती ‘ मनोरंजना ’च्या १९१० च्या दिवाळीच्या अकात प्रसिद्ध झाली. ती गणपतराव भागवतांना विशेष आवडल्याबद्दल त्यांचें मला पत्र आलें. त्यांचा स्वभाव अत्यंत सकोची असून ते अत्यंत मितभाषणी असत. ते आपल्या मनांतील भाव फारच विरल प्रसंगी प्रगट करून दाखवीत. त्यांच्यासारख्या विद्याव्यासंगी पुरुषास माझी गोष्ट कलेच्या दृष्टीनें इतकी सरस वाटली की त्यांनीं आपली संकोची वृत्ति बाजूला ठेवून आपलें मत मला कळविलें हें पाहून मला साहजिकच फार समाधान वाटलें व पुढील गोष्ट लिहिण्यास प्रोत्साहन आलें.

पुढील गोष्ट ‘ सपादिका ’ ही ‘ मनोरंजना ’च्या १९११ च्या डिसेंबरच्या अंकांत प्रसिद्ध झाली. ही सुचण्यास माझ्या नूतन परिचयाच्या सौ. आनंदीबाई शिर्के यांचें पूर्वचरित्र अंशतः कारण झालें. सबब तें येथें देणें अप्रासंगिक होणार नाहीं. ‘ मराठा मित्र ’ मासिकांत सन १९१० च्या

सुमारास ‘ कुमारी आनंदी ’ या नांवाखालीं कांहीं सरस व चटकदार गोष्टी येत असत. त्यांचा लेखक पुरुषच असावा असा मला संशय येऊन मी त्याबद्दल त्या मासिकाचे संपादक गोपाळ दाजीबा दळवी यांजकडे शोध केला. त्यांच्या सांगण्यांत आलें कीं त्या गोष्टी एका अविवाहित मुलीकडून लिहिण्यांत येत असतात; पहिल्यापहिल्या गोष्टीत तर निरनिराळे प्यारेहि पाडलेले नसत; पण वाक्यांचे निरनिराळे प्यारे पाडणें इष्ट असतें असें संपादकांकडून लेखिकेस कळल्यावर तिनें पुढील गोष्टीत प्रत्येक वाक्याचा एक-एक प्यारा करून ठेविला. याप्रमाणें लेखिकेकडून अनभ्यस्तपणामुळें जरी कांहीं किरकोळ चुका होत तरी कथालेखनकलेच्या मुख्य अंगाचें तिला लहानपणीच बाळकडू मिळाल्या-सारखें दिसत होतें. मुलीचे आईबाप सुशिक्षित नसल्यामुळें तिला तिजप्रमाणें हुशार व विद्याव्यासंगी पति मिळेल का याबद्दल गोपाळरावांस काळजीच होती. त्यांचे दुय्यम संपादक शिवराम सखाराम शिर्के हे होते. ते स्वत: बऱ्यापैकी कवि असून ‘ काव्यानंद ’ या सहीनें आपल्या कविता ‘ मराठा-मित्रां ’त प्रसिद्ध करीत असत. त्यांनीं आनंदीची तीव्र बुद्धि व तरतरी पाहून आपल्या एका बंधूस तिला शिकविण्यास ठेविलें; व पुढें ते स्वतःच तिला शिकवूं लागले. उभयतां सदृश विचारांची व अभिरुचीची असल्यामुळें त्यांचें परस्परांवर प्रेम जडले यांत नवल नाही. परंतु त्यांच्या विवाहास बरींच विघ्नें होती. शिर्के उच्च घराण्यांतील असून आनंदी त्या मानानें कमी प्रतीच्या घराण्यांतील होती. या प्रकारचा मिश्रविवाह मराठा समाजांत त्यापूर्वीं क्वचितच झालेला होता. शिवाय शिर्क्यांच्या वडिलांनी मुलाकरितां जबर हुंड्याची मागणी केली. वडिलांची संमति अशा भारी शर्तीवर कां होईना, मिळत आहे हें पाहून शिर्क्यांनी त्या शर्तीस आपली मान्यता दिली. तें पाहून आनंदीस सुशिक्षित पुरुषांच्या मानभावीपणाची मनस्वी चीड आली. अखेरीस एकदांचा उभयतांचा विवाह ठरला, व सुमुहूर्तावर पारहि पडला. आनंदीबाईचे वडील शिंदे याच्या सहीची कुंकुमपत्रिका व आनंदीच्या हातचें एक लहान पत्र ही लग्नाच्या आदल्या दिवशी माझ्या हातीं आलीं. “ आपणांस माझ्या लग्नाबद्दल काळजी लागली असल्याचें दळवी यांच्याकडून कळलें होतें. पण आपल्या परिचयाचे ‘ काव्यानंद ’ हे माझे पति होणार व माझ्या शिक्षणांत यापुढें व्यत्यय येण्याची भीति नाही, हें पाहून आपणांस समाधान वाटेल. ” — असा त्या पत्राचा आशय होता. मी ताबडतोब

तिच्या नांवें शुभचिंतनपर व आशीर्वादात्मक पत्र पाठविलें. यानंतर कांहीं दिवसांनीं सौ. आनंदीबाई शिर्क्यांशीं व त्यांच्या पतीशीं माझी प्रत्यक्ष ओळख झाली. आनंदीबाईपेक्षां अधिक मर्यादशील व सुविनीत स्त्री माझ्या आजपर्यंत पाहण्यांत आलेली नाहीं असें मी विधान केल्यास मजवर अतिशयोक्तीचा आरोप येण्याची मुळींच भीति नाहीं असें त्यांच्या परिचयाचा प्रत्येक मनुष्य सांगूं शकेल. त्यांचा परिचय झाल्यानंतर कांहीं दिवसांनीं त्यांनीं लग्नापूर्वी लिहिलेली रोजनिशी माझ्या पाहण्यांत आली. तिच्यांत त्यांनी आपल्या मनांतील भाव अत्यंत मार्मिक रीतीनें चित्रित केलेले पाहून मला फार विस्मय वाटला. रोजनिशीच्या शेवटच्या पानावर लग्नाच्या ऐनवेळीं हातीं पडलेल्या माझ्या आशीर्वादात्मक पत्राचा उल्लेख पाहून तर विशेष आनंद वाटला, व 'सौभद्रा'च्या शेवटीं सुभद्रार्जुनांस आशीर्वाद देण्याकरितां प्रवेश करणाऱ्या गर्गमुनीशीं त्या पत्राचें साम्य दिसून येऊन कौतुक वाटलें. यानंतर आनंदीबाईच्या कांहीं सरस गोष्टी 'मनोरंजनां'तून प्रसिद्ध झाल्या. त्यांपैकी एक इतकी हृदयद्रावक होती की माझे चुलते वामनराव कोल्हटकर ती वाचतां-वाचतां अत्यंत सद्गदित होऊन मुद्दाम माडीवरून उतरून साश्रु नयनांनीं मला त्या पुस्तकातील हृदयद्रावक भाग दाखविण्याकरितां मजपाशी आले. त्यांनीं कर्त्रीशी परिचय करून घेण्याची इच्छा प्रदर्शित केल्यावरून पुढें योग्य संधि येतांच मी त्या तरुण जोडप्याची व त्यांची गांठ घालून दिली. करुणरसाचा अत्यंत सरस भाषेंत परिपोष करण्याच्या कामीं आनंदीबाईचा हातखंडा आहे. ईश्वर या जोडप्यास दीर्घायु करो !

यापुढील माझी गोष्ट 'गरीब बिचारें पाडस' 'मनोरंजना'च्या १९१२ च्या दिवाळीच्या अंकांत प्रसिद्ध झाली. ती मांसाशनाच्या खंडनार्थ लिहिली होती. ही गोष्ट अनेक वाचकांस बरीच आवडली असून ती माझ्या सर्व गोष्टींत अत्यंत परिणामकारक आहे. ही गोष्ट लिहीपर्यंत मी मांसाहारास शिवलों नव्हतों, यामुळें त्या वेळीं मला त्याबद्दल फार शिसारी वाटत होती. त्यानंतर १९१४ सालचे जुलई महिन्यांत माझ्या तोंडास अर्धांगवायूचा विकार झाला. त्यानंतर कांहींसें शक्ति येण्याकरितां व काही स्नेह्यांच्या आग्रहावरून मला मांसाहाराचें अनेकदां सेवन करावें लागलें. तथापि त्याबद्दल पूर्वीं वाटत असे तशी व जवळ-जवळ तितकीच खंत मला हल्लीं

वाटत असते. मांसाहारी लोकांना तो शाकाहारापेक्षां अधिक कां आवडावा याचें मला अजून गूढ आहे. पुढें-मागें बंधूसह युरोपचा प्रवास करण्याचा हेतु अमलांत आल्यास माझें पूर्वींप्रमाणें शाकाहारावांचून अडूनच राहील असें मात्र नाहीं.

## १६

जगांतील कोणत्याहि वस्तूचें व्यसन जडवून घेणें व तिच्या आहारीं जाणें हें कोणत्याहि दृष्टीनें इष्ट नाहीं असें मला वाटतें. मात्र तिचें ज्ञान करून घेतांना दुसऱ्या कोणत्याहि व्यक्तीच्या हक्कास बाध न येईल याबद्दल खबरदारी घेणें जरूर आहे. ज्ञानप्राप्तीच्या हेतूनें योग्य मर्यादेच्या आंत वस्तूचा उपभोग घेतल्यास त्यांत अयोग्य असें कांहींच नाहीं. मद्यसेवना-संबंधानेंहि माझें हेंच मत आहे. तेल्हारा येथें असतांना एकदां मला निद्रानाशाचा विकार जडला होता. त्याजपासून मुक्त होण्याकरितां मी इतर उपायांबरोबर ब्रँडीचें सेवन केलें. त्यापूर्वीं मी जरी कधींहि जाणून बुजून मद्य घेतलें नव्हतें तरी त्या वेळी मद्याची रुचि मला अगदीं नवीन अशी वाटली नाही. कदाचित् डॉक्टर लोक औषधांतून जो मद्यार्क देतात त्याची चव ब्रँडीसारखी असल्यामुळेंच मला ब्रँडीत अपूर्वता वाटली नसावी. यानंतर मी मद्याच्या इतर प्रकारांची चव पाहण्याकरितां प्रत्येकाचें चमचा-चमचा दोन-दोन चमचे सेवन केलें आहे. एकदां तर मद्यानें येणाऱ्या अमलाचें स्वरूप कसें असतें हें पाहण्याकरितां मी व्हिस्की बऱ्याच मोठ्या प्रमाणांत घेतली. तथापि अजून मला मद्याचें व्यसन जडलें नाहीं, व पुढेंहि जडण्याचा संभव नाहीं. त्याची चव इतकी वाईट असतें कीं मी तें सेवन करीत असतां मला पुष्कळदां ओकारी आली आहे. भांगेची चव मला फार प्रिय आहे. मी तिचें प्रथम सेवन ‘ मूकनायक ’ लिहितांना केलें. त्यानंतर मी तिचें बरेंच वेळां सेवन केलें. पण त्यानें कांहीं काळ व कधींकधीं तर बराच काळ स्मृतिनाश होतो व त्याचें वारंवार सेवन करीत गेल्यास बुद्धि-भ्रंशहि होण्याचा संभव आहे असें दिसून आल्यावर मी अलीकडे तिचें सेवन वर्ज्य केलें आहे. तंबाखू खाण्याचें किंवा ओढण्याचें मला मुळींच व्यसन नाहीं. अनुभव घेण्याकरितां मी तिचें एक-दोनदां सेवन व पान केलें असेल

तेवढेंच काय तें. चहा मी रोज सकाळ-संध्याकाळ घेतों खरा; पण त्याचें मला व्यसन नाही. मी तो मध्यंतरी चार वर्षें अजीबात सोडून दिला होता. विड्याचें किंवा सुपारीचें मला व्यसन नाहीं व मी ती विशेष कारणाशिवाय खाताहि नाही. याप्रमाणें मी जरी अनेक उपभोग्य वस्तूंचें सेवन केलें आहे तरी कोणत्याहि वस्तूचें व्यसन जडवून घेतलें नाही.

माझे स्नेही गोपाळ वामन बापट यांनी ' रंगभूमि ' मासिकांतून ' उत्तररामचरित ' ' शाकुंतल ' व ' मृच्छकटिक ' या नाटकांवर नवीन तऱ्हेच्या सुंदर टीका प्रसिद्ध केल्या होत्या, व त्यांचें एक स्वतंत्र पुस्तकहि त्या मासिकाचे संपादक शकरराव मुजुमदार यांनीं काढिलें. त्यास बापटांच्या इच्छेवरून मी एक लहानशी प्रस्तावना लिहिली. ती त्या मासिकांत १९०९ च्या सुमारास प्रसिद्ध झाली. बापटांचा ' नाटकविषयक व्यापक विचार ' या नांवाचा एक निबंधहि त्या मासिकांत प्रसिद्ध झाला होता. त्यासहि मी एक प्रस्तावना लिहिली. ती १९१० साली त्या मासिकांत छापून आली.

यानंतर माझे स्नेही नरसोपंत केळकर यांची भावजय व त्यांचे बंधु माधवराव केळकर यांच्या पत्नी सौ. गिरिजाबाई केळकर यांनी ' पुरुषांचें बंड ' नांवाचें नाटक लिहून तें मला नाशिक मुक्कामी १९१३ सालचे जून महिन्यांत वाचून दाखविलें. नाटक फारच थोड्या अवकाशांत म्हणजे पंधरा दिवसांतच लिहून काढिलें होतें व तें बाईचें पहिलेंच नाटक होतें. या गोष्टी लक्षांत घेतल्यास तें खरोखरीच चांगलें साधलें होतें. बाईच्या अंगीं शीघ्र-वक्तृत्वाची जशी शक्ति आहे तशी शीघ्रलेखनाचीहि आहे. परंतु त्यांच्या बोलण्यांत काय किंवा लिहिण्यांत काय जितकी खुबी असावी तितकी नसते. नाटकवाचनानंतर थोड्याच महिन्यात त्यांजकडून मजकडे नाटकास प्रस्तावना लिहिण्याबद्दल विनंतिपत्र आलें. मला फुरसद नसल्याचें मी त्यांस कळविलें. पण फुरसद होईपर्यंत वाट पाहण्याची तयारी दिसल्यावर मला प्रस्तावना लिहावी लागली. नाटक लवकरच प्रसिद्ध झालें, व त्यावर बऱ्याच प्रतिकूल टीका झाल्या. त्यांचे शितोडे अर्थातच प्रस्तावनालेखकावरहि उडाले. प्रस्तावना बऱ्याच जणांस आवडल्यासारखी दिसली. वासुदेवशास्त्री खरे यांनी थट्टेनें नाटकास दहाच्या आंकड्याची उपमा देऊन प्रस्तावनेची एक व नाटकाची शून्यतुल्य किंमत ठरविली. या नाटकाचे ' भारत नाटक मंडळी 'कडून कांही प्रयोगहि झाले. पण ते विशेष यशस्वी झाले नाहीत. कुलस्त्रीचें रंगभूमीवर आलेलें

पहिलें नाटक या दृष्टीनें तरी त्याजबद्दल टीकाकारांनी अधिक दाक्षिण्य दाखवावयास पाहिजे होतें असें मला वाटतें. सौ. गिरजाबाईचें मन फारसें नाजूक नसल्यामुळें त्यांनी टीकांच्या भडिमारानें नाउमेद न होतां लवकरच 'वरपरीक्षा' नांवाचें सावित्रीकथेच्या आधारें एक नवीन नाटक लिहिलें व तें मला दाखविण्याकरितां त्या मुद्दाम खामगांवास पतीसह आल्या होत्या. पण तें अजून प्रसिद्ध झालें नाही.

वर—"कुलस्त्रीचें रंगभूमीवर आलेलें नाटक"—असें लिहिण्याचें कारण असें कीं त्यापूर्वीं हिराबाई पेडणेकरांचें 'दामिनी' नाटक प्रसिद्ध होऊन रंगभूमीवरहि आलें होतें. त्यास मी सूचनाद्वारां बरीच मदत केलेली असल्यामुळें तें मला अर्पण करण्याचा बाईचा विचार होता. पण तसें केल्यास टीकाकारांच्या हातीं एक नवें शस्त्रच तयार करून दिल्यासारखें होईल असें माझ्या चुलत्यांचें मत पडल्यामुळें मी त्या गोष्टीला मान्यता दिली नाही.

यानंतर मी ज्या पुस्तकास प्रस्तावना लिहिली तें 'नाटक्याचे तारे' हें होय. त्याचे कर्ते काशीनाथ नारायण पटवर्धन हे तेल्हारा येथील 'इंग्रजी-मराठी शाळे'वर मुख्य अध्यापक म्हणून बदलून आले असतां माझा व त्यांचा प्रथम परिचय झाला. त्यावेळीं माझा 'गणेशचतुर्थी' हा लेख नुकताच प्रसिद्ध झाला होता. पटवर्धन यांस ही विनोदी लेखनपद्धति त्यावेळीं विशेष आवडली नाही. पण पुढें-पुढें ती त्यांस आवडावयाला लागून ते त्या धर्तीवर लेख लिहूंहि लागले. ते प्रत्येक लेख बहुधा मला दाखवीत, व माझ्या सूचना ऐकून घेऊन व त्या अमलांत आणून पुनः तो मला दाखवीत. याप्रमाणे लेख निर्दोष व सफाईदार करण्याकरितां ते तो अनेकदां लिहून काढीत. या कामी त्यांची मनःप्रवृत्ति खऱ्या कारागिरास शोभण्यासारखी असे. त्यांनीं पुणें येथें शिकत असतां 'हॅम्लेट' नाटकाच्या इंग्रजी प्रयोगांत ऑफिलियेची भूमिका घेतली असून त्यावेळीं त्यांनी नाट्या-संबंधी बरेंच ज्ञान संपादन केलें होतें. चित्रकलेंतहि त्यांची चांगली गति असे. त्यांनीं स्वतः स्कॉटच्या 'Talisman' या कादंबरीच्या आधारें 'संग्रामसिह' नांवाचें नाटक लिहिलें असून बाबाजी दौलतराव राण्यांच्या जाहिरातीवरून बक्षिसाकरितां पाठविलें होतें, व तें त्यांच्या पसंतीसहि उतरलें होतें. राणे यांनी त्यांत जे फेरफार सुचविले होते, ते पटवर्धनांनी

अमलांत आणूनहि राण्यांकडून बक्षिसाची रक्कम देण्याच्या कामीं दिरंगाई होऊं लागली तेव्हां पटवर्धन त्रासून गेले व त्यांनीं त्यासंबंधानें राण्यांस अपमानकारक वाटणारा मजकूर ' केसरी 'त पत्रद्वारां प्रसिद्ध केला. त्यावर राण्यांनी पटवर्धनांवर फौजदारी खटला सुरू केला. त्याचा पटवर्धनांनीं दिलगिरी प्रदर्शित केल्यावरून नरसोपंत केळकरांच्या मध्यस्थीनें आपसांत समज झाला. याप्रमाणें पटवर्धनांस नट, नाटकें, नाटककार, नाटक-कपन्या व त्यांचे मालक यांचा प्रत्यक्ष अनुभव बराच आला होता, व त्याचा त्यांनी ' नाटक्याचे तारे ', ही लेखमाला लिहितांना यथास्थित उपयोग करून घेतला. त्यांनी एका लेखांत राण्यांचें वर्णन ' दौलतजादा ' ( ' शाहजादा ' या शब्दाच्या धर्तीवर ) या शब्दानें करून त्याजवर चांगलाच सूड उगविला. ' शाहुनगरवासी मंडळी 'तील प्रसिद्ध नट गणपतराव जोशी, अनंत वामन बर्वे इत्यादि नाटयसृष्टीतील प्रसिद्ध व्यक्तीवरहि त्यांनी मनमुराद टीका केली. मी अशा व्यक्तिविषयक टीकेस नेहमीं प्रतिकूल असे. परंतु ही गोष्ट माहीत नसल्यामुळें व माझा त्या लेखमालेशी असलेला सबंध जाहीर झालेला असल्यामुळें टीकाविषयीभूत गृहस्थांचा मजवर फार रोष झाला. पटवर्धन टीका करितांना मित्र व शत्रु यांजमध्यें मुळीच पक्तिप्रपंच करीत नसत. त्यांनीं माझ्या दोषांवरहि प्रसंगोपात्त प्रहार केले आहेत. अण्णासाहेब किर्लोस्कर यांच्या मुजुमदारकृत चरित्रावर मी ' विविधज्ञानविस्तारां 'त जी टीका केली होती तिच्या कांही भागांची चेष्टा करण्यास त्यांनी कमी केलें नाहीं. दत्तोपंत हल्ल्याळकरांची नाटक-मंडळी एकदां नाशकास असतां मी त्या मंडळीचा ' वीरतनया 'चा प्रयोग पाहण्यास व त्यासंबंधानें सूचना करण्यास तेथें गेलों होतों; माझें आदरातिथ्य चांगलें झाल्यास मी दोषांकडे कानाडोळा करितों ही माझ्या स्वभावांतील गोम माहीत असल्यामुळें म्हणा किंवा इतर कारणांमुळें म्हणा दत्तोपंतांनी त्या दिवशीं भोजनास सर्व पंक्ती-करितां चांदीच्या ताट-वाट्या ठेविल्या होत्या; त्यापासून माझें मन त्यांच्या दिलदारपणाविषयीं बरेंच अनुकूल झालें. या गोष्टीची पटवर्धनांनी थट्टा केली आहे. माझ्या इतरहि कांहीं हास्यास्पद गोष्टीची त्यांच्या लेखमालेंत थट्टा केलेली माझ्याशी दाट परिचय असलेल्या वाचकांस आढळून येईल. असो. मी तेल्हाऱ्याहून खामगांवास गेल्यावरसुद्धां पटवर्धन आपले लेख दाखविण्यास मजकडे येत असत. पुढें लवकरच ते खामगांवास नायब तहसिलदार होऊन

आले; व आमचा पुन्हां निकट संबंध घडून आला. पण तो फार दिवस टिकला नाहीं. पवटर्धन १९०८ च्या सुमारास खामगांव येथें प्लेगला बळी पडले. त्यानंतर मित्रांनीं त्यांची लेखमाला १९१४ सालीं स्वतंत्र पुस्तकरूपानें प्रसिद्ध केली तेव्हां मी त्यांच्या व गुर्जरांच्या विनंतीवरून व पटवर्धनांचा व माझा पूर्वसंबंध लक्षांत आणून तिला एक लहान प्रस्तावना लिहिली. तिच्यांत मी मालाकाराच्या गुणदोषांचें यथामति विवेचन केलें आहे.

१९१५ सालीं माझे स्नेही अप्पाजी धुंडिराव मुरतले ऊर्फ सुमंत कवि यांनीं आपली ' विरहगीति ' प्रसिद्ध केली. प्रसिद्धीपूर्वीं त्यांनीं तिला प्रस्तावना लिहिण्याची मला विनंति केली. यापूर्वीं त्यांच्या काव्यांचे दोन खंड प्रसिद्ध झाले असून त्यांस गोविंदराव कानिटकर व विष्णु मोरेश्वर महाजनि यांनी प्रस्तावना लिहिल्या होत्या. सबब मला त्यांची विनंति मान्य करण्यांत अनुचित असें कांही वाटलें नाही. मी आपल्या प्रस्तावनेंत माझ्या नेहमींच्या वहिवाटीस अनुसरून आधुनिक कवीची तरफदारी केली होती, व ती त्यांस रुचेल अशी आशा होती. परंतु त्या प्रस्तावनेनें त्यांचें समाधान होण्याचें बाजूस राहून आधुनिक कवीबद्दलच्या माझ्या प्रशंसोद्गारांनीं त्यांस राग मात्र सपाटून आला. माझ्या लेखणीतून उतरलेल्या त्यांच्या प्रशंसोद्गारांपेक्षां छापील प्रतीतील प्रशंसोद्गार जरा भारी स्वरूपाचे असावे असा माझा तर्क आहे. प्रस्तावनेचीं प्रुफें मजकडे पाठविण्याची मी सुमंतांस विनंति केली असतां त्यांनीं—" छापखाना लहान असल्यामुळें प्रुफें पाठविल्यास फार अडचण होईल. मी स्वतः प्रुफें आपल्या लेखाबरहुकूम तपाशीत आहे "—अशा अर्थाचें उत्तर पाठविलें. त्याचा प्रस्तावनेंतील कांहीं भारी विशेषणांशी मेळ घातला असतां माझा तर्क खरा ठरण्याचा बराच संभव आहे यांत संशय राहणार नाहीं. कसेंहि असलें तरी मी त्यावेळीं आतां यापुढें सुमंतांकडून आपणाकडे प्रस्तावनेची मागणी होण्याचा संभव नाहीं या विचारानें आपलें समाधान करून घेतलें. सुमंतांचा स्वभाव ज्यांना परिचित आहे त्यांना मला वाटलेल्या समाधानाचें आश्चर्य वाटणार नाही. इतर ग्रंथकारांप्रमाणें त्यांनाहि स्वतःच्या सामर्थ्याबद्दल अभिमान वाटतो यांत नवल नाहीं. पण त्याबरोबरच इतरांकडून आपला गौरव व्हावा अशी इच्छाहि त्यांच्यांत इतरांपेक्षां पुष्कळ पटीनें अधिक उत्कटतेंत दिसून येतें. मला रोजचे रोज अनेक पत्रांचीं उत्तरें पाठवावी लागत असल्यामुळें एखाद्याचें पत्र आल्याशिवाय आपण

होऊनच त्यास पत्र पाठविण्यास मला बहुधा सवड होत नाहीं. मात्र आलेल्या पत्राचें उत्तर ताबडतोब पाठविण्याची खबरदारी मी घेत असतों. इतराप्रमाणें सुमंतांसहि मी आपण होऊन कधी पत्र पाठवीत नाही, याबद्दल त्यांस माझा राग येतो. त्यांची प्रथम पत्नी वारल्यावर तिच्या निधनानें त्यांस झालेलें दुःख ' विरहगीती'च्या द्वारें बाहेर पडलें. त्याबरोबर त्या दुःखाचें अवतारकृत्यहि समाप्त झालें असेल अशी मला त्यावेळी शंकाहि आली नाहीं. परतु त्यानंतर लवकरच सुमंतांचें पत्र आलें, त्यांत त्यांनीं त्यांच्या नूतन विवाहास मदत म्हणून खामगांव येथें वर्गणी गोळा करण्याची मला विनंति केली होती. ती विनति मी साफ अमान्य केली हें मुद्दाम सांगण्याचें कारण नाहीं.

पत्नीविरहाचें दुःख काव्यौघाच्या वाटें पूर्णपणें ओसरून द्वितीय-भार्यासमागमांत लुप्तप्राय झाल्याचें माझ्या अनुभवांतील दुसरें उदाहरण माझे स्नेही नारायण केशव बेहेरे यांचें होय. या विलक्षण बुद्धिमान् व उत्साही लेखकाची प्रथम पत्नी त्यास शोभण्यासारखी कवयित्रीच होती. तिच्या निधनानें बेहेऱ्यांस झालेल्या तीव्र दुःखाचें यथातथ्य प्रतिबिंब त्यांच्या ' स्मरणी ' या सुंदर काव्यांत पाहावयास सांपडेल. मृत पत्नी जशी बुद्धीने तरतरीत होती तशी स्वरूपानें व स्वभावानेंहि सुंदर होती हें तें जोडपें खामगांवास एकदां आमच्याकडे आलें असतां अनुभवास आलें होतें. अर्थात् पतीच्या दुःखास सीमा राहिली नाही यांत नवल वाटण्यासारखें काही नव्हतें. पण तिच्या निधनास कांही महिने जातात न जातात तोंच बेहेऱ्याच्या नूतन विवाहाची बातमी कानी आली. पहिल्या पत्नीविषयीचें दुःख अजून अवशिष्ट राहिलें असल्यास त्याचा पूर्णपणें विसर पाडण्या-सारखीच बेहेऱ्यांना दुसरी पत्नीहि मिळाली आहे हें त्यांचें सुदैव होय. ही पत्नीहि बुद्धिमान् असून चांगली लेखिका व सभाधीट वक्त्री आहे. ही परस्परानुरूप पति-पत्नी चिरकाल संसारसुखाचा अनुभव घेवोत हीच त्यांच्या साऱ्या स्नेह्यांची इच्छा आहे.

माझ्या प्रस्तावनेचा जाहिरातीप्रमाणें उपयोग होतो हें पाहून अनेकांनी मजकडे प्रस्तावनांसाठी मागण्या केल्या. पण मी त्याच कारणाकरितां त्या आभारपूर्वक नाकारल्या. प्रस्तावनालेखनाचें काम मला मुळींच आवडत नाही. त्यांतून पुस्तक भाषांतररूप असल्यास तर त्याला प्रस्तावना लिहिण्यास

मला कधींहि उत्साह वाटत नाहीं. नुकतीच सावंतवाडीच्या माजी महाराणा-साहेबांतर्फें त्यांच्या एका भाषांतररूप पुस्तकास प्रस्तावना लिहिण्याबद्दल मला विनंति करण्यांत आली होती; व मी ती मान्यहि केली होती. परंतु त्याच सुमारास मला खामगांव सोडून जळगांव येथें वकिलीकरितां यावें लागल्यामुळें जळगांव येथील भारी कामाचें निमित्त पुढें करून मला ती आपत्ति टाळतां आली.

## १७

'मनोरंजना'कडून १९१२ साली निरानिराळ्या लेखकांकडून जाति-भेदावर मतें मागविण्यांत आलीं होतीं, त्यांत माझेंहि मत मागविलें होतें. मीं अर्थातच आपलें प्रतिकूल मत पाठवून दिलें. तें त्याच सालीं छापून आलें आहे. त्याचप्रमाणें 'सुभाषिता'वर 'चंद्रिकें'त व "नाटकांत स्त्रियाच्या भूमिका स्त्रियांनीं केल्या पाहिजेत काय?" या प्रश्नावर 'रंगभूमी'त माझीं मतें अनुक्रमें प्रसिद्ध झाली आहेत. त्या प्रश्नांस मी होकारार्थीच उत्तर पाठविलें होतें.

१९१२ साली 'विविधज्ञानविस्तारा'नें दिल्लीदरबार निमित्त 'इंग्रज सरकारच्या कारकीर्दींत झालेली भिन्न-भिन्न बाबतींतील प्रगति' या विषयाच्या भिन्न-भिन्न अंगांवर अनेक लेखकांचे लेख मागवून प्रसिद्ध केले. त्यांत माझा लेख 'मराठी कथात्मक वाङ्मय' या मथळ्याचा असून त्यांत मराठी कादंबऱ्यांचा आमूलाग्र इतिहास दिला होता. तो बऱ्याच जणांस आवडला असावा असें दिसलें. विष्णु मोरेश्वर महाजनींनी—"हा लेख लिहिण्यापूर्वी लेखकानें जितके परिश्रम केले तितके प्रत्येक लेखकानें लेख लिहिण्यापूर्वी केले पाहिजेत"—अशा अर्थाचे मुंबईच्या 'हिंदु युनियन क्लब'मध्यें उद्गार काढिले. त्यानंतर मी त्यांस भेटावयास गेलों असतां त्यांनीं मजपाशींहि आपलें अनुकूल मत प्रदर्शित केलें.

या निबंधाचा एक परिणाम असा झाला की मजकडे तोंपर्यंत बहुधा नाटकेंच अभिप्रायाकरितां व सूचनांकरितां येत असत; त्यांच्या जोडीला आतां प्रकाशित व अप्रकाशित अशा अनेक कादंबऱ्याहि येऊं लागल्या. एखादी-दुसरी कादंबरी आली नाही असा एक महिनाहि जाईनासा झाला.

अशा पुस्तकांवर मतें किंवा सूचना कळविण्यापूर्वी मला ती अत्यंत काळजीपूर्वक वाचून हस्तलिखित किंवा छापील प्रतींतील पृष्ठांच्या कोऱ्या भागावर सिसपेन्सिलीनें बरेंच लिहावें लागे व त्यामुळें फार दगदग पडे. याप्रमाणें गेलेल्या अभिप्रायातील गुणवर्णनपर भागच तेवढा लेखकाकडून छापविण्यांत येई. यामुळें सामान्य पुस्तकाचीहि अवास्तव प्रशंसा केल्याचा आरोप मजवर येई. माझे अनेक अभिप्राय ' सरसवाङ्मयरत्नमाले 'च्या अनेक पुस्तकांतील जाहिरातींच्या पृष्ठांवर अशा विकृत स्वरूपांत आलेले आढळतील. मी पुस्तकांवरील आपलें खरें मत कधीहि देत नसून अनुकूल मतच देत असतों असा जो पूर्वीपासून नाटक-मंडळयांत व संपादकांमध्यें माझा लौकिक होता त्यांत अशा अभिप्रायांनीं भर पडली. त्यांस दाखविण्याकरितां मजपाशीं कोणी शिफारसपत्र मागितल्यास माझी त्यांजपाशीं अगदी नापत झाली आहे अशी सबब मला सांपडल्यामुळें माझी त्यानें एक सोयहि झाली.

एकदां कारखानीस भेटले असतां त्यांनी—" ' प्रेमशोधन ' नाटक आम्हांस देण्याचें कबूल केलें असतां तें ' किर्लोस्कर मंडळीस 'स देण्यांत आलें "—अशी तक्रार केली. तुमच्याकडून त्याबद्दल निश्चयात्मक मागणी आलेली नसल्यामुळें तसें झालें असें मी त्यांस उत्तर दिलें. त्या भेटींत मी ' महाराष्ट्र मंडळी 'करितां एक गद्य नाटक लिहिण्याचें कबूल केलें. यानंतर यशवंतराव टिपणीस यांनी त्या मंडळीतून फुटून ' भारत नाटक मंडळी ' काढिली. जुन्या गद्य नाटकांच्या प्रयोगांची त्यांस परवानगी नसल्यामुळें नवी नाटकें मिळविणें त्यांस आवश्यक झालें. त्यांच्या विनंतीवरून मी १९१२ च्या नाताळांत एक गद्य नाटक लिहिण्याचें कबूल केलें. मात्र त्याच्या प्रयोगाचा अव्यभिचारी अधिकार त्यांस देतां येणार नाहीं असेंहि मी त्यांस त्याच वेळी बजाविलें. असा अधिकार देणें मला मुळींच पसत नव्हतें, व माझी तशी वहिवाटहि नव्हती. शिवाय ' महाराष्ट्र मंडळी 'स गद्य नाटक देण्यास मी बांधलेला असल्यामुळेंहि प्रयोगाचा हक्क एकट्या ' भारत मंडळी 'स देण्यास मी मोकळा नव्हतों.

नाताळाच्या १५—२० दिवस पूर्वी यशवंतराव टिपणिसांचे व माझे तरुण स्नेही पुरुषोत्तम रामचंद्र लेले टिपणिसांतर्फे मला नाटकाची निकड लावण्याकरितां खामगांव येथें आले. लेले हे माझ्या नाटकांचे अत्यंत अभिमानी असून त्यांनी ' प्रेमशोधन ' नाटकावर ' रंगभूमि ' मासिकांत एक

अनुकूल टीकाहि केली होती. ते खामगांवास आले त्याच्या पूर्वींपासून मला बारीक ताप येत असून खोकल्याची ढांसहि सुरू झाली होती. अशा स्थितींत नाटक मजकडून कसें पार पडेल याची मला काळजीच होती. परंतु कबूल केल्याप्रमाणें नाताळांत नाटक लिहून पुरें करावयाचें हा कृत-संकल्प होता.

पूर्वीच्या कांही नाटकांच्या लेखनाचे वेळी अनुकूल शकुन झालेले असल्यामुळें या वेळेसहि शुभशकुन होतात कीं काय याची मी वाट पाहात बसलों, परंतु एकहि शुभशकुन प्रत्ययाला येईना. उलट बारीक ताप व खोकला दिवसेंदिवस वाढत्या प्रमाणावर दिसूं लागले. कसेंहि असलें तरी मी आपलें वचन पार पाडणारच असें मी लेल्यांस निश्चयपूर्वक सांगितलें. मुंबईस जाण्याचा दिवस उजाडला, तरी शकुन नाहीं. संध्याकाळी जेवण घाईघाईनें उरकून आम्ही स्टेशनावर जाण्याकारितां निघालों,— तोंच बरेंच दिवसांपासून मी ज्या शकुनाची वाट पाहत होतों तो घडून आला. मला एकाएकी हलकें झाल्यासारखें वाटून अंगात विलक्षण उत्साह संचरूं लाग-ल्याचा भास झाला. रस्त्यानें चालतांना मी हवेवर तरंगत आहें कीं काय असें वाटावयास लागलें. ताप नाहीसा झाला, व क्षणोक्षणी उचंबळूं पाहणारी खोकल्याची ढांस बंद झाली. यापूर्वी मला जे चमत्कार दिसले होते त्यांची काकतालीय न्यायाच्या आधारानें उपपत्ति लावितां आली असती. पण हा चमत्कार अलौकिक या सदराखाली पडण्यासारखा होता. मी ताबडतोब लेल्यांस शकुन मिळाल्याचें सांगितलें; व म्हटलें—" हा चमत्कार तुम्हांस उद्यां सांगितल्यास तुमचा मजवर विश्वास बसणार नाहीं, म्हणून मी तो आतांच सांगत आहें. आज रात्री मला खोकल्याची ढांस येते कां हें तुम्हीं लक्षपूर्वक पाहा. आल्यास हा सारा माझ्या श्रद्धाळूपणाचा खेळ आहे असें बिनदिक्कत म्हणा." चमत्काराची गोष्ट ही की मुंबईस पोहोंचेपर्यंत मला खोकल्याची ढांस एकदांसुद्धां आली नाही व सारी रात्र विलक्षण उत्साहाचा व आनंदाचा अनुभव येत होता.

मी स्वतः इतका श्रद्धाळू असतां देवभोळेपणाची मनस्वी थट्टा करीत आलों आहें याचें कारण हेंच की मला या खेपेस दिसून आलेल्या चमत्कारा-सारखा चमत्कार क्वचितच प्रत्ययाला येतो. व्यवहारांत श्रद्धाळू वृत्ति ठेविल्यास तिचा कार्यसाधु लोकांकडून फायदा घेण्यांत येतो. सबब प्रत्येकानें व्यवहारांत

वागतांना वृत्ति संशयीच ठेविली पाहिजे. चमत्कारांची अपवादांत गणना करून भक्कम पुरावा समोर आल्याशिवाय त्यांजवर विश्वास ठेवतां कामा नये. शिवाय या चमत्कारांच्या मुळाशीं बहुधा आपणांस अजून अज्ञात असलेले नैसर्गिक नियमच असतात. अजून भौतिकशास्त्रास मनाच्या मनोधर्माचें व सामर्थ्याचें ज्ञान झालें नाही. तें होत जाईल तसतसें चमत्कारांचें क्षेत्र सकुचित होत जाईल यांत शंका नाही. तत्त्वज्ञान व व्यवहार यांत वर लिहिल्याप्रमाणें दुहेरी दृष्टि ठेवणें नेहमी इष्ट असतें. प्रयत्न चालू असेपर्यंत प्रयत्नवादी व तो फसल्यास दैववादी अशी वृत्ति मी ठेवीत असतों याचेंहि रहस्य अशाच प्रकारचें आहे. त्यानें प्रयत्न नेटाचा होऊन त्याच्या विफलतेनें उद्विग्नताहि वाटत नाहीं.

मुंबईस गेल्यावर एक दिवस विश्रांति घेतली. त्या दिवशी तिसऱ्या प्रहरीं टिपणिसांच्या ' मत्स्यगंधा ' नाटकाचा प्रयोग होता, तो पाहण्यास गेलों. प्रयोग इतका चांगला वठला की माझ्या नव्या नाटकाच्या चांगुलपणाबद्दल मन साशंक झालें. शिवाय त्याच दिवसापासून मला पुन्हां बारीक ताप व खोकला सुरू झाला होता. पण निघतांना घडलेल्या साक्षात्कारामुळें नाताळांत नाटक पूर्ण होणार याबद्दल मला शंका वाटत नव्हती. लेल्यांनीं माझ्याकरितां अमृतलाल ठक्कर यांच्या बिऱ्हाडांत ( त्याच बिऱ्हाडांत लेलेहि राहत असत ) एका खोलीची व्यवस्था केली होती. तिच्यांत मोरी नळ वगैरे सोई होत्या. नाटकलेखनाच्या दिवसांत मी बाजारांतील पाव, लोणी, मोरंबा ( जॅम ) हें साहित्य व अमृतलालचे बंधु नारायणजी यांजकडील आमटी इतक्याच अन्नावर गुजारा करण्याचें ठरविलें. ढांशीकरितां खोकल्याच्या गोळ्यांची ( Cough lozenges ) एक बाटली समोर ठेविली. याप्रमाणें तयारी करून २५–१२–१२ रोजीं मी ' वधूपरीक्षा ' नाटक लिहावयास बसलों.

## १८

पहिल्याच दिवशीं कुणबी भाषेबद्दल एक जबरदस्त अडचण उपस्थित झाली. मी ' नाटकांतील कुणबी भाषा ' या विषयावर निबंध लिहिण्याकरितां कांही वर्षांपूर्वीं टिपणें तयार केली असून ती मुंबईस नेण्याचें ठरविलें

होतें. पण निघण्याच्या गडबडींत तीं खामगांवास राहून गेलीं होती. त्या टिपणांची प्रयागपंडित खंडेराव कोतवाल यांच्या प्रवेशाच्या सुरुवातीस आठवण झाली; व ती टिपणें खामगांवास राहिलीं हें लक्षांत येतांच पोटांत धस्स झालें. पण लागलीच शकुनाचा विचार येऊन टिपणांतील माहितीच्या पुसट आठवणींवरच काम रेटण्याचा संकल्प केला. पहिले चार दिवस अंगांत बारीक ताप होताच. संध्याकाळीं स्नेही मंडळी भेटावयास येत तेव्हां त्यांच्यासह गप्पा-गोष्टी करण्याकरितां आमच्या ठिकाणाच्या वरच्या भव्य गच्चीवर एखादा तास बसत होतों, त्यामुळें ताप वाढत असे. हा अनुभव आल्यापासून मी गच्चीवरची बैठक अजीबात वर्ज्य केली. पांचव्या दिवशीं ताप बंद झाला; पण खोकला अखेरपर्यंत चालूच होता. त्यावर तात्पुरता इलाज म्हणून मी मधून-मधून बाटलींतील गोळ्या घेत असे.

३१ व्या तारखेस चार अंक पूर्ण होऊन पांचव्या अंकाचाहि कांहीं भाग लिहून पूर्ण झाला. तोंपर्यंत मी चित्तक्षोभाच्या भीतीनें एकदांहि घराबाहेर पडलों नव्हतों. पण आतां चित्तविक्षेप झाला तरी फारसें नुकसान होण्यासारखें नाहीं असें वाटून कंटाळलेलें मन रिझविण्याच्या उद्देशानें मी फिरावयास निघालों. समुद्रकिनाऱ्यानें सपाट्यानें सहल करून ‘ भारत नाटक मंडळी’च्या बिऱ्हाडीं गेलों व उदईक दोनप्रहरीं नाटक संपूर्ण होणार असें त्यांस कळविलें. दुसरे दिवशीं दुपारीं एक वाजतां नाटकाचा शेवटचा प्रवेश लिहिणें चालू असतांना दाराबाहेर गोंगाट ऐकूं आल्यामुळें बाहेर येऊन पाहतों तों यशवंतराव टिपणीस व त्यांच्या मंडळीमधील प्रधान, पोतनीस वगैरे कांहीं प्रमुख नट लेल्यांच्या बरोबर बोलत असलेले दिसले. नाटक अर्ध्या तासांतच पुरें होईल असें त्यांस सांगून मी पुन्हां लिहिण्यास बसलों व शेवटचा प्रवेश लवकरच संपविला.

त्यानंतर खोलीबाहेर येऊन कांहीं वेळ मंडळीशीं बोलण्यांत घालविला. मंडळींच्या आग्रहावरून नाटक वाचण्यास सुरवात केली. वाचनास नाटकमंडळींतील इसमांशिवाय गुर्जर हेहि हजर होते. नाटकलेखन चालू असतांना संध्याकाळशिवाय इतर वेळीं भेटण्याची लेल्यांनीं माझ्या स्नेह्यांससुद्धां मनाई केली होती. गडकरी तर पहिल्या भेटीनंतर माझ्या बिऱ्हाडाकडे फिरकलेहि नाहींत. गुर्जर मात्र रोज भेटत असत. परंतु त्यांच्या मनांत लेल्यांबद्दल व

मजबद्दल मनस्वी संताप उत्पन्न झाला होता. वाचन चालू असतांना टिपणिसांशिवाय इतर कोणाकडूनहि मला विशेष प्रोत्साहन मिळालें नाही. टिपणिसांस एका वाङ्‌निश्चयसमारंभाकरितां बाहेर गांवीं जावयाचें असल्यामुळें ते तिसऱ्या अंकाच्या अखेरीसच मधून उठून गेले. त्यानंतरचा भाग मी मोठ्या नाखुषीनें कसाबसा उरकून टाकिला. नट श्रोत्यांस नाटकाचें कथानक मुळींच कळत नसून ते केवळ मुर्वतीस्तव बसले होते असें मला मागाहून बऱ्याच दिवसांनी टिपणिसांकडून कळलें. नाटक बसवितांना मात्र तें त्यांना हळूहळू कळावयास लागून लवकरच आवडावयासहि लागलें. त्रिवेणीची भूमिका तर पोतनिसांची अत्यंत आवडती होऊन बसली.

नाटकाचें वाचन संपल्यावर गुर्जरांस त्यांचें मत विचारतां त्यांनीं तें अगदी कुचकामाचें झालें आहे असें आपलें मत दिलें. त्यांच्या उलटतपासणींत नाटकांत विनोद आहे, स्वभावचित्रें बरी साधलीं आहेत, कल्पनाहि बऱ्या आहेत, असा कबुलीजबाब त्यांच्या तोंडून आस्ते-आस्ते बाहेर पडला. तथापि माझ्या नाटकांत जें वैशिष्ट्य असतें तें या नाटकांत नाही असें ते आग्रहानें म्हणतच राहिले. यानंतर माझे स्नेही रामचंद्र भास्कर ऊर्फ भाऊसाहेब जयवंत यांना तें नाटक अत्यंत आवडल्याचें पाहून गुर्जरांचेंहि त्याबद्दलचें मत बदललें. तें इतकें कीं तें नाटक कलेच्या दृष्टीनें अत्यंत श्रेष्ठ झालें आहे, असें मानण्यापर्यंत त्यांची मजल गेली.

नाटक श्रोत्यांत फारसें आवडलें नाहीं असें जरी माझ्या दृष्टोत्पत्तीस आलें होतें तरी कर्तव्यांतून पार पडल्याबद्दल मला मनांतून अत्यंत समाधान वाटत होतें. त्या दिवशीं संध्याकाळी मला जयवंतांकडे जेवावयास जावयाचें होतें. त्या दिवशीं संध्याकाळी यापुढें आतां पथ्य पाळावयाचें कारण नाहीं असें वाटून मी माझ्या आवडीचें थंड पेय ( कोल्ड ड्रिंक ), आईस्क्रीम वगैरे पदार्थांचा यथेच्छ समाचार घेण्याचा निश्चय केला व तो अमलांतहि आणिला. जेवतांना मी इतक्या मोकळ्या मनानें बोललों व हंसलों की तसा साऱ्या जन्मांत बोललों-हंसलों नसेन. डोक्यावरचें एक मोठें दडपण नाहीसें झाल्यामुळें मी स्वच्छंदानें वागण्यास मोकळा झालों होतों व मी आपल्या स्वातंत्र्याचा त्या प्रसंगी यथेच्छ उपयोग करून घेतला. याचा परिणाम असा झाला की गेल्या आठ दिवसांत माझी झोंप जी संपुष्टांत आली होती, कोठा

साफ राहत नव्हता, व खोकलाहि जोरांत होता, त्या साऱ्या गोष्टी त्या संध्याकाळपासून पार बदलून गेल्या व प्रकृति पूर्ववत् निकोप झाली.

दुसऱ्याच दिवशी मी कारखानिसांस व रघुनाथराव गोखले यांस ( यांसहि मी प्रयोगाची परवानगी देण्याचें कबूल केलें होतें ) नाटक तयार असल्याबद्दल व त्याची नक्कल करून घेण्याची तजवीज करण्याबद्दल लिहिलें, व त्यानंतर जो थोडा वेळ माझा मुंबईत मुक्काम होता तो मी नाटकांत सुधारणा करण्यांत घालविला. नाटकाची अनेक पृष्ठें फेरफारांमुळें चिताड झालीं होती तीं लेल्यांस समजावून देऊन व कारखानिसांकडून व गोखल्यांकडून नक्कल करून घेण्याकरितां इसम आल्यास त्यांस प्रतींतील दुर्वाच्य भाग समजावून देण्याचें त्यांजपासून वचन घेऊन मी प्रत त्यांच्या हवालीं केली व परत खामगांवास आलों. प्रत लेल्यांच्या स्वाधीन केल्याचें मी कारखानिसास व गोखल्यांस कळविलें होतें. अस्सल प्रत न पाठवितां मुंबईत नक्कल करून घेण्याची मी कारखानिसांस जी सूचना केली होती तिचा त्यांस फार राग आला. मी त्यांना तसें करण्याचीं कारणें कळविलीं. एक कारण ती प्रत अत्यंत दुर्वाच्य झाली असून माझ्या किंवा लेल्यांच्या साह्यावांचून तिचे बरेच भाग अडण्यासारखे होते. शिवाय एकदां ‘ गुप्तमंजूष ’ नाटकाची अस्सल प्रत बोडसांनी मजकडे रजिस्टर न करितां पाठविल्यामुळें हरवली होती व तसें होण्याचा या खेपेसहि संभव होता. याप्रमाणें मी खुलासा केला असतांहि कारखानिसांच्या मनांतील शल्य निघालें नाही. उलट तें अधिक खोल रुतण्यास कारण झालें. तें असें :—लेले यांजकडून कारखानिसांस नक्कल करून घेण्याच्या कामी मदत न होतां उलट त्या कामांत अडथळे मात्र येऊं लागले. यामुळें साहजिकच माझी लेल्यांस व टिपणिसांस फूस असल्याबद्दल कारखानिसांस संशय आला. त्यांनी त्यासंबंधानें मजकडे तक्रार केली असतां मी ताबडतोब प्रत त्यांजकडे धाडण्याबद्दल लेल्यांस लिहिलें. त्याजकडून असें उत्तर आलें की—“ कारखानिसांनी त्यांना न लिहितां मला लिहिलें हें गैर झालें; व त्यांजकडून त्यांना पत्र गेल्यास प्रत पाठविण्यास ते तयार आहेत. ” इतके दिवस कारखानिसांचा विनाकारण खोळंबा करून व माझ्या वचनाला हरताळ लावून नंतर मानापमानाच्या थंड गोष्टी करितांना लेल्यांस पाहून मला त्यांचा फार राग आला, व प्रत ताबडतोब कारखानिसांकडे पाठवावी अशा अर्थाची मी त्यांस तार पाठविली. तिची

लागलींच अंमलबजावणी करण्याच्या ऐवजीं त्यांनी मला पुन्हां मानापमानाच्या चर्चेनें परिपूर्ण असें पत्रच पाठविलें. असो. यानंतर लवकरच प्रत कारखानिसांकडे रवाना करण्यांत आली. पण झालेल्या प्रकारामुळें मजसंबंधानें कारखानिसांच्या मनांत व लेल्यासंबंधानें माझ्या मनांत जी तेढ उत्पन्न झाली ती त्यानंतर बरींच वर्षें नाहींशी झाली नाहीं. कारखानीस एक-दोनदा कंपनीसह खामगांवी आले असतां मी त्यांची दिलसफाई करण्याचा बराच प्रयत्न केला व तो सिद्धीसहि गेला असें वाटतें. वरील शोचनीय प्रकारानंतर लेले एकदां मजकडे खामगांवीं आले होते. पण त्यांनीं त्याबद्दल दिलगिरी प्रदर्शित केली नाहीं किंवा त्याचा खुलासाहि केला नाही. तेव्हांपासून मी त्यांच्याशीं तुटकपणानें वर्तन ठेविलें असून आमचा पत्रव्यवहारहि पूर्वींइतका व पूर्वींसारखा राहिला नाहीं.

'भारत मंडळीं 'तील त्या वेळचे नट विशेष नाट्यकुशल असल्यामुळें तिचे 'वधूपरीक्षा' नाटकाचे प्रयोग विशेष उठावदार होत असत. 'महाराष्ट्र मंडळी 'चे त्या नाटकाचे प्रयोग फारसे वठत नसत. हें नाटक १९१४ सालीं 'मनोरंजन छापखान्यां 'त छापिलें त्यासंबंधाचा मजकूर वर आलाच आहे. यावेळीं माझें मन लेखनास व मुद्रणास अगदीं कंटाळून गेलें असून माझा शक्य तितक्या लवकर नाटकाच्या मुद्रणांतून मोकळा होण्याचा विचार होता व यामुळें मुद्रणास अवाच्यासवा खर्च झाला असतांहि मी तो आनंदानें सहन केला. 'वधूपरीक्षे 'च्या प्रयोगाच्या हक्काच्या व प्रतींच्या विक्रीपासून मला आजपर्यंत इतकें कमी उत्पन्न झालें आहे कीं त्यांतून खर्चाचा निम्माशिम्मा भाग तरी वसूल झाला आहे कीं काय याची शंकाच वाटते. यापुढें निव्वळ गद्य नाटक लिहावयाचें नाहीं असा मनाचा निर्धार झाला आहे.

१९१३ च्या मार्चच्या ८ व्या तारखेस माझे वडील बंधु ती. दत्तात्रय कृष्ण कोल्हटकर अकोला मुक्कामीं मरण पावले. आम्हां उभयतांमध्यें अनेक बाबतींत तीव्र मतभेद असतांहि आमचें एकमेकांवर अत्यंत प्रेम होतें. यामुळें त्यांच्या निधनानें माझ्या मनाला मोठा धक्का बसला. त्यांनीं स्वतःच्या पत्रिकेंतील ग्रहांवरून आपलें भविष्य वर्तविलें होतें. मरणाच्याच दिवशीं म्हणजे शनिवारीं रात्रीं आजची रात्र निभावली म्हणजे मला मुळींच भय नाहीं असें त्यांनीं मला आश्वासन दिलें होतें, व त्यानंतर आम्ही सारीजणें मौजेनें बोलत बसलों असतां एकदम त्यांस उचकी येऊन त्यांचा अंत झाला.

त्यांच्या मरणानें अकोल्यांतील अत्यंत लोकप्रिय व परोपकारी गृहस्थ नाहींसा झाला. त्यांची जागा अजून भरून निघालेली नाहीं.

त्यांच्या मरणानंतर त्यांची स्त्री व अल्पवयी मुलगा सुमारें एक वर्ष मजकडे होतीं. नंतर तीं अकोल्यास आपल्या मालकीच्या चाळींत राहावयास गेलीं. चाळीच्या व शेतांच्या उत्पन्नावर त्यांचें चांगलें चाललें असून माझ्या भावजयीनें जुन्या मिळकतींत काटकसरीनें भरच घातली आहे.

'केसरी' छापखान्यांतील सदाशिवराव भावे यांना केळकरांचें 'तोतयाचें बंड' हें नाटक फार आवडलें असून त्याजवर मी टीका करावी अशी त्यांनीं या सुमारास मजपाशी इच्छा प्रगट केली, व मी तिला अनुसरून टीका करण्याच्या तयारीला लागलों. नाटकांतील गुणावगुणांचा विचार करितांना नाटकास सामान्यपणें आवश्यक असणाऱ्या गुणांसंबंधानेंहि विचार घोळूं लागले. खाडिलकरांनीं १९०७ सालच्या 'नाट्य-संमेलना'समोर केलेल्या भाषणांत तत्संबंधी नियमांचा कांही ऊहापोह केला होता; तेव्हांपासून माझ्या डोक्यांत तो विषय घोळूं लागला होता; व कांही नियम मी आपल्या मनाशी निश्चितहि करून टाकिले होते. 'तोतयाच्या बंडा'चा विचार करितांना तत्संबंधी विचारांस पुन्हां चालन मिळालें. त्या टीकेच्या पूर्वार्धांत मी भिन्न-भिन्न कलांची साध्य-साधनांच्या मांडणीच्या दृष्टीनें केलेली परस्पर तुलना, साधनांच्या अत्यंत अल्प सामुग्रीच्या साह्यानें अत्यंत चित्ताकर्षक साध्य साधणें हेंच प्रत्येक कलाकुशलाचें ध्येय असतें हें केलेलें विधान, साधनसंपत्ति अल्प दिसण्यासाठी लेखकांकडून अमलांत येणाऱ्या योजनांचें वर्णन, 'मृच्छकटिका'चें माझ्या विधानांच्या दृष्टीने केलेलें परीक्षण इत्यादि कांही भाग माझ्या वाचनांत आलेल्या कोणत्याहि लेखाच्या आधारें लिहिलेले नसून अगदीं स्वतंत्र होते. त्यांचा विचार करण्यांत मी कितीतरी दिवस व कितीतरी रात्री खर्च केल्या. माझा सिद्धांत माझ्या स्वतःच्या मनास ज्यावेळीं पूर्णपणें पटला, त्यावेळीं मला झालेला आनंद मला सबंध आयुष्यांत पांच-चार वेळांच अनुभविण्यास सांपडला असेल. असो. या टीकेच्या पूर्वार्धाची भवति-न-भवति करण्यास व तो लिहिण्यास ३—४ महिने लागले. त्यांत दिलेले नियम उत्तरार्धांत टीकाविषयीभूत नाटकास लावून दाखवावयाचे होते. मी १९१३ सालचे नाताळांत माझे विद्वान् व रसिक मेहुणे मनोहरपंत गोळवेलकर यांच्या निमंत्रणावरून जबलपुरास गेलों असतां तेथें नाटकाच्या

गुणावगुणांसंबंधानें त्यांच्याशीं व त्यांच्या स्नेह्यांशीं जी चर्चा केली तिचा उपयोग उत्तरार्ध लिहितांना फार झाला. असो.

या टीकेचा पूर्वार्ध १९१४ सालीं ‘ मनोरंजना ’च्या पहिल्या, दुसऱ्या व तिसऱ्या अंकांत व ( चवथ्या म्हणजे ‘ वसंत अंकां ’त माझी ‘ तुलसीरामायणा ’वरील लघु टीका आल्यानंतर ) उत्तरार्ध पांचव्या व सहाव्या अंकांत प्रसिद्ध झाला. पूर्वार्धाच्या काठिण्याबद्दल वासुदेव गोविद आपट्यां-सारख्या कांहीं गृहस्थांकडून त्याची थट्टा झाली; तथापि तो एकंदरींत बऱ्याच विद्वानांस आवडला असावा असें त्यावर प्रकट झालेल्या अभिप्रायां-वरून वाटतें. माझें ‘ तोतयाच्या बंडा ’बद्दल आरंभी जें अनुकूल मत झालें होतें तें त्यावर झालेल्या काथ्याकूटानंतर बरेंच थंडावलें यांत नवल नाहीं; व मी त्या नाटकांतील अनेक भागांची जरी मुक्तकंठानें स्तुति केली होती तरी तिनें केळकरांस विशेष समाधान वाटलें नसावें असें मला दिसून आलें.

## ५१

१९१४ च्या जुलई महिन्यांत लागोपाठ दोन-तीनदां डाव्या कानास लागलेल्या थंड वाऱ्यामुळें माझ्या मुखास अर्धांगवायूचा विकार झाला. प्रथम डाव्या कानास सारखा ठणका सुरू झाला व त्याचें लवकरच चेहऱ्याची डावी बाजू लुली पडण्यांत पर्यवसान झाले. डावी भिवई वर होईना, डावा गाल हलवतां येईना, ओंठाची व हनुवटीची डावी बाजू खाली लोंबकळूं लागली, डाव्या डोळ्यांतून पाणी वाहूं लागलें व ओष्ठ्यवर्णाचा उच्चार होईना. मोरोपंतांनी ‘ निरोष्ठ रामायण ’ लिहिलें त्या वेळीं त्यांना अशा प्रकारचा वातविकार झाला होता कीं काय कोण जाणे. मी तोंडाची डावी बाजू शेकून पाहिली, पोटांत औषध घेणें सुरू केलें व रोज पहांटे पांच-पांच सात-सात मैल चालण्याचा क्रम ठेविला. परंतु विकाराच्या पिछेहाटीची गति फारच मंद दिसून येऊं लागली. हे दिवस मी फारच काळजींत घालविले. माझें वाचेंतील व्यंग कायमचेंच होऊन बसतें कीं काय अशी मला दहशत पडली. कांहीं महिने याप्रमाणें अत्यंत तीव्र चिंतेंत घालविल्या-वर डाव्या बाजूंत थोडें चलन-वलन दिसूं लागलें व ती सुधारणा उत्तरोत्तर सावकाशच पण अधिकाधिक प्रमाणावर दिसून येऊं लागली. १–१॥ वर्षांत

विकार इतका निवळला की मला वातविकार झाला होता ही गोष्ट केवळ माझा चेहरा पाहून किंवा भाषण ऐकून सहसा लक्षांत येईनाशी झाली. तथापि त्या विकाराचे परिणाम अजूनहि पूर्णपणें नाहींसे झालेले नाहीत. अजून माझ्या डाव्या डोळ्यांतून पाणी जात असतें व वाचेंतला जडपणा अल्पांशानें का होईना अजून कायम आहे.

ज्या वर्षी माझ्या वाचेंत व्यंग्य उत्पन्न झालें, त्याच वर्षी मी जाहीर व्याख्यानें देण्यास सुरवात करावी हा एक विलक्षण योगायोग म्हटला पाहिजे. लहानपणी विद्यार्थ्यांच्या सभांतून मी एखादे-दुसरें भाषण केलें असेल व एखादा-दुसरा निबध वाचिला असेल, पण एकंदरीनें माझ्या मनाचा कल वक्तृत्वास पूर्णपणें प्रतिकूल होता. माझ्या अंगीं समाधीटपणाचा पूर्ण अभाव होता. जाहीर व्याख्यान देतांना विचारांची संगति अविच्छिन्नपणें कायम ठेवण्यास जें प्रसंगावधान अंगीं असावें लागतें तें माझ्या अंगीं मुळींच नव्हतें. उलट प्रकृत विषयाहून भिन्न विषयाकडे धांव घेण्याची माझ्या ओढाळ मनाला लहानपणापासून दुष्ट खोड लागली होती. खाजगी संभाषण कारितांना कोट्या-कल्पनांत स्वैर विहार करणारी माझी जिव्हा सभेंत मूक होऊन बसत असे. मी लखनौ येथें ‘ सामाजिक परिषदें ’त केलेल्या भाषणाची हकीकत पूर्वी दिलेलीच आहे. त्यानंतर सातार्‍यास ‘ साहित्य-संमेलना ’ची पहिली बैठक भरली त्या प्रसंगीं संमेलनाच्या आवश्यकते-संबंधाचा पहिला ठराव आणण्याचा मान मजकडे देण्याचा वासुदेवराव आपटे प्रभृति मंडळीचा विचार होता. पण तो मान स्वीकारण्याचें मी साफ नाकारिलें. त्या मंडळीनें मला आग्रह करण्यांत तास-दोन तास खर्ची घातले, पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. अखेरीस पाहिल्याच ठरावास दुजोराहि नव्हे तर पुष्टि देण्यास मी मोठ्या जुल्मानें तयार झालों व तें काम एकाच वाक्यांत उरकून टाकिलें. माझ्या पूर्वींच्या दोन वक्त्यांचीं भाषणें चटकदार व कांहींशीं लांब झालेलीं असल्यामुळें माझ्या आखूड भाषणानें साहजिकच सभेंत हंशा झाला.

यानंतर मी तेल्हारा सोडून खामगांवास वकिलीकरितां आलों, तेव्हां तेथील कांहीं मंडळींनीं माझ्या सन्मानार्थ एक समारंभ केला होता, त्या प्रसंगीं मला थोडेंसें बोलावें लागलें. पुढें १९०८ सालीं बाळ गंगाधर टिळक प्रथमच खामगांवास आले तेव्हां त्यांच्या भाषणप्रसंगी मला प्रास्ताविक भाषण

करावें लागलें. श्रोतृसमुदाय पांच-सात हजारांचा असतांहि माझ्या उच्चस्वरामुळें तें भाषण सर्वांस ऐकूं गेलें. महादेव गोविंद रानडे हे राजकीय व सामाजिक अशा दोन्ही स्वरूपांच्या चळवळीचे अध्वर्यु असून त्यांपैकीं सामाजिक सुधारणा आगरकरांनी व राजकीय सुधारणा टिळकांनीं हातीं घेतली असा त्या भाषणाचा इत्यर्थ होता. टिळकांनी आपल्या भाषणाच्या सुरवातीस माझ्या विधानाचा निर्देश करून हल्ली सामाजिक सुधारणेपेक्षां राजकीय सुधारणेचीच आवश्यकता आहे असें प्रतिपादन केलें. असो.

अशा अपवादात्मक प्रसंगांशिवाय मी बहुधा कधींहि सभेंत आपले तोंड उघडलें नव्हतें. पण आपल्याकडे समाज लेखकांपासून व्याख्यानाचीहि अपेक्षा करीत असल्यामुळें उत्तरोत्तर मला सभाधीटपणाची अधिकाधिक आवश्यकता भासूं लागली. मी हा गुण संपादन करण्याचा अंतिम हेतु लक्षांत ठेवून जाहीर भाषणास सुरवात केली ती ' दिल्ली दरबार'चे स्मरणार्थ शाळांतून जे वार्षिक समारंभ होतात त्यांच्या प्रसंगी अध्यक्ष या नात्यानें केली. याप्रमाणें लागोपाठ दोन-तीनदां भाषणें केल्यावर माझी भीड बरीच चेपली गेली व प्रत्येक प्रसंगीं मला श्रोत्यांकडून मिळत गेलेल्या उत्तेजनानें माझी सभाभीरुता बरीच कमी होऊन माझ्या अंगी एक प्रकारचा आत्मविश्वास उत्पन्न झाला. १९१७ साली हायस्कूल बोर्डिंगच्या गणेशोत्सव प्रसंगी माझें अध्यक्ष या नात्यानें समारोपादाखल जें भाषण झालें तें या सर्व भाषणांत चांगलें झालें असा माझा समज आहे. परंतु खामगांवासारख्या लहान व परिचित गांवीं संपादिलेल्या सभाशूरत्वाचा मुंबई-पुण्यासारख्या मोठ्या शहरी कितपत उपयोग होईल याची मला शंकाच होती. माझ्या वक्तृत्वशक्तीची कसोटी पाहण्याची वेळ लवकरच आली.

१९१७ सालीं फेब्रुवारी महिन्यांत ' मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या चिटणिसांकडून मला त्या संस्थेच्या त्या सालच्या वार्षिक समारंभाचे प्रसंगी अध्यक्ष होण्याबद्दल विनंतिपत्र आलें व मी त्यास आपली अनुमति कळविली. अशा प्रसंगीं अध्यक्षानें मराठी भाषेवर एक निबंध वाचण्याची वहिवाट असे. तिला अनुसरून मी ' मराठी वाङ्मय व स्वावलंबन ' या विषयावर निबंध लिहिण्याचें ठरविलें. या सुमारास मी ' रागिणी 'वर टीका लिहिण्यास सुरवात केली होती. त्या टीकेचा आरंभींचा भागच मी थोड्याशा फेरफारानें माझ्या निबंधाच्या आरंभीं ठेवण्याचा विचार केला.

त्या सुमारास १९१७ च्या मार्च महिन्याच्या आरंभीं इंदूर येथें ' साहित्यसंमेलना 'ची बैठक होणार होती. तिला हजर राहिल्यास आपल्या निबंधास साहित्याचा पुरवठा होईल अशा आशेनें मी इंदूरला गेलों. तेथें केळकर, मोरमकर, भानू, वगैरे जुन्या स्नेह्यांच्या गांठी पडल्या; व भारदे, पुरुषोत्तमराव तेलंग वगैरे कांही गृहस्थांशीं नवीन परिचय झाला. भारद्यांनी मला सभाषणाच्या ओघांत दिलेल्या कांही माहितीचा माझ्या निबंधास उपयोग झाला. हरिभाऊ आपट्यांनीं इंदूरचे दिवाण, कीर्तने वगैरे बड्या लोकांशीं माझा परिचय करून दिला. एक दिवस वासुदेवराव आपट्यांच्या मध्यस्थीनें खुद्द राजेसाहेबांशीं समेलनास आलेल्या कांही निवडक सभासदांचा परिचय झाला त्यांत मीहि होतों. एक दिवस संमेलनाच्या सकाळच्या व दुपारच्या बैठकीच्या दरम्यान परिषदेच्या मंडपांत पांगारकर वगैरे कांही प्रसिद्ध वक्त्यांची भाषणें झालीं, त्या प्रसंगी परिषदेचे अध्यक्ष गणेश जनार्दन आगाशे यांस येण्यास उशीर लागल्यामुळें मला अध्यक्षस्थान देण्यांत आलें; व त्या सभेचा समारोप मला करावा लागला. परिषदेंतील शेवटचा आभार-प्रदर्शक ठराव पाहुण्यांतर्फे सभेपुढें आणण्याचें काम मजकडेच होतें. या ठरावास उत्तरादाखल जी भाषणें झाली त्यांत सौ. कमलाबाईसाहेब यांचें भाषण फारच मधुर होतें. त्यांच्या लेखांनी माझ्या मनावर जो प्रतिकूल ग्रह झाला होता तो त्या भाषणानें पूर्णपणें पुसून टाकिला. असो. याप्रमाणें इंदूर येथील माझे दिवस फार आनंदांत गेले.

परत खामगांवीं येऊन निबंध लिहिण्यास सुरवात करितों न करतों तोंच माझे चुलत मेहुणे डॉ. नारायण वामन मोडक यांजकडून—" तुमचे चुलते अत्यवस्थ आहेत. ताबडतोब निघून यावें. "- अशा अर्थाची बुलढाण्याहून तार आली. मी तांतडीनें बुलढाण्यास जाण्याकरितां निघालों. चुलत्यांची भेट होते की काय याबद्दल मनांत शंका वाटत होती. आमची मोटार बुलढाण्यास जाऊन तेथील दवाखान्यासमोर कांहीं वेळ उभी राहिली असतां तेथें असें कळलें की माझ्या चुलत्यांची प्रकृति ठीक आहे, परंतु त्यांच्या ' आनंद ' नांवाच्या आवडत्या चिरंजीवानें मुंबईस आत्महत्या केल्याची बातमी आल्यावरून व ती त्यांच्या कानांवर घालण्याचें मोडकांस धैर्य न झाल्यामुळें त्यांनी मला बोलाविलें आहे. ही बातमी ऐकतांच माझे हात-पाय गळल्यासारखे झाले. चुलत्यांस ही अनिष्ट वार्ता

कळवावयाची कशी ही एक नवीनच विवंचना उत्पन्न झाली. मोडकांच्या घरीं जाऊन त्यांस भेटलों व आम्ही उभयतां बराच वेळ बोलत बसलों. शेवटीं असें ठरलें कीं दुसरें दिवशी सकाळीं बातमीच्या खरे-खोटे-पणाबद्दल मुंबईच्या एका स्नेह्यांकडून तारेनें निश्चयात्मक खुलासा मागवून तो येऊन बातमी खरी ठरल्यानंतर ती चुलत्यांच्या कानांवर घालावी. दुसऱ्या दिवशीं चुलते भेटले तेव्हां त्यांस मी अकस्मात् बुलढाण्यास आल्याबद्दल आश्चर्य वाटलें; व माझ्या चर्येवरील खिन्नतेची छाया पाहून मी त्यांजपासून कांहींतरी लपवीत आहे अशी पुसट पुसट शकाहि आली. इंदूरची हकीकत सांगण्याची आतुरता व प्रवासाचा शीण पुढें करून मी त्यांच्या आश्चर्याचें व शंकेचें निवारण करण्याचा प्रयत्न केला व तो त्या वेळेपुरता सिद्धीसहि गेला. मोडकांनीं सकाळीं आपल्या स्नेह्यास जी तार केली होती तिचें उत्तर दुपारीं येऊन तिनें पूर्वीच्या बातमीचें दृढीकरण केलें. बातमी फोडण्याची वेळ येऊन ठेपली. माझ्या चुलत्यास एक वर्षापूर्वी एक लहानसा अर्धांगवायूचा झटका आला होता. या बातमीनें दुसरा झटका येण्याचा संभव होता. म्हणून डॉ. मोडकांनीं औषधाची तयारी केली, व नंतर मी व त्यांनी मिळून ती दारुण वार्ता अर्धी-मुर्धी चुलत्यांच्या कानांवर घातली. अर्धी-मुर्धी म्हणण्याचें कारण असें कीं मृत्यूचें कारण आत्महत्या हें न देतां हृदयाची क्रिया बंद होणें हें दिलें होतें. पहिल्यां दिवशीं चुलत्यास फार वाईट वाटलें खरें, पण ते अत्यंत धीराचे असल्यामुळें त्यांनी तास दीडतास स्तब्ध बसण्यापलीकडे आपलें दुःख व्यक्त केलें नाहीं. दुसऱ्या दिवशी मृत्यूचें खरें कारण कळलें तेव्हां त्यांना पहिल्या दिवसापेक्षां फारच अधिक दुःख झालें. पण त्यांनी एकहि अश्रु गाळिला नाहीं. उलट मी आपलें दुःख व्यक्त करीत असतां ते माझें समाधान करूं लागले; दोन दिवसांच्या कोंडमाऱ्यामुळें माझें मन अत्यंत विकल होऊन गेलें होतें. सर्वांगाला सुया लागल्याप्रमाणें मला वेदना होत होत्या. डॉ. मोडकांचा अत्यंत विनोदी व आनंदी स्वभाव या प्रसंगीं आम्हां उभयतांच्या फार उपयोगी पडला.

बुलढाण्याहून परत आल्यावर मला पुन्हां निबंधलेखन हातीं घ्यावें लागलें. सुदैवानें या सुमारास दोन-तीन सुट्ट्या असल्यामुळें व मी आपलें सर्व बळ त्या एकाच कामाकडे लाविल्यामुळें निबंध लवकर लिहून तयार झाला. लवकरच त्याची नक्कलहि तयार झाली. निबंधवाचन एका तासापेक्षां

अधिक वेळ चालूं नये असा संग्रहालयाच्या चिटणिसांकडून मला इशारा मिळाला होता. पण निबंध स्वत:शींच पण मोठ्या स्वरांत वाचून पाहतां त्यास तब्बल दीडतास लागला. त्यांतून अर्ध्या तासाचा मजकूर गाळला पाहिजे हें ओघालाच आलें, तथापि मुंबईस गेल्याशिवाय कांहीच नक्की ठरवावयाचें नाहीं असा मी संकल्प केला.

माझ्या चुलत्यांनीं आपलें सारें दु:ख बाजूला सारून सभेस हजर राहण्याचें ठरविलें होतें. मी मुंबईस जाण्यापूर्वींच ते तेथें गेले होते. मी तेथें जाऊन पोंहचल्यावर पूर्वसंकेताप्रमाणें संग्रहालयाचे चिटणीस पुणतांबेकर मला भेटले. त्यांजबरोबर माझे 'वीरतनया'च्या वेळेपासून ओळखीचे असलेले गद्रे आले होते. त्यांनीं त्या वेळीं 'अक्षविपाक' नांवाचें नाटक लिहिलें असून नंतर 'प्याद्याचा फर्जी' ही कादंबरीहि लिहिली होती. गृहस्थ एकंदरींत बरेच बहुश्रुत असून १९१७ सालीं ते संस्थेच्या प्रमुख व्यवस्था-पकांपैकीं होते. त्यांच्या सांगण्यांत असें आलें कीं संग्रहालयाच्या व्यवस्थापक मंडळीनें अध्यक्षस्थानाकरितां एकंदरींत तीन नांवें सुचविलीं होतीं व त्यांत माझें नांव तिसरे होतें. पहिलें नांव धुळ्याच्या देवांचें असून दुसरें तशाच एका पुराणाभिमानी गृहस्थाचें होतें. त्यांनी दोघांनीं तो मान नाकारिल्यामुळें तो मजकडे आला होता. संस्थेचा कल जुन्या मताकडे झुकत असल्यामुळें तिच्या योजनेंत आश्चर्य वाटण्यासारखें कांहीं नव्हतें. असो. माझें प्रास्ताविक भाषण दहा मिनिटें व्हावें व निबंधवाचन एक तास व्हावें अशी त्या उभयतांनीं आग्रहाची सूचना केली. वाचन अधिक लांबल्यास श्रोते उठून जातील अशी त्यांना भीति वाटत होती. माझें प्रास्ताविक भाषण मुळींच तयार नसल्यामुळें तें वाटेल तितकें संक्षिप्त करण्यास माझी तयारी होती, परंतु निबंधांतून गाळागाळी करण्यास मी केवळ नाखुषीनें तयार झालों. निबंधाच्या आरंभींचा शास्त्रीय भाग सामान्य श्रोत्यांस कंटाळवाणा वाटण्याचा संभव असल्यामुळें तोच गाळण्याचें मी ठरविलें. पण इतक्यांत गद्र्यांस काय वाटलें असेल तें असो, त्यांनीं समग्र निबंध वाचण्यास आपली अनुकूलता दर्शविली. ती पाहून मला साहजिकच फार संतोष वाटला. आपलें अपत्य छिन्न-भिन्न झालेलें पाहण्यास चिलयाच्या पित्याची जी प्रतिकूलता होती ती प्रत्येक लेखकाच्या अंगीं दिसून येते. असो. यानंतर मी मुंबई ग्रंथसंग्रहालयाच्या इमारतींत जाऊन तेथील ग्रंथांची यादी व कांहीं ग्रंथ

चाळून निबंधांत कांही स्थळीं अपूर्णता राहिली होती ती नाहीशी केली. दुसरे दिवशी ' आर्यन एक्सेलसियर लीग 'च्या मार्फत एक रात्रीची शाळा उघडण्याचा समारंभ होणार होता. त्या प्रसंगीं भाषण करण्याची त्या संस्थेचे अध्वर्यु नाईक यांनी मला विनंति केल्यावरून मी ती गोष्ट कबूल केली व त्या तयारीला लागलों. सभेच्या वेळीं सभेच्या ठिकाणीं जाऊन पाहतां फारच थोडे श्रोते जमलेले दिसले. ही गोष्ट माझ्या पथ्यावरच पडली. सभेस सुरवात झाली तेव्हांहि श्रोत्यांची संख्या ४०–५० वर नव्हती. माझें भाषण साधारण बरें वठलें असावें असें तें चालू असतांना झालेल्या टाळ्यांवरून व हंशावरून वाटतें. या भाषणाबद्दल वृत्तपत्रांतूनहि अनुकूल अभिप्राय आले. हें भाषण तयार करण्यास मला कांही तास मिळाले होते. परंतु संग्रहालयापुढील प्रास्ताविक भाषण तयार करण्यास मला अनेक कारणांमुळें फारशी सवड झाली नाही. मी घाईघाईने त्याचें एक टांचण तयार केलें होतें. परंतु त्यांतील प्रत्येक मुद्दा पाहतेवेळीं डोळ्यास आरशी लावण्याचा व नंतर ती काढून घेण्याचा खटाटोप करावा लागल्यामुळें भाषण फारच मंदगतीने होऊन कंटाळवाणें झालें. त्या टांचणांतील मुद्दे ठाणें येथील ग्रंथसंग्रहालयाकरितां निबंध लिहितेवेळीं मात्र उपयोगी पडले.

' मुंबई ग्रंथसंग्रहालया 'ची वार्षिक सभा ' गांधर्व महाविद्यालया 'च्या एका प्रशस्त दिवाणखान्यांत भरण्याचें ठरलें असल्यामुळें तो दिवाणखाना मी सभेच्या आदल्या दिवशी समक्ष जाऊन पाहिला होता. सभेच्या वेळेपूर्वीं १५ मिनिटे मी, माझे चुलते वगैरे मंडळी सभेस जाण्याकरितां निघालों. आम्ही जाऊन पोहोंचलों तेव्हां दिवाणखाना बराच भरलेला दिसला; व कांही वेळानें तो संपूर्ण भरून जाऊन बऱ्याच श्रोत्यांस सज्जांतून उभे राहावें लागलें. मला प्रथम जरा धादरल्यासारखें वाटलें. पण सभेस सुरवात होतांच माझें प्रसंगावधान परत आलें. प्रथम ' गांधर्व महाविद्यालयां 'तील मुलांनीं ईशस्तुतिपर पदें म्हटली. नंतर डॉ. भालचंद्रांनीं अध्यक्षपदाच्या नेमणुकीची सूचना पुढें आणिली. त्यापूर्वीं अध्यक्ष एखादा वयस्क गृहस्थ व निबंधलेखक एखादा वाङ्मयभक्त होत असे. पण त्या वर्षीं प्रथमतःच ती दोन्हीं नाती एकाच गृहस्थांत एकवटली आहेत, असें त्यांच्या भाषणामध्यें आलें. त्यांना मजविषयींची माहिती आधींच पुरविण्यांत आली होती. परंतु ती देतांना त्यांनी ज्या चुका केल्या त्या पाहून मला किंचित् हंसूंहि आलें. मी विद्यार्थि-

दर्शेत दिवाडकरांच्या बंगल्यांत राहत असतां आम्ही डॉ. भालचंद्रांना सतावून सोडिल्यामुळें त्यांनीं आम्हांस नोटीस दिली होती. या गोष्टीची त्यांना आठवण झाल्यास त्यांचा मजविषयीचा ग्रह पार बदलून जाईल हाहि विचार त्यावेळीं मनांत आल्यावांचून राहिला नाहीं. असो. डॉक्टरसाहेबांच्या सूचनेस नेऱ्यांनीं दुजोरा दिल्यानंतर सूचना सर्वानुमतें मंजूर झाली. डॉ. साहेबांच्या विनंतीवरून मी अध्यक्षस्थानापन्न झालों. आरंभीच एका सभासदानें व्यवस्थापक मंडळीच्या अव्यवस्थेकडे सभेचें लक्ष वेधून बेरंग करण्याचा घाट घातला होता. परंतु इतक्यांत गजानन भास्कर वैद्य यांनी माझ्या कानांत सूचना केल्यावरून मी त्या आक्षेपकास आपला तक्रार-अर्ज योग्य अधिकाऱ्यांपुढें मांडण्याची शिफारस केली, व सभेचें काम चालू झालें. संस्थेचा अहवाल वाचून झाल्यावर तो मंजूर करण्यांत आला, व नंतर माझें भाषण सुरू झालें.

प्रास्ताविक भाषण वर लिहिल्याप्रमाणें बराच वेळ म्हणजे अर्धा तास लांबलें, तथापि शिष्टाचारासाठीं प्रसिद्ध असलेल्या मुंबईकरांनी तें शांतपणें ऐकून घेतलें. आधींच मी इतका वेळ घेतल्यावर निबंधवाचनास लागणारा दीड तास प्रेक्षक कसा सहन करतील याची मला क्षणभर विवंचना वाटली. पण विवंचनेला मुळींच अवसर नव्हता. कारण निबंधवाचनास लागलींच सुरवात झाली. सभास्थानाच्या अगदीं कोपऱ्यांतहि नीट ऐकूं जाईल इतक्या उंच व रुंद स्वरांत मी सुरवात केली. दोन पृष्ठें मजकूर वाचून झाल्यावर घशांत कांही अडकल्यासारखें वाटून आवाज अखेरपर्यंत झेंपणार नाहीं अशी भीति वाटूं लागली. परंतु खांकरून घसा साफ केल्यावर आवाज पूर्ववत् झाला व तो जवळ-जवळ अखेरपर्यंत तसाच टिकला. वाचनाच्या श्रमानें मुखास पुन्हां अर्धांगवायूचा झटका येण्याचीहि मला या प्रगंगीं धास्ती वाटत होती, पण तीहि निर्मूलच ठरली. दोन-चार पृष्ठें संपतात न संपतात तोंच टाळ्या व हंशा मिळण्यास सुरवात झाली. आरंभींच गणितविषयक ग्रंथांस वाङ्मयांतील इतर ग्रंथांच्या मानानें नीरस म्हटलें होतें. हा भाग मी वाचीत होतों तोंच पुण्याचे प्रि. परांजपे येऊन दाखल झाले. तें पाहून मी त्यांस उद्देशून " माफ करा " असें म्हटलें. त्याबरोबर सभेंत एकच हंशा उडाला. या वेळेपासून प्रेक्षकांची मजसंबंधानें अधिकाधिक सहानुभूति दिसून येऊं लागली. जो भाग नीरस म्हणून गाळण्यास तयार झालों होतों त्याचाहि

श्रोतृवृन्दानें टाळ्यांच्या द्वारें चांगला सत्कार केला. वाचतांना उभें राहावें लागल्यामुळें व टेबलावरील दिव्याचा उजेड हस्तलिखित प्रतीवर नीट पडत नसल्यामुळें मला वाचतांना वांकावें लागत होतें. तें पाहून " बसून वाचा " अशी श्रोत्यांकडून सूचना होऊं लागली. पण मी ती सूचना अमलांत आणिली नाहीं. लवकरच व्यवस्थापकांकडून दिव्याची सोय करण्यांत आली. निबंधाच्या अखेरीस माझा घसा घोगरा झाला, तें पाहून व्यवस्थापकांनी पाण्यानें भरलेला पेला आणून ठेवला व मला त्याचा उपयोग करण्याची सूचना केली. परंतु या पुराणाभिमानी संस्थेस तक्रारीला मुळींच जागा ठेवावयाची नाही असा मी प्रथमपासूनच निर्धार केलेला असल्यामुळें मी तीहि सूचना अमान्य केली. लवकरच निबंधाचें वाचन पूर्ण झालें. श्रोतृ-वृंदांच्या टाळ्यांच्या कडाकडावरून व मागाहून झालेल्या स्तुतिपर भाषणांवरून त्यांना निबंध बराच आवडला असावा असें अनुमान सहज करितां येण्या-सारखें होतें. सभा संपल्याबरोबर 'विविधज्ञानविस्तार', 'मनोरंजन', 'उद्यान', व 'भारतसेवक' या मासिकांच्या संपादकांनी निबंधाबद्दल मागणी केली त्यावरूनहि तीच गोष्ट स्पष्ट झाली. दुसरे दिवशी ' इंदुप्रकाशां 'त माझ्या भाषणावर व निबंधावर एक अग्रलेखच प्रसिद्ध झाला. ' संदेशांत 'हि स्तुतिपर लेख आला. त्या दैनिकाचे संपादक अच्युतराव कोल्हटकर यांचें त्यांच्या इतर भावंडांशीं विशेष सख्य नसे, तसें माझ्याशीहि नसे. मजवर टीकास्त्राचा प्रयोग करण्याची एकहि संधि ते बहुधा वायां जाऊं देत नसत. यामुळें त्यांच्या पत्रांत आलेला अनुकूल अभिप्राय उत्तम शिफारसपत्राप्रमाणेंच मला वाटला यांत नवल नाही. ' मराठी वाङ्मय व स्वावलंबन ' हा निबंध 'विविध-ज्ञानविस्तारां 'त १९१७ सालच्या एप्रिल-मेच्या जोड अंकांत प्रसिद्ध झाला.

सभेच्या दुसऱ्या दिवशी संग्रहालयाच्या व्यवस्थापकांतर्फे मला एक चहापार्टी देण्यांत आली. त्या प्रसंगीं गजानन भास्कर वैद्य, पांडुरंग वामन काणे इत्यादि सद्गृहस्थांचा विशेष परिचय झाला.

## २०

१९१७ सालांत मला ' स्वराज्य-संघा 'च्या खामगांव येथील शाखेचा पहिला अध्यक्ष निवडण्यांत आलें. त्या व पुढील सालीं त्या संस्थेच्या विद्य-

मानें ज्या जाहीर सभा झाल्या त्यांपैकी कांही सभांतून अध्यक्ष या नात्यानें मला भाषणें करावीं लागलीं. या सुमारास खामगांव येथील ' इंग्रजी-मराठी शाळे 'च्या पहिल्या संमेलनाच्या प्रसंगी हायस्कुलांत झालेल्या महायुद्धाच्या वार्षिक दिनोत्सवाच्या प्रसंगी विद्यार्थ्यांपुढें माझी दोन भाषणें झालीं. तीं दोन्ही चांगली वठलीं. खामगांव येथील वक्त्यांत माझें नांव प्रमुखत्वानें येऊं लागलें, परंतु स्वतःच्या गांवकऱ्यांसमोरील व नवख्या शहरवासीयां-समोरील वक्तृत्वांत अंतर असतें. मुंबई व पुणें येथें मला भाषण कराव-याचा प्रसंग आल्यास तें कितपत वठेल याची मला फार शंका आहे. उत्तम वक्तृत्व जन्मसिद्धच असतें. परिश्रमानें वावदुकत्व साध्य होईल; पण वक्तृत्व होणार नाहीं.

१९१८ सालच्या ऑगस्ट महिन्यांत मजकडे ' ठाणें मराठी ग्रंथ-संग्रहालया 'च्या वार्षिक सभेचा अध्यक्ष होण्याविषयी विनंति करण्यांत आली; व त्या संस्थेबद्दल मला पूर्वीपासून अत्यंत आदर वाटत असल्यामुळें त्यावेळी अतिलेखनामुळें डोक्यास थकवा आलेला असतांहि मी ती विनंति मान्य केली. सभेपुढें वाचावयाच्या निबंधाचा विषय 'मराठी ग्रंथसंग्रह' हा घेतल्यामुळें मुंबई येथील ग्रंथसंग्रहालयाच्या सभेपुढें केलेल्या प्रास्ताविक भाषणाचा तो लिहि-तांना बराच उपयोग झाला. मुंबईच्या सभेचा अनुभव असल्यामुळें मी हा निबंध एका तासांत वाचून संपावा अशा बेतानें लिहिला. सभा तारीख ८-९-१८ रोजीं व्हावयाची होती. त्याच्या आधल्या दिवशी मी मुंबईस जाऊन पोहोंचलों; व तेथून सभेच्या दिवशी सकाळीं ठाण्यास जाऊन तेथें माझे स्नेही व ' महाराष्ट्र कवि ' मासिकाचे संपादक विनायक लक्ष्मण भावे यांच्या घरीं उतरलों. सभेच्या सुमारें १॥–२ तासापूर्वी संग्रहालयाच्या भाड्याच्या इमारतीत जाऊन तेथील पुस्तकांतून माझ्या निबंधास उपयुक्त अशी कांहीं माहिती पाहिजे होती ती गोळा केली. नंतर संग्रहालयांतील व्यवस्था पाहून सभा नाटकगृहांत व्हावयाची होती तिकडे जावयास निघालों; तेव्हां संग्रहा-लयाच्या व्यवस्थापकांनीं पानसुपारी, पुष्पगुच्छ व हार देऊन गौरव केला. सभेस सुरवात होण्याच्या ५–१० मिनिटें पूर्वी नाटकगृहांत जाऊन पोहोंचलों. सभास्थान विशेष मोठें नसून श्रोत्यांनी बरेंच भरून गेलेलें दिसलें. अध्यक्षाबद्दलची सूचना होऊन ती रीतसर मंजूर झाल्यावर मी अध्यक्ष या नात्यानें प्रास्ताविक भाषणास सुरवात केली. या भाषणाची मी

साधारण बरी तयारी केली असल्यामुळें तें बरें वठलें. विशिष्ट स्थानांची विशेष गोष्टींबद्दल प्रसिद्धि असते या विधानानें सुरवात करून मी त्याच्या पुष्टयर्थ पुणें, नागपूर, वाई वगैरे गांवांची उदाहरणें दिली. ठाणें हें गांव ग्रंथांच्या व वेड्यांच्या संग्रहालयासाठीं प्रसिद्ध आहे असें म्हणतांच सभेंत बराच हंशा झाला. याप्रमाणें श्रोतृवृंदांत उत्पन्न झालेली सहानुभूति अखेरपर्यंत कायम राहिली. प्रास्ताविक भाषण संपल्यावर अहवालाचें वाचन व मंजुरी वगैरे ठराविक कामें झाली; व नंतर मी निबंध वाचण्याकरितां उठलों. वाचण्यास सुरवात करण्यापूर्वीं मी पुन्हां थोडेंसें प्रास्ताविक भाषण केलें. "थोर लोकांच्या भेटीस जातांना भेटीदाखल एखादी वस्तु नेण्याची वहिवाट असते, तिला अनुसरून मी ही निबंधरूपी भेट आणिली आहे. एकदां एक दरिद्री कवि भोज राजाच्या भेटीस उंसाचीं कांडीं घेऊन जात असतां त्याच्याबद्दल एका चटोरानें जळकीं लांकडें ठेवून दिलीं. तीं राजापुढें ठेवतांच राजा क्रुद्ध झाला असें पाहून कालिदासानें त्या भेटीची संपादणी केली. माझा निबंध या संस्थेस शोभण्यासारखा सरस असावा अशी जरी माझी इच्छा असली तरी तो जळक्या लांकडांप्रमाणें निःसत्त्व ठरण्याचाच संभव आहे. सबब आपण सर्वांनीं कालिदासाचें अनुकरण करून निबंधांतील कमीपणा भरून काढावा."— हा त्या भाषणाचा गोषवारा होता. या भाषणानंतर निबंधवाचनास सुरवात झाली. हा निबंध मुंबईच्या सभेपुढें वाचिलेल्या निबंधापेक्षां सरस असल्यामुळें त्याचा श्रोत्यांकडून विशेष चांगल्या रीतीनें सत्कार झाला. मधून-मधून जो हंशा होई तो इतक्या जोराचा असे व इतका वेळ टिके कीं पुढील मजकूर वाचण्यापूर्वीं मला बराच वेळ थांबावें लागे. निबंधवाचनास एक तास दहा मिनिटें लागलीं. वाचन संपल्याबरोबर श्रोत्यांकडून बराच मोठा टाळ्यांचा कडकडाट झाला. श्रोत्यांस निबंध किती पसंत पडला असावा हें त्यानंतर 'धर्मजागृती'चे संपादक रा. भागवत यांचें जें स्तुतिपर भाषण झालें त्यावरून व त्यास मिळालेल्या टाळ्यांवरून स्पष्ट झालें. त्यांनीं माझ्या प्रास्ताविक भाषणाचा उल्लेख करून माझा निबंध जळक्या लांकडांप्रमाणें नसून रसभरीत उंसाप्रमाणें आहे असें सांगितलें; व मी दिलेली उपमा विनयमूलक आहे असें सांगून माझ्या विनयशीलतेच्या समर्थनार्थ 'सुदाम्याच्या पोह्यां'चा दाखला दिला. त्यानंतर आणखी एक-दोन वक्त्यांची भाषणें होऊन सभेचें काम संपलें. रात्रीं व्यवस्थापकांनीं मेजवानीचा बेत

केला होता तोहि चांगल्या प्रकारें पार पडला. या माझ्या निबंधावर 'संदेशां'त एक अत्यंत स्तुतिपर अग्रलेख आला असून सभेच्या वर्णनांतहि मजबद्दल प्रशंसापर उद्गार काढिले होते.

यानंतर खामगांव येथें जाहीर सभेंत भाषण करण्याचा एकच प्रसंग आला. १९१८ च्या सप्टेंबर महिन्याच्या अखेरीस सरोजिनी नायडू या प्रसिद्ध कवयित्री व विदुषी खामगांवकरांच्या आग्रहपूर्वक निमंत्रणावरून २—३ तासांकरितां खामगांवास आल्या व माझ्या घरीं उतरल्या. त्यांचें भाषण सार्वजनिक गणपतीपुढें व्हावयाचें असून सभास्थान माझ्या घरापासून जवळच होतें. बाईनी उपहार केल्यानंतर त्यांना मी टांग्यांतून सभास्थानीं नेऊन पोहोंचविलें. टांगा चालू असतां आमचें जें संभाषण झालें त्यांत बाईनीं माझीं कांहीं नाटकें पाहिलीं होतीं असें त्यांच्या सांगण्यांत आलें. तें ऐकून मला बरेंच समाधान वाटलें. सभास्थानीं पोहोंचतांच सभेस सुरवात झाली. प्रथम माझी अध्यक्षस्थानीं योजना झाली. मागें टिळकांच्या आगमनप्रसंगीं मी जें प्रास्ताविक भाषण केलें होतें तें बरेंच लांबल्यामुळें श्रोतृवृंद फारच अधीर झाला होता. तो अनुभव माझ्या आठवणींत ताजा असल्यामुळें मी या खेपेस फारच लहान भाषण केलें व तें परिणामकारकहि झालें. " सरोजिनी नायडू या प्रसिद्ध स्त्रीची कीर्ति श्रोतृवृंदास माहीत आहेच व पाहुण्याबाईहि त्यास प्रत्यक्ष दिसत आहेत. याप्रमाणें ज्ञानरूपी विद्युल्लतेच्या ऋण व धन तारा तयारच आहेत. माझें काम फक्त त्यांचें एकीकरण करण्याचें आहे, अर्थातच सरोजिनीबाई व पाहुण्याबाई या एकच व्यक्ति होत एवढें सांगितलें म्हणजे माझें काम संपलें. "—असा माझ्या भाषणाचा आशय होता. सरोजिनी-बाईचें भाषण नेहमींप्रमाणें अत्यंत वक्तृत्वपूर्ण झालें. तें सुदैवानें बराच वेळ लांबल्यामुळें त्यानंतर तुलनेनें अगदींच निःसत्त्व वाटणारें भाषण करण्याची मजवरील आपत्ति आपोआप टळली व बाईना अल्पाहार आटपून लवकर स्टेशनावर गेलें पाहिजे ही सबब पुढें करून मी आपल्या समारोपास फांटा दिला.

यानंतर मी जळगांवला आल्यावर नवीन कोर्ट उघडण्याचे प्रसंगीं, बल्गेरिया शरण आल्याबद्दल आनंदप्रदर्शनार्थ भरलेल्या सभेंत व महायुद्धाच्या समाप्तीनंतर झालेल्या समारंभाच्या प्रसंगीं मला भाषणें करावीं लागलीं. पण त्यासंबंधानें विशेष लिहिण्यासारखें कांहीं नाहीं.

माझ्या भाषणांच्या वर्णनांस त्यांच्या महत्त्वाच्या मानानें मी विनाकारण अधिक जागा दिली आहे यांत संशय नाहीं. पण माझ्या अंगी जन्मत: समाधीटपणाचा किती अभाव आहे हें मला पूर्णपणें माहीत असल्यामुळें त्या भाषणांचें मला महत्त्व वाटणे स्वाभाविक आहे.

## २१

'तोतयाच्या बंडा'वरील टीकेसंबंधानें लिहितांना वर 'तुलसी-रामायणा'वरील टीकेचा ओझरता उल्लेख केला आहे; त्या टीकेंत मी त्या ग्रंथांतील उत्कृष्ट कल्पनांचा एकत्र संग्रह केला आहे, यापलीकडे त्या टीकेंत विशेष असें कांही नाही. टीका करण्यापूर्वी तद्विषयीभूत पुस्तक मी बहुधा अत्यंत सावकाश व लक्षपूर्वक वाचीत असतों. पण तो संग्रह करण्याकरितां मी तो ग्रंथ घाई-घाईनें दीड दिवसांतच वाचून टाकिला. तथापि त्या ग्रंथावरील इतर टीकांतील संग्रहाइतकाच माझाहि संग्रह सरस आहे अशी माझी खात्री आहे. तो तयार करितांना पुस्तक फारच घाईनें वाचल्यामुळें डोक्यास त्रास मात्र अतोनात झाला.

१९१४ सालीं वेंकटेश बापूजी केतकर यांचें 'ग्रहगणित' हें मराठी पुस्तक प्रसिद्ध होऊन 'विविधज्ञानविस्तारा'कडे परीक्षणाकरितां आलें. केतकरांच्या 'ज्योतिर्गणिता'चें अध्ययन केल्यापासून मला त्यांच्याबद्दल फारच आदर उत्पन्न झाला होता. १९०३ सालीं किंवा त्या सुमारास मुंबईस "पंचांगशोधन कमिटी'च्या बैठकी होत असतांना मी त्यांस प्रथम भेटलों. आरंभीं मी त्यांच्या ग्रंथांतील जे भाग मला विशेष चातुर्याचे वाटले त्यांचा त्यांजपाशीं निर्देश केला. त्याबरोबर त्यांना मजबद्दल एकदम इतकी स्नेहबुद्धि वाटूं लागली कीं त्या संधीस कोल्हापुरचे प्रो. आपटे आम्ही बसलों होतों तेथें आले असतां त्यांनीं माझा त्यांच्याशी अत्यंत स्तुतिपर शब्दांनी परिचय करून दिला. त्यानंतर मी त्यांना त्यांच्या ग्रंथांतील एक शंकास्थान दाखवून त्याचा उलगडा करण्याची विनंति केली. हें शंकास्थल म्हणजे 'त्रिप्रश्नाध्यायां'त "पंचागुलागणक यत्र पलप्रभा स्यात्" हा 'सिद्धांतशिरोमणी'तील प्रश्न केतकरांनीं ज्या रीतीनें सोडविला आहे ती रीत होय. तें स्थल केतकरांसहि बिकट वाटलें. त्यावर कांही वेळ घालविल्यावर त्यांनी कपाळ

दुखण्याच्या सबबीवर मला पुन्हां दुसरे दिवशीं येण्यास सांगितलें. त्याप्रमाणें मी दुसऱ्या दिवशीं गेलों असतांना त्यांनीं आपली आकृतींची वही काढून तिच्या साह्यानें माझ्या शंकेचें समाधान करितां येतें की काय याचा बराच वेळ विचार केला, पण त्यांना समाधान करण्याचा मार्ग सांपडला नाहीं. उलट त्या रीतीत चूक असली पाहिजे असें त्या वेळेपुरतें तरी त्यांना कबूल करावें लागलें. तथापि अखेरीस—" तुम्ही वऱ्हाडांत परत गेल्यावर मला धारवाडच्या पत्त्यावर पत्र पाठवून पुन्हां आपली शंका कळवा. "—असें त्यांनीं सांगितलें. त्याप्रमाणें मी त्यांना पत्र पाठविलें; परंतु त्यांचें त्यास कांहीच उत्तर आलें नाही. यानंतर बरीच वर्षें त्यांची व माझी ओळख बुजल्यासारखी झाली. त्यांच्या ' ग्रहगणिता 'वर टीका लिहिण्याचें काम मी हातीं घेतलें तेव्हां त्यांतील व त्यांच्या ' केतकी ' ग्रंथांतील शंकास्थलांचा खुलासा करण्याबद्दल मला त्यांस अनेक विनंतिपत्रें लिहावी लागलीं. माझ्या बहुतेक शंकांचें त्यांनीं समाधान केलें, व बाकीच्या शंकांचें समाधान टिपणांची वगैरे सामुग्री जवळ नसल्यामुळें तूर्त करितां येत नाही असें त्यांजकडून लिहून आलें. त्यांच्या या वेळच्या पत्रांत त्यांनीं मजबद्दल अत्यंत आदर दर्शविला होता. " असल्या शंका विचारणारा मला साऱ्या हिंदुस्थानांत कोणी भेटला नाही "— असेंहि त्यांनीं एका पत्रांत लिहिलें होतें; ज्योतिर्गणिताचा विषय विशेष गूढ नसतांहि त्याचें हिंदुस्थानांत इतकें अल्प अध्ययन होतें की त्या विधानाचें मला विशेष आश्चर्य वाटलें नाही. यानंतर मी केतकरांकडे आपला ज्योतिषविषयक निबंध भेटीदाखल पाठविला. त्याजवर त्यांचा बराच अनुकूल अभिप्राय येऊन त्यासोबत त्यांनी आपल्या ' ग्रहगणिता 'ची एक प्रत " आदरपूर्वक भेट " म्हणून पाठवून दिली. मी त्यांस पूर्वी मुंबईस भेटलों होतों याची ओळख मात्र मी त्यास दिली नाहीं; व ती गोष्ट त्यांना हल्ली माहीत आहे कीं काय याची शंकाच आहे. असो.

माझी ' ग्रहगणिता 'वरील टीका ' विविधज्ञानविस्तारा 'च्या १९१५ सालच्या मार्च महिन्याच्या अंकांत प्रसिद्ध झाली व तिजवर केतकरांचा बराच अनुकूल अभिप्राय त्यांजकडून मजकडे आभारपूर्वक कळविण्यांत आला. या टीकेच्या आरंभीं मी समाजसुधारणेवर बऱ्याच तीव्र स्वरूपाचे विचार प्रदर्शित केले होते. ' शारदाश्रमवासी ' हें टोपण नांव धारण करणारे माझे

स्नेही पुरुषोत्तम गोपाळ काणेकर यांनीं 'पंचांगशोधन कमिटी'च्या बैठकी चालू असतांना पंचांगसुधारणेप्रमाणें समाजसुधारणेचीहि आवश्यकता नाहीं का, असा त्या कमिटींत प्रमुखत्वानें भाग घेणारे बाळ गंगाधर टिळक यांस एका लेखांत सवाल केला होता. त्या लेखावरून मला ते विचार सुचले असावे असें वाटतें. यानंतर केतकरांचेंच 'नक्षत्रविज्ञान' हेंहि पुस्तक प्रसिद्ध होऊन मोरमकरांकडून मजकडे परीक्षणाकरितां आलें. त्यावर माझी टीका 'विविधज्ञानविस्तारा'च्या १९१६ च्या डिसेंबरच्या अंकांत प्रसिद्ध झाली. ती केतकरांस फारच आवडली असें त्यांच्या तत्संबंधानें आलेल्या पत्रावरून दिसलें. "ही टीका माझ्या पुस्तकांत प्रस्तावनेदाखल घातल्यास त्यांतील विषय अधिक स्पष्ट होईल."— अशा अर्थाचें एक वाक्य त्या पत्रांत होतें.

# २२

सदाशिव नारायण ठोसर, मराठे वगैरे गृहस्थांनीं मिळून 'गुप्तमंजूष' नाटकावर 'नाटयकलारुक्कुठार' नांवाची एक विस्तृत टीका लिहिल्याचा उल्लेख यापूर्वी आलाच आहे. त्यानंतर त्यांचे-माझे संबंध स्नेहभावाचे असावे अशी माझी अंत:करणपूर्वक इच्छा असून मी आपलें वर्तनहि तिला अनुसरूनच ठेवण्याचा प्रयत्न करीत असे. ठोसरांनी एकदां मला पुणें येथें फराळास बोलाविलें असतां मी संतोषानें गेलों व त्यांच्याशी व इतर निमंत्रितांशीं स्नेह्याप्रमाणें मोकळ्या मनानें वागलों. त्यापुढेंहि त्यांच्याशीं नेहमीं सरळ वर्तनच ठेवीत गेलों. असें असतां त्यांनीं मधून-मधून माझी वृत्तपत्रांतून विनाकारण नालस्ती करण्याचा क्रम चालू ठेविला. 'इंदुप्रकाशां'त त्यांच्या 'लीलावती' नाटकाच्या स्तुतीनें भरलेले व माझ्या कवितांच्या निंदेनें भरलेले इंग्रजी लेख येऊं लागले. यांपैकी कांहीं लेख तरी खुद्द ठोसरांच्या लेखणींतून उतरलेले होते असें मला काणेकर यांजकडून कळलें. मला तें खरें वाटण्यास एक कारणहि झालें. तें असें :— 'नाट्यकलारुक्कुठारा'-चा 'गुप्तमंजूष' नाटकावरील मुख्य वळसा बाहेर पडल्यानंतर इतर नाटककारांच्या कृतींवरहि त्यांचा मधून-मधून हप्त्या-हप्त्यांनीं प्रयोग होऊं लागला. अशा एका हप्त्यांत 'लीलावती' नाटकांतील एक अवतरण दाखल्यादाखल दिलें होतें. ज्या लेखमालेचा एक प्रमुख लेखक 'लीलावती'चा

कर्ता त्याच लेखमालेंत त्या नाटकांतील अवतरण अशा रीतीनें यावें हें मला सदभिरुचीस अत्यंत विरुद्ध वाटलें, व त्या लेखकानें आपल्याच नाटकासंबंधानें स्तुतिपर लेख लिहून तो प्रसिद्धीकरितां वृत्तपत्राकडे पाठवावा यांत कांही नवल वाटलें नाही. यांपैकीं एका लेखास काणेकरांनीं फारच समर्पक व बिनतोड उत्तर देऊन त्यांत त्यांनी ' लीलावती 'च्या मंगलाचरणाचे वाभाडे काढिले. आंतून अशी कृति चालली असतां ठोसर वरकरणीं मला इतका स्नेह दाखवीत कीं मला आंतील प्रकार माहीत नसता तर मी त्यानें गारीगार झालों असतों. एकदां मी कुर्ल्यास ठोसरांच्या घरीं त्यांच्या अत्यंत आग्रहाच्या निमंत्रणावरून स्वत:च्या इच्छेविरुद्ध जेवणास गेलों असतां त्यांनी जेवणाचे वेळीं स्वत:च्या मातुश्रींस माझा परिचय करून देतांना—" आई ! हेच ते कोल्हटकर बरें ! "—असे शब्द काढिले. त्या माऊलीस त्यांचा अर्थ न कळल्यामुळें ती ठोसरांना त्याबद्दल खोद-खोदून विचारूं लागली तेव्हां त्यांची फारच धांदल उडाली. " ज्यांच्या नाटकाचा मी खरपूस समाचार घेतला होता " हे अध्याहृत शब्द तिला बिचारीला कळले नाहीत तरी मला पूर्णपणें कळले व त्यांनी माझें मन:स्वास्थ्य नाहीसें केलें. या वेळेपासून मी ठोसरांचें निमंत्रण कधीं स्वीकारावयाचें नाही असा निश्चय केला व तो आजपावेतों अमलांत आणिला आहे. असो.

ठोसरांचें ' प्रेमाभास ' नाटक १९१६ सालीं त्यांजकडून भेट म्हणून मजकडे आलें त्यावेळची मन:स्थिति कळावी म्हणून हा लांबलचक प्रस्ताव करावा लागला. त्यांच्या लेखनकौशल्याबद्दल माझें विशेष अनुकूल मत कधीच नव्हतें. ' लीलावती ' नाटकास ' Cid ' या प्रसिद्ध फ्रेंच नाटकाचा आधार असतां व त्यास प्रसिद्ध होण्यापूर्वीं गर्भावस्थेंत विकास पावण्यास ८—१० वर्षांचा अवधि मिळाला असतां तें बरेंच नि:सत्त्व झालें आहे. ठोसरांच्या कांही स्फुट कविता माझ्या वाचनांत आल्या होत्या ( त्यांचा विषय बहुधा राजभक्ति किंवा त्यासारखा एखादा असे ); त्या अशुद्ध, बेचव व पाल्हाळिक असत. परंतु ' प्रेमाभासां'तील काव्यानें त्यांच्या इतर सर्व काव्यांवर कडी केली होती. तथापि नाटक नुसतें वाङ्मयदृष्ट्या टाकाऊ असतें तर मी त्याजवर टीकास्त्र उपसलें नसतें. त्यांत एके ठिकाणीं माझ्या ' प्रेमशोधन ' नाटकाचा उपहासपूर्वक उल्लेख केला होता. तोहि मला परीक्षणार्थ यातायात करावयाला लावण्यास समर्थ नव्हता. परंतु नाटकास

खुद्द ठोसरांनीं एक लांबलचक प्रस्तावना जोडून सुधारणेस प्रतिकूल ग्रह उत्पन्न करण्याचा जो प्रयत्न केला होता व तो करितांना एखाद्या स्मृतिकाराचा जो आव घातला होता त्यानें माझी समता नाहीशी झाली. तरी प्रथम कांहीं दिवस मी टीका करण्याची इच्छा मनांतल्या मनांत दाबून ठेविली. पण त्यानें माझें डोकें तापून जाऊन मला सारखीं जाग्रणें घडूं लागलीं; अखेरीस टीका लिहिण्याचा संकल्प करून तो कांहीं दिवसांनी अमलांतहि आणिला. वाचकांस टीकाकाराचें नांव कळल्यास त्याचा व नाटककाराचा पूर्वसंबंध आठवून टीका मत्सरबुद्धीनें केली आहे असा त्यांचा विनाकारण ग्रह व्हावयाचा; तो होऊ नये म्हणून मी लेखकाचें ' प्रागतिक ' हें टोंपण नाव दिलें होतें. परंतु लिहिण्याच्या धाटणीवरून लेखक मीच असलों पाहिजे असा बऱ्याच जणांनीं तर्क केला. ही टीका १९१७ सालीं ' मनोरंजना 'च्या जानेवारीपासून मे पर्यंतच्या पांच अंकांत छापून आली. ती बऱ्याच जणांना आवडली असें काशीनाथ रघुनाथ मित्रांकडे निघालेल्या उद्गारांवरून व आलेल्या पत्रांवरून दिसून आले.

' प्रेमाभास ' नाटकांतील अनेक चोऱ्या मी या टीकेंत दाखविल्या होत्या. पण नाटकाचें मुख्य संविधानक ' Sorrows of Satan ' या कादंबरीवरून चोरल्याची गोष्ट टीका लिहितांना माझ्या ध्यानात न आल्यामुळें तिचा अंतर्भाव मी त्या चोऱ्यांत केला नाहीं. वाग्भट देशपांडे यांनीं ती गोष्ट मागाहून माझ्या नजरेस आणिली तेव्हां ती मला ताबडतोब पटली. ही टीका पुन्हां छापण्याचा योग आल्यास मी त्या चोरीला जरूर प्रमुख स्थान देईन.

यापूर्वींच वामन मल्हार जोशी यांच्या इच्छेवरून त्यांची ' रागिणी ' कादंबरी मजकडे मोरमकरांकडून परीक्षणार्थ आली होती. पण ती बरीच मोठी असल्यामुळें तिच्या टीकेचें काम बरेंच लांबणीवर पडलें. अखेरीस ती टीका १९१८ सालीं ' विविधज्ञानविस्तारां 'त छापून प्रसिद्ध झाली. तात्त्विक विषयांवरील चर्चाचा स्वभाव रंगविण्याचे कामी कसा उपयोग होतो, वर्ण्य वस्तूंच्या अस्तित्वाबद्दल वाचकांच्या ठायी खात्री उत्पन्न करण्यासाठीं कादंबरीकार कोण-कोणत्या योजनांचा अवलंबन करितात वगैरे संबंधाचे त्या टीकेंतील कांही भाग अगदीं नवीन दिसून येतील.

# २३

'सहचारिणी' नाटकाचें संविधानक माझ्या डोक्यांत १९१६ सालच्या पावसाळ्यापासूनच घोळत होतें. पण तें लिहिण्याचा योग १९१८ च्या मे महिन्यापर्यंत घडून आला नाही. त्यांतील रावजी व नाना या दुकलीची कल्पना प्रथम मला पॉलडी कॉक या फ्रेंच कादंबरीकाराच्या एका कथेवरून सुचली व तिजवर मागाहून इतर भागांचा डोलारा उभारण्यांत आला. परंतु ती मूळ कल्पना 'सहचारिणी'त इतकी बदलली आहे व सहचारिणीच्या एकंदर संविधानकांत ती इतक्या पूर्णपणें लोपून जाते की नाटकाचा उगम त्या कल्पनेंत आहे ही गोष्ट सांगितल्याशिवाय कोणास खरीहि वाटणार नाही. प्रत्येक स्वतंत्र कृतीतील बहुतेक कल्पना पूर्वपरिचित कल्पनांवरून सुचलेल्या असतात. परंतु त्यांच्या बेमालूम मिश्रणामुळें त्या कृतीस एक नवेंच स्वरूप प्राप्त होऊन तिच्यांत मूळ कल्पनांचा मागमूसहि लागेनासा होतो. हाच प्रकार 'सहचारिणी'च्या मूलभूत कल्पनेसंबंधानें झाला. त्या नाटकांतील दोन बायकांच्या दादल्याची कल्पना मला कोणावरून सुचली हें खामगांवच्या कोणाहि इसमास न सांगतांच कळण्यासारखें आहे. ती कल्पना मला माझ्या कुटुंबाच्या वडील बंधूवरून सुचली. पण मूळ कल्पना नाटकांत बरीच विकृत झालेली आहे. माझ्या मेव्हण्याच्या दोन बायकांत बराच सलोखा नांदत असे. पण 'सहचारिणी'त त्याच्या अगदी उलट प्रकार आहे. संततीच्या बाहुल्यासंबंधानें मात्र माझे मेव्हणे व रंगराव यांजमध्यें बरेंच साम्य आहे. असो.

'सहचारिणी' नाटक १९१७ सालचे उन्हाळ्याचे सुट्टींत पुण्यास एखाद्या स्नेह्याच्या घरीं लिहिण्याचा विचार होता. पण ती सोय पुण्यास न जमल्यामुळें मी नाटक लिहिण्याकरितां मुंबईस माझे चुलतबंधु हरि गणेश कोल्हटकर यांच्या घरीं गेलों; व तेथें जूनच्या ७ व्या तारखेस किंवा त्या सुमारास नाटक लिहिण्यास आरंभ केला. ज्या दिवाणखान्यांत मी लिहावयास बसत असें त्यांत माझ्याभोंवतीं घरांतील मुलां-बाळांची सारखी वर्दळ असे. अशा परिस्थितींत नाटक लिहिण्याचा हा पहिलाच प्रसंग होता. परंतु अशा अडचणींतूनहि जूनच्या १३ व्या तारखेपर्यंत नाटकाचे चार अंक लिहून पुरे झाले. तीन अंक होतांच मी तें नाटक गुर्जरांना दाखविलें. त्यांचें मत नाटक

एकंदर मराठी नाटकांत अत्यंत विनोदप्रचुर झालें आहे असें होऊन त्याप्रमाणें त्यांनीं ' गंधर्व नाटक मंडळी 'कडे कळविलेंहि. ' गंधर्व मंडळी 'स कळविण्याचें कारण असें कीं त्या मंडळीस त्यावेळीं एका विनोदी नाटकाची जरूर असून माझें नाटक लवकर पुरें करण्यासंबंधानें माझ्यामागें तिचा लकडा चालू होता.

नाटकांतील पदांकरितां चाली पाहिजे होत्या. हिराबाईपाशीं चालींचा चांगलाच भरणा असून त्यांपैकीं कांहीं मी ' मतिविकार ' व ' प्रेमशोधन ' नाटकांतील पदें रचितांना उपयोगांत आणिल्या होत्या. ' सहचारिणी ' नाटकांतील पदांकरितां कांही चाली मी ह्या खेपेस त्यांजपासून उतरून घेतल्या व त्या एक दिवस त्यांजकडून एक-दोनदां म्हणवूनहि घेतल्या; परंतु त्यांतील एक-दोन चालींशिवाय बाकीच्या चाली मला नीट बसल्या नाहींत. नाटक पूर्ण झाल्यावर चाली सावकाशीनें घेतां येतील अशा भरंवशावर मी होतों. इतक्यांत एक क्षुल्लक गोष्ट घडून येऊन तिनें माझा बेत फिसकटवून टाकिला. मी गुर्जरांस नाटकाचा कांही भाग वाचावयास दिला हें त्यांजकडून हिराबाईना कळल्यावर त्यांनीं तो भाग वाचून पाहण्याचा आग्रह धरिला. त्यांनी तो भाग वाचून त्यावर प्रतिकूल मत दिल्यास माझा हिरमोड होऊन पुढील भागाचें लेखन नीट व्हावयाचें नाही अशी मला भीति वाटत असल्यामुळें मी नाटक संपण्यापूर्वीं दाखविण्याबद्दल आपली प्रतिकूलता प्रकट केली; पण तिच्याबरोबरच नाटक संपतांच दाखविण्याचें कबूल केलें. त्यांजमध्यें व गुर्जरांमध्यें असा पंक्तिप्रपंच केलेला पाहून हिराबाईस फार राग आला व मी त्यांस चालींची संथा देण्याची विनंति केली असतां त्यांनी नाटक वाचल्यावर ती देण्यांत येईल असें म्हटलें. पुढील वर्षांत माझ्या स्नेह्यांच्या व माझ्या स्नेहासंबंधांत जो बिघाड पडला त्यास येथूनच आरंभ झाला असें म्हटल्यास चालेल.

मी मुंबईहून खामगांवास आल्यावर ४—५ दिवसांतच पांचवा अंक लिहून संपविला. पहिल्या दोन अंकांपेक्षां पुढील दोन अंक पडके झाले आहेत, सबब शेवटचा अंक विशेष उठावदार करावा लागेल अशी सूचना गुर्जरांनीं मी मुंबईहून निघण्यापूर्वीं केलेली असल्यामुळें पांचवा अंक विशेष खुलविण्यासाठीं मी बरीच काळजी घेतली होती व तो माझ्या अजमासाप्रमाणें वठलाहि. तो मी गुर्जरांकडे पाहावयास पाठविला असतां तो फारच बहारीचा

झाल्याबद्दल त्यांजकडून मला लिहून आलें. एकंदरीत 'सहचारिणी' नाटकाबद्दल गुर्जरांचें मत या वेळीं अत्यंत अनुकूल होतें.

१९१७ च्या सप्टेंबर महिन्याच्या आरंभाचे सुमारास 'गंधर्व नाटक मंडळी' अकोल्यास आली. नाटक पुरें झाल्याबद्दल त्या मंडळीच्या मालकांस गुर्जरांकडून आधीच वर्दी पोंचलेली असल्यामुळें त्यापैकीं प्रथम बोडस नाटक वाचण्याकरितां अकोल्याहून खामगांवास आले. तें वाचून त्यांचें त्याबद्दल बरेंच अनुकूल मत झालें. त्यानंतर कांहीं दिवसांनीं ते, नारायणराव राजहंस व इतर पांच-सात मंडळी आली; व बोडसांनीं इतरांस नाटक वाचून दाखविलें. मंडळीस तें पसंत पडल्यामुळें सर्वानुमतें तें घेण्याचें ठरलें. त्या खेपेस मला नाटकांतील पदांकरितां कांहीं चालीहि देण्यांत आल्या.

मंडळी खामगांवास असतां बोडसांना माझ्या थोडक्यांत घोळत असलेल्या 'परिवर्तन' नाटकाच्या संविधानकाची रूपरेषा सांगितली. हें संविधानक मी १८९९ साली लिहिलेल्या व त्याच सालीं प्रसिद्ध झालेल्या 'भयंकर जागृति' या काव्यावरून व 'प्रेमाभास' नाटकावरील टीकेंतील माझ्या कांहीं वाक्यांवरून १९१७ च्या मे महिन्यांत सुचलेलें असून त्यावर नाटक लिहिण्याचा माझा विचार होता. त्याच्या सुमारें एक वर्षापूर्वीं मी 'किर्लोस्कर मंडळी'स भेटण्याकरितां खानदेशांतील जळगांव मुक्कामी गेलों असतांना मुजुमदारांनीं मला खास त्या मंडळीकरितां एक नाटक लिहून देण्याची विनंति केली होती. "मी एकाच मंडळीकरितां कधीं नाटक लिहीत नसतों, मी एखादें नवें नाटक लिहिल्यास तें मला 'गंधर्व मंडळीस'हि द्यावें लागेल."—असें मी म्हटलें असतां—"त्या मंडळीकरितां दुसरें नाटक लिहा"—असें त्यांनी उत्तर दिलें होतें. मला ती कल्पना पटली होती, व 'सहचारिणी' 'गंधर्व मंडळी'करितां व 'परिवर्तन' 'किर्लोस्कर मंडळी' करितां लिहिण्याचा माझा संकल्प होता. पण बोडसांस 'परिवर्तना'चें संविधानक इतकें आवडलें की त्यांनी मी तें नाटक ताबडतोब लिहून नंतर दोन नाटकांपैकी त्यांस पसंत पडेल तें नाटक त्यांस व उरेल तें 'किर्लोस्कर मंडळी'स द्यावें अशी मला विनंति केली व मी ती मान्य केली. 'किर्लोस्कर मंडळी'स द्यावयाचें नाटक तिनें न घेतल्यास आपण घेण्याचा त्यांनीं पत्कर घेतला. 'गंधर्व मंडळी'नें किती नाटकें घ्यावयाचीं व एकच घेतल्यास कोणतें घ्यावयाचें हें पुढें ठरावयाचें असल्यामुळें पदें करावयाचें काम मी

साहजिकच तहकूब ठेविलें. मोबदल्याबद्दल मी नाटकाच्या सर्वांत अधिक उत्पन्नाची तिप्पट घ्यावी अशी बोडसांनीं या खेपेस आग्रहाची सूचना करून त्यांत माझें मुळींच नुकसान होणार नाही असें आश्वासन दिलें. परंतु मला ती शर्त न परवडल्यामुळे नाटकाच्या असाधारण हक्का ( मॉनोपली ) बद्दल मला ३३०० रुपये मिळावे असें आम्हांमध्ये ठरलें.

# २४

या सुमारास एक अशी गोष्ट घडून आली कीं तिनें वरील सर्व प्रश्नांचा ताबडतोब उलगडा करून टाकिला. मी एक बरेंच मोठें व अत्यंत सोयिस्कर घर बांधण्यापलीकडे कुटुंबाच्या भावी पोषणाची एकहि सोय करून ठेविली नव्हती ही गोष्ट माझ्या मनांत डांचत असे; व माझे स्नेहीहि अनेकदां अशी कांही तर्तूद करण्याची मला मधून-मधून सूचना करीत असत. अलीकडे माझें वकिलीचें उत्पन्न सपाट्यानें कमी होऊं लागल्यामुळें त्या विचारानें विशेष जोरानें उचल खाल्ली. माझे व्यापारी स्नेही विश्वनाथ नागोसा सावजी यांनीं १९१७ च्या मे महिन्यांत माटरगांवाचें एक शेत मला ७००० रुपयांस खरेदी घेऊन दिले होतें. त्यांपैकी साडेतीन हजारांची रक्कम माझ्या पदरची असून साडेतीन हजार रुपये मी विश्वनाथ सावजी-कडून कर्जाऊ घेतले होते. त्यांपैकीं २५०० रु. मी त्या सालचे जुलई महिन्यांत माझे कनिष्ठ बंधु दिगंबरराव अण्णा यांजपासून घेऊन त्यांस परत केले होते. कर्ज न काढण्याचा माझा कडक नियम असतां तो याप्रमाणें मला या वेळीं नाइलाजास्तव मोडावा लागला होता. परंतु या कर्जांतहि भर पडण्याचा या वेळीं योग आला. तो असा:– १९१७ च्या ऑक्टोबर महिन्याच्या १५ व्या तारखेच्या सुमारास विश्वनाथ सावजींनीं माटरगांवचे एक अत्यंत सुपीक शेत ९००० रुपयांस खरेदी मिळण्यासारखें आहे अशी मला बातमी दिली; व तें विकत घेण्याचा माझा हिय्या होत असल्यास मला त्या कामीं हरतऱ्हेची मदत करण्याची तयारी दाखविली. पूर्ण रक्कम भरण्यास दोन महिन्यांची मुदत मिळण्यासारखी आहे असेंहि त्यांनीं सांगितलें. माझ्या तोंडास पाणी सुटलें. पण एवढी रक्कम कशी उभी करावयाची याचा विचार पडला. ‘ परिवर्तन ’ नाटक लवकर तयार करून व दोन्ही नाटकांची

विल्हेवाट लावून सहा हजारांची रक्कम उभी करितां येण्यासारखी होती. पण बाकीच्या रकमेची काय वाट ? विश्वनाथ सावजीस व माझ्या बंधूंना पैशाचें बाबतींत पुन्हां त्रास देण्यास माझें मन घेईना. परतु— " मी तुम्हांस साह्य करण्यास तयार आहे, अशी संधि पुन्हां येणार नाही " — इत्यादि शब्दांनीं विश्वनाथ सावजीनी माझें मन खरेदीस प्रवृत्त केलें. ऑक्टोबरच्या २० व्या तारखेस किंवा त्या सुमारास खरेदीचा सौदा पक्का झाला; व डिसेंबरच्या वीस तारखेस किंवा त्यापूर्वी मी शेत विकणारास नऊ हजार रुपये द्यावे व त्याजपासून खरेदीखत लिहून व नोंदून घ्यावें असें ठरलें.

यानंतर कांही दिवस संविधानकाचा विचार करण्यांत घालवून नतर नाटकलेखनास जारीनें सुरवात केली. सकाळी कोर्टाचें काम पाहावें लागत असल्यामुळें व दुपारी कोर्टात जावें लागत असल्यामुळें बहुधा रात्रीं किंवा पहांटे लिहीत बसें. दिवाळीच्या सुट्टींत मी दुसरा अंक लिहीत असल्याचें पक्कें आठवतें. नाटक लिहून पुरें करण्यास अव्वलपासून अखेर-पर्यंत २०—२५ दिवस लागले असावेत. लिहिणें सपल्यावर माझे कारकून शंकरराव करकरे यांजकडून त्याची नक्कल शक्य तितक्या सपाट्यानें कर-विण्यांत आली. ' वधूपरीक्षे 'नंतरची माझी तिन्ही नाटकें व सर्व लेख यानीच लिहून काढिले असून त्या कामी मला त्यांचें फारच साहाय्य होत आलें आहे. असो.

नक्कल ' गधर्व मंडळी 'कडे पाठविण्यापूर्वी आपणाकडे पाठविण्या-बद्दल गुर्जरांचें मला पत्र आलें होतें. त्याप्रमाणें ती त्यांजकडे रवाना कर-ण्यांत आली. मात्र ती घाईनें वाचून ग्वाल्हेरास ' गधर्व मडळी 'कडे शक्य तितक्या लवकर पाठविण्याची मी त्यांना विनंति केली. तिला अनुसरून त्यांनीं घाईघाईनें एकदां वाचून ग्वाल्हेरास पाठविली. गुर्जरांचें मत कळण्यास मी फार आतुर झालों होतों. पण त्यांच्या पत्रानें माझी बरीच निराशा केली. " मी ' सहचारिणी 'स ३५०० रुपये दिले तर ' परि-वर्तना 'स २५०० रुपयेच देईन "—असें त्यांनी त्यांत लिहिलें होतें. मात्र— " सुधारणेच्या आवश्यकतेची खात्री पटवणारें या योग्यतेचें एकहि नाटक आपल्या वाचनांत आलेलें नाही. "—असेंहि एक वाक्य त्यांत होतें. बोडसां-चेंहि मत गुर्जरांप्रमाणेंच पडतें कीं काय याची मला धास्ती वाटूं लागली. माझ्या स्वतःच्या मतें ' परिवर्तन ' नाटक ' सहचारिणी 'पेक्षां बरेंच चांगलें

झालें आहे असें होतें. त्या नाटकाबद्दल ३७०० रुपये मागून व दोन्हीं नाटकें मिळून ७००० रुपये वसूल करून मागील कर्जांतून मुक्त व्हावें व पुढें फारसें कर्ज काढण्याची जरूरच पडूं देऊं नये असा माझा विचार होता. परंतु माझें मनोराज्य गुर्जरांच्या मतानें डळमळावयाला लागलें. कांही दिवस अधीरपणें वाट पाहिल्यावर बोडसांचें पत्र आलें. त्यांत त्यांनीं नाटकांत कांहीं फेरफार सुचवून तें नाटक ‘ सहचारिणी ’ नाटकापेक्षां अधिक पसंत पडल्याचें मला कळविलें होतें. तें वाचून माझा अर्धा जीव खालीं पडला.

यानंतर ‘ परिवर्तना ’च्या मोबदल्याबद्दल बोडसांशीं पत्रद्वारें वाटाघाट सुरू झाली. त्या सुमारास ‘ किर्लोस्कर मंडळी ’ मलकापुरास आली असून मधूनमधून खामगांवासहि प्रयोग करण्याच्या विचारांत होती. एक दिवस शंकरराव मुजुमदार नाटकगृहाची व राहण्याची सोय पाहण्याकरितां खामगांवास आले असता मी त्यांजपाशीं ‘ सहचारिणी ’बद्दल गोष्ट काढिली व ३३०० रुपयांच्या मोबदल्यांत त्यांस त्या नाटकाचे सर्व हक्क विकण्याची तयारी दाखविली. मात्र सारी रक्कम रोख द्यावी लागेल असाहि त्यांस त्याबरोबर इशारा दिला. मुजुमदारांनीं विचाराकरितां मुदत मागून घेतली. इकडे बोडसांनी ‘परिवर्तना’बद्दल ३३०० रु. व दोन नाटकांबद्दल ६००० रु. व त्याच्या महत्तम उत्पन्नाची बेरीज त्या रकमेच्या तिपटीहून अधिक झाल्यास त्या बेरजेची तिप्पट देण्याचें कबूल केलें. या रकमेपैकीं ताबडतोब किती द्यावयाची व मागाहून किती द्यावयाची याची भवति-न-भवति होऊन अखेरीस डिसेंबरच्या २० व्या तारखेपर्यंत ४००० रु. व १९१८ च्या फेब्रुवारीपर्यंत उरलेले दोन हजार रुपये द्यावे असें ठरलें.

मध्यंतरीं ‘ गंधर्व मंडळी ’तून फुटून निघालेल्या ‘शिवराज नाटक मंडळी’चे मालक गोविंदराव टेंबे व ‘ललितकलादर्श नाटक मंडळी’चे मालक केशवराव भोंसले यांच्या कानी माझी दोन नाटकें तयार असल्याची बातमी जाऊन त्यांजकडून त्यांपैकी एकेका नाटकाबद्दल मागणी आली. परंतु मी रक्कम व रोखीची शर्त कळवितांच त्यांनीं मागें पाय घेतला. त्यांनीं आपापल्या मागणीबरोबर मागील बाकीपैकीं प्रत्येकी शंभर रुपये पाठविले होते. हा एक अनपेक्षित लाभ त्याजपासून झाला.

या सुमारास ‘ किर्लोस्कर मंडळी ’चे खेळ खामगांवास सुरू झाले. मंडळी प्रत्येक प्रयोगास मलकापुराहून खामगांवास येई व खेळाच्या दुसऱ्या

दिवशीं परत मलकापुरास जाई. कंपनींतील प्रमुख नटांनीं माझीं दोन्हीं नवीं नाटकें वाचून पाहिलीं. त्यांना ' परिवर्तना 'पेक्षां ' सहचारिणी 'च अधिक आवडलें. ही गोष्ट माझ्या पथ्यावरच पडण्यासारखी होती. मी एक दिवस मंडळीच्या एका प्रयोगास गेलों असतां शंकररावांनीं—" मोबदल्याची रक्कम आम्हांस झेंपण्यासारखी नाहीं. तुम्हीं नाटक ' गंधर्व मंडळी 'स द्यावें. आमची स्थिति सुधारून तुम्हांस योग्य मोबदला देण्याची आम्हांस ऐपत येईल तेव्हां मीच आपण होऊन तुम्हांस नवें नाटक लिहिण्याची विनंति करीन. "— असें मला निर्वाणीचें सांगितलें. दुसऱ्याच दिवशीं मी बोडसांना पत्र पाठवून ' गंधर्व मंडळी 'स दोन्ही नाटकांचे हक्क पूर्वीं ठरलेल्या शर्तींवर विकण्यास कबूल असल्याचें कळविलें व चार हजार रुपये डिसेंबरच्या विसाव्या तारखेच्या आंत पाठविण्याची विनंति केली. त्याप्रमाणें ती रक्कम मुदतीच्या २—३ दिवस पूर्वींच त्यांजकडून येऊन माझ्या हातीं पडली. बाकीच्या रकमेपैकी दोन हजार रुपये मी बंधूकडून मागविले होते, तेहि त्या सुमारासच येऊन पोहोंचले. उरलेले तीन हजार रुपये मी विश्वनाथ सावजींकडून कर्जाऊ काढून नऊ हजारांची भरती केली. व डिसेंबरच्या एकोणिसाव्या तारखेस म्हणजे ठरलेल्या मुदतीच्या एक दिवस पूर्वींच ती रक्कम शेताच्या मालकाच्या पदरांत घालून त्याजपासून त्याच दिवशीं खरेदीखत लिहून व नोंदून घेतलें. याप्रमाणें दोन महिन्यांच्या अल्प अवधींत माझ्या सामर्थ्यापलीकडच्या गोष्टी घडवून आणण्याचा संकल्प करून तो सुरक्षितपणें पार पाडिल्याबद्दल मला अत्यंत समाधान वाटलें.

## २५

' गंधर्व मंडळी ' अकोल्यास असतांना तिच्यांतील प्रमुख नटांनीं खामगांवास दोन-चार खेपा करून एका नाटकाच्या पदांस पुरतील इतक्या चालींचा मजपाशीं पुरवठा करून ठेवला होता. १९१७ च्या डिसेंबर महिन्यांत त्या चालींचा स्थलनिर्णय पक्का करण्याचें व त्यांवर पदरचना करण्याचें ठरलें होतें. त्या कामाकरितां मुंबईस जाण्यासाठीं मी डिसेंबरच्या २० व्या तारखेस निघालों; व दुसरे दिवशीं तेथें पोहोंचून माझे चुलत बंधु हरिभाऊ यांचेकडे मी बिऱ्हाड ठेविलें. त्याच दिवशीं रात्रीं बोडस,

बालगंधर्व इत्यादि प्रमुख नटांच्या अनुमतानें चालींच्या जागा मुक्रर केल्या; व दुसऱ्या दिवसापासून पदें करण्यास सुरवात करून ती तीन-चार दिवसांतच संपविण्याचा विचार केला. त्यावेळी गडकरी ' गंधर्व मंडळी 'बरोबर असल्यामुळें व त्यांचें व गुर्जरांचें पद्यरचनेच्या कामी मला चांगलें साहाय्य होण्यासारखें असल्यामुळें माझा विचार कांही वावगा नव्हता. पण तो विचार बराच अव्यवहार्य असल्याचें माझ्या लवकरच दृष्टोत्पत्तीस आलें.

मी पदें करण्यासाठी मंडळीच्या बिऱ्हाडांतील एका खोलीतच त्यांच्या संमतीनें ठाणें दिलें होतें. वास्तविक पदें करावयाला मी एखाद्या निवांत व निर्जन स्थानाचीच निवड करावयास पाहिजे होती. त्याऐवजी मी माणसांनीं गजबजलेल्या ' गंधर्व मंडळी 'च्या बिऱ्हाडांतील एक खोली व व सहवासाकरितां गडकऱ्यांसारखे बोलके गृहस्थ निवडले. त्यांचें भाषण अत्यंत विनोदी व मनोरंजक असावयाचें. त्यांजकडून लक्ष वळवून उद्दिष्ट कार्याकडे लावणें ही गोष्ट असाध्य कोटींतीलच होती. एखादे वेळीं मनो-निग्रह करून मी पदें करण्यास बसलों तर गडकऱ्यांनी व गुर्जरांनी लाग-लीच —" कसें काय ? किती पदें झाली ? दहा-पांच होऊन गेलीच असतील ! तुमची प्रतिभा भारी दांडगी ! " इत्यादि परिहासात्मक ( व क्वचित् प्रसंगी उपहासात्मक ) वाक्यांनीं माझी थट्टा आरंभावी. अशा परि-स्थितींत पदें कशी व्हावी ? तीं करावयास ठरविलेल्या वेळापेक्षां अधिक वेळ लागल्यास पदें बसविण्यास वेळ कोठून आणावा ? नाताळचे दिवस याप्रमाणें टिवल्या-बावल्यांत गेले तर त्यानंतर पदें बसविण्यास उन्हाळ्याच्या सुट्टीपर्यंत वेळ मिळावयाचा नाही, असे चिंताजनक विचार माझ्या मनांतून घोळूं लागले. याप्रमाणें ३—४ दिवस गेल्यावर मी पद्यरचनेकरितां हरिभाऊंच्याच बिऱ्हाडी बसण्याचें ठरविलें व ' गंधर्व मंडळी 'चें बिऱ्हाड सोडून तिकडे गेलों.

तेथें तीनच दिवसांत घाईघाईनें पदें उरकून टाकिली व त्यांच्या सफाईचें काम गडकरी व गुर्जर यांच्या मदतीनें करण्याचा विचार केला. मी पदें लिहीत असतांना त्यांनी जितक्या तत्परतेनें माझ्या मार्गांत विघ्नें उपस्थित केली होतीं तितक्याच तत्परतेनें त्यांनीं पदांच्या सफाईच्या कामी मला मदत केली. गुर्जरांचा उपयोग कोश पुरविण्यापलीकडे किंवा शब्द-योजनेवर मत देण्यापलीकडे फारसा झाला नाही. पण गडकऱ्यांचा मात्र अतोनात उपयोग झाला. या प्रसंगीं त्यांचें मराठी भाषेवरील प्रभुत्व,

योजनाचातुर्य, कल्पकत्व असे अनेक गुण माझ्या नजरेस पडले. हें शुद्धी-करणाचें काम तीन-चार दिवस चाललें होतें. तें संपल्यावर मी सर्व पदांची एक शुद्ध प्रत तयार केली व ती पदें गुर्जरांकडून नाटकाच्या प्रतींवर योग्य स्थानीं लिहून घेतली.

दुसऱ्या दिवसापासून पदें बसविण्यास सुरवात केली. तें कामहि २—३ दिवस चाललें. हा वेळपर्यंत गडकऱ्यांनी नाटक वाचिलें नव्हतें. पदें बसत असतांना त्यांनी तें समग्र वाचिलें. त्यांना रंगरावाचा विनोद बराच आवडला असावा असें दिसलें. त्यानें केलेली रावजीचा दत्तक पुत्र होण्याची सूचना त्यांस इतकी आवडली कीं त्यांनी तिचा त्या खेपेस अनेकदां उच्चार केला. कांहीं भागांबद्दल त्यांनी नापसंती दर्शविली व ते भाग मी त्यांच्या मदतीनें लागलीच सुधारून टाकिले. कांही भाग मला स्वतःलाच सुधारा-वयाचे होते तेहि मी सुधारले. हें सुधारण्याचें काम मी निघण्याचे दिवसा-पर्यंत चाललेंच होतें.

स्टेशनावर ‘ गंधर्व मंडळी ’तील प्रमुख नटांबरोबरच गडकरी व गुर्जर हेहि मला पोंचविण्यास आले होते. त्यांनी या खेपेस माझ्याशीं केलेल्या सलगीबद्दल माझी मनःपूर्वक क्षमा मागितली. उभयतांचें या वेळचें वर्तन मला बरेंच चमत्कारिक वाटलें होतें यांत कांही शंका नाहीं. पण त्यांची मला मदतहि पुष्कळ झाली होती. म्हणून मी— “ मला दांभिक विनयापेक्षां असा मोकळेपणाच फार आवडतो ”— असें म्हणून त्यांचें समाधान केलें.

परत खामगांवीं आल्यावर पांच-सातदां मी ‘ सहचारिणी ’च्या गद्यांत व पद्यांत योग्य वाटतील त्या सूचना करून ‘ गंधर्व मंडळी ’स कळविल्या. परंतु या फेरफारांमुळें नाटक मर्यादेबाहेर वाढत चाललें अशी बोडसांकडून व गुर्जरांकडून तक्रार आल्यावरून दुरुस्तीचें काम बंद ठेविलें. आतां विशेष दुरुस्ती करावयाची राहिलीहि नव्हती. नाटकाचा पहिला प्रयोग बडोदें मुक्कामी करावयाचें ठरलें होतें. त्यापूर्वी नाटक आंखूड करण्याबद्दल सूचना बोडसांकडून मजकडे आल्या. त्या मी अमलांत आणून केलेले फेरफार त्यांस कळविले. या फेरफारांसह पहिला प्रयोग एप्रिल महिन्यांत गायकवाड सरकारापुढें झाला. नाटकें एरव्हीं कितीहि परिणामकारक असली तरी त्यांचे प्रयोग दरबारापुढें झाल्यास ते किती फिक्के पडतात याची कल्पना

इंदूर येथे झालेल्या ‘ विचित्र-लीले ’च्या दरबारी खेळावरून मला पूर्वींच आली होती. तेव्हां ‘ सहचारिणी ’च्या बडोद्यास झालेल्या संभावनेनें मला विशेष आश्चर्य वाटलें नाहीं. बडोद्याहून मंडळी पुण्यास येणार होती. तेथें नाटकाची योग्य परीक्षा होईल अशी माझी खात्री होती.

‘ वीरतनय ’ व ‘ प्रेमशोधन ’ या नाटकांवरून आणि ‘ पति हाच स्त्रीचा अलंकार ‘ ‘ व गरिब बिचारें पाडस ’ या गोष्टींवरून मला करुणरस बरा साधतो असा अनुभव आला होता. त्या रसाच्या आत्यंतिक उत्कर्षास अनुकूल असें एक जातिभेदविपयक कथानकहि कांहीं दिवसांपासून माझ्या डोक्यांत घोळत होतें. त्यांस नाटकाचें रूप देण्याची कल्पना येण्यास या सुमारास एक कारणहि झालें. १९१८ सालचे आरंभीं ‘ किर्लोस्कर मंडळी’चे बरेच प्रमुख नट तिच्यांतून निघून त्यांनीं ‘ बलवंत मंडळी ’ या नांवाची एक नवीन नाटक मंडळी काढिली. तिचे चिटणीस व्यंकटराव यांनीं खामगांवास मला भेटून एक नवें नाटक लिहून देण्याबद्दल गळ घातली. माझ्याजवळ संविधानक अर्धें-मुर्धें तयार होतें त्याजवर नाटक लिहिल्यानंतर तें केशवराव भोंसल्यांस देण्याचा माझा पूर्वीं विचार होता. पण ‘ बलवंत मंडळी ’ची गरज लक्षांत आणून मी तें नाटक त्याच मंडळीस देण्याचें ठरविलें. नाटक मे महिन्याची सुट्टी सुरू होण्यापूर्वीं पुरें करण्याचा संकल्प केला. संविधानक आटपशीर, सुसंबद्ध व चित्ताकर्षक करण्याच्या उद्योगाला लागलों. या नाटकांत पात्रांची शक्य तितकी काटकसर करण्याचा व माझ्या लेखनकलेची पराकाष्ठा करण्याचा माझा विचार होता. सबंध एप्रिल महिना माझ्या डोक्यांत त्या नाटकाच्या कथानकानें थैमान चालविलें होतें. त्या महिन्याच्या अखेरीस तें कथानक मनास पटण्यासारखें झालें, व मे महिन्याच्या दुसऱ्या तारखेस किंवा तिच्या सुमारास नाटक लिहिण्यास आरंभ केला. ते दिवस भर उन्हाळ्याचे असून दिवसभर अंगांतून घामाच्या धारा चालत. शिवाय सकाळचा कांहीं भाग व दुपारचा सारा वेळ कोर्टाच्या कामांत घालवावा लागे. घरीं परत आल्यावर लिहिण्यास मुळींच उत्साह वाटत नसे. तथापि नाटक मे महिन्याच्या १५ व्या तारखेच्या आंत संपविण्याचा निश्चय झालेला असल्यामुळें तशा प्रतिकूल स्थितींतहि सकाळीं, संध्याकाळीं व रात्रीं मिळेल त्या वेळीं खपून मी मे महिन्याच्या दुसऱ्या तारखेपासून दहाव्या तारखेपर्यंत नऊच दिवसांत सबंध नाटक लिहून संपविलें. अकराव्या

तारखेपासून शंकररावांकडून नाटकाच्या नकलेस सुरवात झाली व ती नक्कल १५ व्या तारखेस पूर्ण झाली. त्याच रात्रीं ती अस्सल प्रतीशीं ताडून पाहिली व तिच्यांतील चुका दुरुस्त केल्या. दुसऱ्या दिवशीं मी प्रत घेऊन मुंबईस गेलों.

मी मुंबईस जाण्यापूर्वीं दोन महत्त्वाच्या गोष्टी घडल्या त्या येथें सांगणें अवश्य आहे. ' जन्मरहस्य ' नाटक संपलें त्याच दिवशीं बोडसांचें मला पुण्याहून पत्र आलें होतें. त्याचें उत्तर लिहितांना मी तें नाटक पूर्ण झाल्याची बातमी देऊन त्याच्या स्वरूपाचें थोडेंसें वर्णनहि दिलें होतें. परंतु माझ्या उत्तरास बोडसांनीं जें प्रत्युत्तर पाठविलें त्यांत नाटकसमाप्तीबद्दल माझें अभिनंदन तर दूरच, पण त्याचा नामनिर्देशहि केला नव्हता. तें नाटक त्यांजवर लादलें जाण्याची त्यांस भीति वाटत होती असें मी मुंबईस गेल्यावर मला गुर्जरांकडून कळलें. मी बोडसांस ' सहचारिणी ' नाटक प्रथम दाखविलें होतें तेव्हां त्यांनीं माझीं सर्व भावी नाटकें रंगभूमीवर आणण्याची तयारी दाखविली होती. परंतु ' सहचारिणी 'चा बडोदें येथील प्रयोग पडल्यामुळें व गुर्जर प्रभृति माझ्या स्नेह्यांच्या माझ्या मागें माझ्या नाटकांवर चाललेल्या प्रतिकूल टीकांमुळें त्यांना माझ्या कृतींबद्दल इतका तिट्कारा वाटावयास लागला कीं माझ्या नूतन कृतीबद्दल अभिनंदन करण्याचा शिष्टाचारहि त्यांनीं पाळिला नाहीं. मी ' जन्मरहस्य ' नाटक ' बलवंत मंडळी 'करितां लिहिलें असल्याचें आपल्या पत्रांत कळविलें होतें व म्हणून मी त्यांच्या चांगुलपणाचा फायदा घेऊन नाटक त्यांजवर लादीन अशी भीति त्यांनीं बाळगण्याचें कारण नव्हतें. नाटकसमाप्तीबद्दल त्यांस लिहिण्याचें कारण इतकेंच कीं ज्या वेळीं त्यांनी माझीं दोन्हीं नाटकें घेतलीं त्या वेळीं कृतज्ञतेच्या भरांत मी माझें प्रत्येक भावी नाटक प्रथम ' गंधर्व मंडळी 'स दाखवून त्यांचा नकार मिळाल्यानंतर मात्र दुसऱ्या मंडळीस देण्याचें कबूल केलें होतें.

## २६

महत्त्वाची दुसरी गोष्ट गुर्जरांसंबंधींची आहे. ' जन्मरहस्य ' नाटक लिहून तयार झालें त्या सुमारास गुर्जरांचेंहि एक नाटक नुकतेंच संपलें होतें. गडकऱ्यांचें ' भावबंधन ' नाटकहि ' बलवंत मंडळी 'कडून बसत आलें

आहे असा माझा गुर्जरांच्या पत्रावरून समज झाला होता. ती दोन्हीं नाटकें रंगभूमीवर आल्याशिवाय मी 'जन्मरहस्य' तयार असल्याचें वर्तमान 'बलवंत मंडळी'स कळविणार नाही असें मी गुर्जरांस कळविलें व त्यांनींहि तशी मला आग्रहपूर्वक विनंति केली. यानंतर १—२ दिवसांतच माझे चुलत बंधु व 'बलवंत मंडळी'तील प्रमुख नटांचे स्नेही निळकंठराव ऊर्फ आप्पासाहेब कोल्हटकर खामगांवास आले. 'जन्मरहस्य' तयार असल्याचें त्यांस परस्पर कळून त्यांनीं ती गोष्ट 'बलवंत मंडळी'स कळविण्याचा आपला विचार असल्याचें मला सांगितलें. मी त्यांस तसें न करण्याबद्दल परोपरीनें विनविलें. पण ते आपला हेका सोडीनात. अखेरीस त्यांनीं 'बलवंत मंडळी'स ही गोष्ट कळविल्यास निदान तिच्यांत गुर्जरांचा कांही संबंध आणूं नये अशी इच्छा मी दर्शविली व ती त्यांनी मान्य केली.

मी मुंबईस आल्याबरोबर गुर्जरांस घडलेली हकीकत कळविली व झालेल्या प्रकारांत माझा कांही दोष नसल्याबद्दल त्यांस निक्षून सांगितलें. मी मुंबईहून २—३ दिवसांत पुण्यास 'सहचारिणी'च्या तालमी घेण्याकरितां जाणार असून मुंबईस परत २०—२२ दिवस येणार नव्हतों. त्या मुदतीत गुर्जरांचें नाटक बसविण्याबद्दल कंपनीस आग्रहानें सांगण्याचें मी त्यांस अभिवचन दिलें. गडकरी पुण्यास तापानें आजारी असून 'भावबंधन' नाटक पूर्ण करण्यास असमर्थ होते. तेव्हां या मुदतींत कंपनीपाशी दुसरें एकहि नाटक बसविण्यासारखें नसल्यामुळें गुर्जरांचें नाटक बसविण्यास ती मोकळी होती. गुर्जरांनीं आपल्या नाटकाची किमत बरीच जबर म्हणजे २५०० रु. ठेविली होती, ती मात्र कमी करण्याची मी त्यांना सूचना केली. पण ती त्यांना मान्य होण्याचें चिन्ह दिसेना. अच्युतराव कोल्हटकरांनी 'सुंदोपसुंदा'बद्दल २५०० रुपये घेतले, मग मी त्यांच्याइतकाच प्रसिद्ध ग्रंथकार असतां तितकी रक्कम कां घेऊं नये असें त्यांचें म्हणणें पडलें. "अच्युतराव जहाल पक्षाचे अग्रणी असल्यामुळें त्यांचें नाटक जितकें लोकप्रिय होण्याचा संभव तितका तुमचें नाटक होण्याचा नाही. एकदां तुम्ही यशस्वी नाटककार म्हणून प्रसिद्ध झालांत कीं मग आपल्या नाटकाची वाटेल ती किमत ठेवूं शकाल. पण तोंपर्यंत पडतेंच घेतलेलें बरें."—असें मी त्यांस पुष्कळ समजावून सांगितलें; पण ते २५०० रुपयांच्या रकमेवरून खालीं येईनातच. "कंपनीनें माझ्या नाटकाच्या पूर्वीं

तुमचें नाटक रंगभूमीवर आणलेंच तर मी गडकऱ्यांच्याकडे किल्ली फिरवून कंपनीस ' भावबंधन ' नाटक मिळणार नाहीं असें करीन. कारण प्रथम कंपनीनें 'भावबंधन' बसवून लागलीच माझें नाटक बसविलें पाहिजे या अटीवरच गडकऱ्यांनीं आपलें नाटक कंपनीस देण्याचें कबूल केलें आहे "— अशी धमकीची भाषाहि ते योजूं लागले. " गडकऱ्यांच्या ' भावबंधन ' नाटकाचा पहिला, माझ्या नाटकाचा दुसरा व ' जन्मरहस्य ' नाटकाचा तिसरा नंबर लागेल."—या वाक्याचा त्यांनीं माझ्या देखत व कंपनीच्या नटांसमक्ष अनेक वेळां उच्चार केला. " मी गडकऱ्यांचें रसोत्पादनकौशल्य व तुमची कला उचलली आहे "—याहि पालुपदाची त्यांजकडून वारंवार उजळणी होऊं लागली. या व अशाच इतर उद्गारांवरून त्यांचें नाटक पाहण्याची मला जिज्ञासा झाली. तें वाचून दाखविण्यास त्यांची एका पाया-वर तयारी होतीच. त्यांनीं तें नाटक मला आमूलाग्र वाचून दाखविलें. तें वाचतांना मधून-मधून—" हा प्रवेश अत्यंत हृदयद्रावक आहे. हा हिरा-बाईंना फार आवडला. ही कल्पना ऐकून दीनानाथ मला चाली द्यायला तयार झाला."—असे उद्गार त्यांच्या तोंडून निघतच होते. तरीसुद्धां माझ्या मनावर नाटकाचा विशेष परिणाम झाला नाही. मला तें अगदी सरासरी वाटलें. त्यांतील विनोद अगदींच पांचट असून तो तसा असल्याबद्दल गुर्जरांनींच आरंभीं कबुली दिली होती. तो सुधारण्याकरितां मी त्यांस अनेक सूचना केल्या.

इकडे ' बलवंत कंपनी 'च्या मालकांनी 'जन्मरहस्य' नाटक गुप्तपणें वाचून टाकिलें; व तें त्यांना बरेंच परिणामकारक वाटलें. ते ताबडतोब बसविण्याची त्यांनी तयारी दाखविली. परंतु " मला हें प्रथम ' किर्लोस्कर मंडळी 'स दाखविलें पाहिजे. शिवाय ' सहचारिणी 'च्या तालमींतून मी मोकळा होईपर्यंत मला त्यांतील पदें करण्यास सवडच सांपडणार नाहीं. तोंपर्यंत तुम्ही गुर्जरांचें नाटक बसवा."—असें मी त्यांस सांगितलें. गुर्जरांचें नाटक त्यांसहि फारसें आवडलें नसल्यामुळें तें बसविण्यास त्यांची प्रतिकूलता होती. माझें व गडकऱ्यांचें नाटक बसविल्यावर केवळ गुर्जरास उत्तेजन यावें म्हणून त्यांचें नाटक फुकट बसविण्यास आपण तयार आहोंत असें त्यांनीं बोलून दाखविलें.

आमचें इतकें बोलणें होत आहे तोच तेथें गुर्जर आले. ते आल्यावर—

" लवकरच 'बलवंत मंडळीं'तील एका होतकरू मुलाच्या आवाजाचा प्रेक्षकांना मी खरा परिचय करून देईन."—असें वाक्य माझ्या तोंडांतून बाहेर पडलें. त्याबरोबर " लोकांना तुमचा एकदां-दोनदां नाहीं, सहादां अनुभव आला आहे."—असें गुर्जर म्हणाले. तें ऐकून मी थक्कच झालों. ' सहादां ' या शब्दाचा संबंध अर्थातच माझ्या सहा नाटकांशीं होता. मी ताबडतोब म्हणालों—" गुर्जर ! मी तुमच्या बोलण्याचा पुरता अर्थ समजलों नाहीं. तुम्ही माझ्या नाटकासंबंधानें म्हणाला असाल तर माझें त्यावर इतकेंच म्हणणें आहे कीं माझें नवें नाटक लोकांस अप्रिय जरी झालें तरी त्यामुळें त्यांना या मुलाच्या आवाजाची गोडी कळण्यास प्रत्यवाय कसा येणार ? " जे गुर्जर मला आपला गुरु म्हणण्यांत धन्यता मानीत, जे मुंबईस माझ्या आगमनाची आतुरतेनें वाट पाहत व मी त्याची आगाऊ सूचना दिली नसतांहि रोजचे रोज गाडीच्या वेळेवर माझें स्वागत करण्याकरितां नेमानें येत, माझ्या लेखांतील एखादें वाक्य ज्यांत अवतरण म्हणून घेतलें नाहीं असा एकहि लेख बहुधा ज्यांच्या लेखणींतून आजपर्यंत उतरला नाहीं,—तेच का हे गुर्जर अशी मला क्षणभर शंका आली. मजबद्दलचा त्यांचा आदर पूर्णपणें नाहींसा झाल्याचीं आणखीहि कांहीं चिन्हें माझ्या दृष्टोत्पत्तीस येऊं लागलीं. जे गुर्जर माझ्यासमोर नेहमीं अदबीनें बसत असत ते आतां मी नुसत्या सत्रंजीवर बसलों असतां तक्याशीं टेकून गादीवर लोळूं लागले. " स्वतंत्र नाटकें लिहिणें ही फार सोपी गोष्ट आहे असें माझ्या नाटकाच्या अनुभवावरून प्रत्ययाला आलें आहे. " असें ते एक-दोनदां म्हणाले. त्यावर मी—" म्हणूनच तर मी तुम्हांला अनेकदां स्वतंत्र नाटकें लिहिण्याबद्दल आग्रहपूर्वक सांगितलें होतें. "—असें म्हणालों. गडकऱ्यांची माझ्या देखत वेळीं-अवेळीं अवास्तव स्तुति करून माझा पाणउतारा करण्यांत त्यांना आनंद वाटत असावा असेंहि माझ्या अनुभवास येऊं लागलें. अशा एका प्रसंगीं मी गडकऱ्यांच्या नाटकांतील दोषांवर सणसणीत टीका केली व तिच्या समर्थनार्थ मुंबई येथें ' पुण्यप्रभावा 'ची झालेली नाचक्की, ' बाळकराम ' या सहीनें त्यांनीं लिहिलेल्या लेखमालेवर ' विविधज्ञानविस्तारा '-तील ' अभिनवविश्वगुणादर्श ' या काव्यांत झालेली चरचरीत टीका, वगैरे गोष्टींचे दाखले दिले. गडकऱ्यांसंबंधानें माझें मन इतकें क्षुब्ध होण्याचें कारण माझ्या होत असलेल्या नाचक्कीस तेच मुख्यत्वें करून जबाबदार आहेत

हा संशय होय. ते बोडस वगैरे मंडळींजवळ माझ्या नाटकांची मनसोक्त निंदा करीत असत असें गुर्जरांकडून मला कळलें. कोणत्याहि ग्रंथकाराची बुद्धिमत्ता वीस वर्षेंच काय ती टिकते, अधिक टिकत नाहीं, असा एक सिद्धांत गडकऱ्यांनीं एका इंग्रजी पुस्तकांत वाचिलेला असून त्यावरून माझ्या बुद्धीची तरतरी आतां नाहींशी झाली आहे असा त्यांनीं निष्कर्ष काढिला होता, असें गुर्जरांच्या सांगण्यांत आलें. गुर्जर त्यांचें यथाशक्ति अनुकरण करीत असत असें मला पुणें येथें कळलें. ज्या गुर्जरांना ' सहचारिणी ' इतकें प्रिय झालें होतें त्यांनींच त्या नाटकास मिळालेल्या मोबदल्यासंबंधानें बोडसांपाशीं बोलतांना—" कोल्हटकरांनीं तुमच्या खिशास कात्री लाविली " असे उद्गार काढावे हा एक असंभवनीय वाटण्यासारखा चमत्कार होय. पण तो खरा असल्याबद्दल खुद्द गडकऱ्यांनीं माझी खात्री केली. त्यांनीं या सालापासून नाटकाचा धंदा करण्यास सुरवात केली हें या ईर्षेचें कारण असावें. ते ' मनोरंजना 'च्या दुय्यम संपादकाच्या जागेवरून नुकतेच दूर झाले असून त्यांची खर्चासंबंधानें ओढाताण होत होती हेंहि कदाचित् तिचें कारण असेल. पण मी त्यांचा कोणत्याहि प्रकारचा अपराध केला नसतांना त्यांनी मजवर रोष करावा हें अगदीच अनुचित होतें. असो.

मी २१–५–१८ च्या सुमारास मुंबईहून पुण्यास गेलों व तेथें ' सहचारिणी 'च्या तालमी घेण्यास सुरवात केली. नटांस नकला विशेष पाठ नाहींत असें दिसून आलें. तालमी सुरू झाल्यापासून ते नकलांवर विशेष परिश्रम घेऊं लागले. तथापि नारायणराव राजहंसांची नक्कल कधींहि चांगली झाली नाही. त्यांची नेहमी भाषणांपेक्षां पदावर भिस्त असावयाची. लांबलचक भाषणें पाठ करण्याचा त्यांना मनापासून कंटाळा. यामुळें ज्या प्रवेशांत त्यांची भाषणें तडफीचीं असत ते प्रवेश फिके पडत. पुष्कळदां भाषणांच्या स्थानांची अदलाबदल झाल्यामुळेंहि घोंटाळा उडे. इतर नटांनाहि ' सहचारिणी 'च्या लोकप्रियतेबद्दल विशेष आशा दिसली नाही. या स्थितीच्या कारणाचा शोध केला असतां गडकरी-गुर्जर या माझ्या स्नेह्यांनीं त्या नाटकासंबधानें निंदा करून कंपनीचें मत अत्यंत प्रतिकूल केलें होतें असें समजलें. मला दोन नाटकांबद्दल सहा हजार रुपये दिल्यासंबंधानें जेव्हां गोष्टी निघत तेव्हा-तेव्हां बोडस—" आम्ही रुपये देऊन विद्वानांचा परामर्श घेतला "—असें निराशेनें उद्गार काढीत. नाटकांपासून उत्पन्नाची

आशा नसती तर त्यांनीं केवळ विद्वानांचा परामर्श घेण्याकरितां ६००० रुपये खर्च केले असते की काय याची शंका आहे. असो. याप्रमाणें कंपनीची स्थिति जरी मला प्रतिकूल दिसली तरी केवळ कर्तव्य म्हणून मी ठरीव वेळेस कंपनीच्या बिऱ्हाडी जाऊन तालीम सुरू करी. 'सहचारिणी'-च्या पांच हजार प्रतींच्या पहिल्या आवृत्तीचा हक्क मी पुण्याचे प्रकाशक आगाशे यांस बाराशें रुपयांस विकला होता. त्यांजकडून प्रकाशनाचें काम सुरू होतांच रोजचे रोज नाटकाचीं स्थूल मुद्रितेंहि तपासावी लागत.

# २७

अशा संधीस 'बलवंत मंडळी'चे मालक चिंतामणराव कोल्हटकर पुण्यास आले व त्यांनी मला 'जन्मरहस्या'ची गळ घातली. त्यांची भेट होण्यापूर्वीं मीं मुजुमदारांस नाटकाबद्दल पत्रद्वारें विचारिलें असून त्यांजकडून—"नाटकाची किंमत झेंपणार नाहीं"—असें उत्तरहि आलें होतें. नाटकासंबंधानें केशवराव भोसल्यांसहि विचारावयास पाहिजे होतें. परंतु त्यांजकरितां वामनराव जोश्यांचें 'लोकनायक' नाटक तयार असून शिवाय दोन नाटकें लिहिण्याकरितां वरेरकरहि त्यांजकडे जाऊन बसले आहेत असें मला नुकतेंच कळलें होतें, व बामणगांवकरहि त्यांजकरितां एक नाटक लिहीत आहेत असें त्यांजकडूनच मला समजलें होतें. अशा वेळीं माझ्या नाटकाबद्दल त्यांस विशेष आतुरता असण्याचा संभव नसल्यामुळें मी त्याबद्दल त्यांस लिहिलें नाहीं. याप्रमाणें मी त्या नाटकाची वाटेल तशी विल्हेवाट लावण्यास मोकळा होतों. तथापि 'बलवंत मंडळी'स दिल्यास गुर्जरांचें नाटक मागें पडेल म्हणून —"माझें नाटक तयार होण्यास अजून अवकाश आहे. तोंपर्यंत तुम्ही गुर्जरांचें नाटक बसवा."—असा मी कोल्हटकरांस जबाब दिला. गडकरी 'भावबंधनां'तील गद्य तयार करून देत असल्यास त्यांतील पद्य करून देण्यास मी तयार आहें असेंहि मी त्यांस व गडकऱ्यांस सांगितलें. परंतु— "मी आजारामुळें व अशक्ततेमुळें गद्य पुरें करण्यास असमर्थ आहें. तें पुरें होईपर्यंत तुम्हीच आपलें नाटक 'बलवंत मंडळीस'स द्यावें."— अशी गडकऱ्यांनीं मला आग्रहपूर्वक विनंति केली, व गुर्जरांची समजूत करण्याची जबाबदारी त्यांनीं आपल्या अंगावर घेतली. तेव्हां मात्र मी आपला आग्रह सोडून मंडळीस

नाटक देण्यास कबूल झालों. कंपनीनें मोनॉपलीबद्दल ३५०० रु. व नुसत्या प्रयोगाच्या हक्काबद्दल १४०० रु. द्यावे असें कोल्हटकरांमध्यें व मजमध्यें ठरलें. ही गोष्ट गडकऱ्यांस समजली तेव्हां त्यांस फार संताप आला. "तुम्ही एल्‌एल्‌. बी. म्हणून तुम्हांस इतके रुपये कबूल करितात, आणि मी नाहीं म्हणून मला कर्तव्याच्या गोष्टी सांगतात. तुमचें माझें गुरु-शिष्याचें नातें असलें, तरी धंद्याचा प्रश्न आला असतां मी तें जुमानणार नाहीं."— असें ते ओघा-ओघानें म्हणाले. त्यांच्या व माझ्या स्नेह्यांतहि समान व्यवसाय व्यत्यय आणूं पाहत आहे हें पाहून मला अत्यंत उद्वेग वाटला. मी त्यांस म्हटलें — "गडकरी ! तुम्ही 'भावबंधना'बद्दल ३५०० रुपये घेणार असें गुर्जरांकडून मला कळल्यामुळेंच मी तितक्या रकमेची मागणी केली. वास्तविक पाहतां तुमच्या नाटकाची किमत ४००० रुपये किंवा त्याहूनहि अधिक आहे; व तुम्हीं तेवढ्या रकमेची मागणी केल्यास मी तिला दुजोराच देईन."

या सुमारास आणखीहि एक-दोन गोष्टीवरून त्यांचें मन बिथरून गेलें होतें. गुर्जर नेहमीं त्यांचें नांव पुढें करून माझा पाणउतारा करितात हें पाहून मी त्यांजवर तीव्र टीका केली होती ही गोष्ट मीच आपणहून त्यांस सांगितली; त्यावरून त्यांस माझा बराच राग आल्यासारखा दिसला. कारखानीस आपणांस कवि म्हणतात पण नाटककार म्हणत नाहींत, ही गोष्टहि त्यांच्या कानांवर गेली होती. त्यांनीं 'पुण्यप्रभाव' नाटकावर घेतलेले जे कांहीं आक्षेप मी गुर्जरांना निरुत्तर करण्याकरितां योजिले होते ते मी गडकऱ्यांसहि सांगितले, त्यामुळेंहि त्यांच्या अंगाचा भडका उडाला.

गडकरी एकदां संतापले म्हणजे तोंडांतून काय शब्द काढतील याचा नेम नसे. राग उतरल्यावर मात्र त्यांचा प्रेमळपणा पुन्हां स्वस्थानीं येई. या गोष्टीचा मला या खेपेस चांगलाच अनुभव आला. "मी तुमची मागें कधींहि निंदा करीत नाहीं."— असें त्यांनीं मला एकदां आश्वासन दिलें; व त्यांची मजविषयींची आदरबुद्धि मला पूर्णपणें माहीत असल्यामुळें त्याजवर माझा लागलाच विश्वासहि बसला. ते माझ्या फोटोची पूजा करीत असत, ही गोष्ट कोणास सांगितल्यास खरीहि वाटणार नाहीं. पण ती अक्षरशः खरी आहे. अर्थात् त्यांनीं माझ्या मागें केलेली माझी नालस्ती विनोदाच्या भरांत केवळ श्रोत्यांस क्षणभर रिझविण्याकरितां केली असली पाहिजे, नुसत्या

गंमतीपेक्षां गंभीर स्वरूप तिचें कधींहि नसलें पाहिजे अशी माझी खात्री आहे. त्यांनीं मासल्याकरितां एक गोष्ट सांगितली तिजवरून माझ्या म्हणण्याचा खरेंपणा दिसून येईल. खामगांव येथील वकिलांच्या खोलींत एकानें गाढवावर एक अश्लील पण मजेदार कोटी केली होती. ती मी गडकऱ्यांस सांगितली असतां ती त्यांना फार आवडली. मात्र ती माझी नसून दुसऱ्याचीच आहे ही गोष्ट ते विसरले. एकदां ते ती कोटी मंडळींत सांगत असतां म्हणाले— " ही कोटी मला इतकी आवडली की आतां जेव्हां-जेव्हां माझ्या दृष्टीस गाढव पडतें तेव्हां-तेव्हां मला कोल्हटकरांची आठवण होते. " ही कोटी-वरील कोटी मला इतकी आवडली कीं मी ती ऐकून पोटभर हंसलों, व अखेरीस गडकऱ्यांस म्हणालों — " ही तुमची कोटी इतकी चांगली आहे कीं यापुढें मला गाढव दिसत जाईल तेव्हां तुमची आठवण होत जाईल. " आम्हां दोघांमधील बंधनच विनोद व अभिनव कल्पना हें असल्यामुळें अशा प्रकारच्या एकमेकांवर लढविलेल्या कोट्या व कल्पनांनी आम्हांस मुळींच राग येत नसे.

मी ' जन्मरहस्य ' नाटक ' बलवंत मंडळी 'स दिल्याचें वर्तमान कोल्हटकरांकडून गुर्जरांस कळून त्यांचें मला त्यासंबंधानें एक भयंकर पत्र आलें. त्यांत त्यांनीं मजवर विश्वासघाताचा आरोप केलेला होता. तें मी गडकरी, बोडस वगैरे मंडळींस दाखवितांच त्यांस गुर्जरांबद्दल अत्यंत त्वेष आला. गडकऱ्यांस तर इतका संताप आला की त्यांना त्यामुळें एक-दोन रात्रीं अलोचन जाग्रणें घडली. गुर्जरांच्या भयंकर पत्रास मी उत्तर न पाठवितां केवळ मनानेंच आपला त्याजबद्दलचा तिरस्कार व्यक्त केला. त्यांचें इतःपर मला पत्र येईल असें मला वाटत नव्हतें, पण ' सहचारिणी ' नाटक बहुतेक छापिलें जाऊन मी याची प्रस्तावना लिहिण्यास घेणार तोंच त्यांचें एक पत्र आलें. त्यांत त्यांनीं त्यांच्या नांवाचा प्रस्तावनेंत उल्लेख न करण्याबद्दल मला लिहिलें होतें. त्यास अनुसरून मी त्यांचें नांव प्रस्तावनेंतून अजीबात वगळलें.

मी पुण्याहून मुंबईस निघण्याचे सुमारास गडकऱ्यांनीं मजवरील आपलें प्रेम शक्य तितक्या प्रकारांनीं व्यक्त केलें. एकदां ते म्हणाले— " माझ्या घरांतील सृष्टीशीं माझी आई व घराबाहेरील सृष्टीशी तुम्ही इतकें संलग्न झाला आहांत कीं तुमच्यावांचून जगण्याची मला कल्पनाहि येत नाही." मी निघण्याच्या एक-दोन दिवस पूर्वीं त्यांनीं मी, माझे बंधु, चुलते व डॉ.

मोडक यांस जेवण्यास बोलाविलें. " तुम्ही आजारी आहांत, अशा वेळीं आम्ही जेवायला येणें प्रशस्त नाही. त्यानें तुम्हांसहि फार त्रास होईल. तुम्ही आजारांतून उठल्यावर मी आपण होऊन तुमच्याकडे जेवावयास येईन. "— इत्यादि अनेक हरकती घेतल्या. परंतु ते कांहीं केल्या ऐकेनात. " माझें दुखणें भयंकर नाहीं. मी आज तुमच्या पंक्तीला बसून स्वतः तुम्हांस आग्रह करीन. "— इत्यादि वाक्यांनी त्यांनीं माझ्या शंकांचें निवारण केलें. सरते शेवटीं मोठ्या मुष्किलीनें मी त्यांचें म्हणणें कबूल केलें. त्या दिवशी रात्रीं आम्ही चौघेजण त्यांजबरोबर आनंदानें जेवलों. गेल्या एक-दोन वर्षांपासून ते मजपाशीं— " आपण दोघे मिळून एक नाटक लिहूं. तुमच्या नावाशीं माझें नांव संलग्न व्हावें अशी माझी फार इच्छा आहे "— असें वारंवार म्हणत असत. ती इच्छा त्यांनी याहि खेपेस प्रगट केली. ही त्यांची इच्छा निराळ्याच अर्थानें पूर्ण होण्याचा ईश्वरी नेमानेम होता. असो. गडकऱ्यांमध्यें व मजमध्यें कधींकधी विरोधाचे प्रसंग जरी उपस्थित होत असत तरी त्यांच्यासारखा स्नेही मला पुनः मिळणार नाहीं हेंच खरें.

गडकरी दुखण्यांतून लवकरच उठावे म्हणून मी त्यांना डॉ. मोडकांचें औषध घेण्याचा पुष्कळ आग्रह केला व एक-दोनदां त्यांस त्यांजकडे माझ्या-बरोबर घेऊनहि गेलों. परंतु— " मला कोयनेल मुळींच सोसत नाहीं. तें पिचकारीनें माझ्या अंगांत घातलें तरी मला अपाय करील—" असें म्हणून त्यांनी त्यांचें औषध घेण्याचें नाकारिलें. त्यांनीं वैद्याचें औषध सुरू केलें होतें. त्यांचा ज्योतिषावरहि फार विश्वास असे. आपले प्रतिकूल ग्रह बदलून अनुकूल ग्रह केव्हां येतात हें ते पंचांगांत नेहमीं पाहत असत.

' सहचारिणी 'च्या रंगीत तालमीला हजर राहण्याचें मी टाळीत होतों. परंतु अखेरीस इतरांच्या आग्रहामुळें हजर राहावें लागलेंच. तालीम चांगली झाली. माझे चुलते व बंधु यांस ती फार आवडली. या नाटकाइतकें अव्वलपासून अखेरपर्यंत मनोरंजक वाटणारें माझें दुसरें एकहि नाटक नाहीं असें माझ्या बंधूंचें मत पडलें.

जूनच्या ११ व्या तारखेस किंवा त्या सुमारास मी पुण्याहून मुंबईस परत गेलों. गुर्जर मला बिऱ्हाडीं येऊन भेटले. परंतु मी त्यांच्याशी तिऱ्हाइताप्रमाणें पण शिष्टाचाराचें अतिक्रमण न करितां वागण्याचा निश्चय केला होता त्याप्रमाणें वागूं लागलों. त्यांनीं आपण होऊनच

एखादी गोष्ट सांगितल्यास मी तिला हुंकार देण्यापलीकडे कांहीं करीनासा झालों. " मी ' जन्मरहस्य ' नाटक वाचलें असून तें मला ' सहचारिणी 'पेक्षां चागलें पण ' परिवर्तना 'पेक्षां कमी प्रतीचें वाटलें " —असें त्यांच्या बोलण्यांत आलें. एकदां ' परिवर्तना 'पेक्षां ' सहचारिणी 'चें स्तोम माजविणाऱ्या पण बोडसांची गांठ पडतांच आपल्या मतांत परिवर्तन करणाऱ्या चंचल प्रकृतीच्या मनुष्याच्या मतास मी कितपतशी किमत देईन याचा विचार गुर्जरांच्या मनांत मुळींच न येतांना पाहून मला आश्चर्य वाटलें. 'बलवंत मंडळी'च्या बिऱ्हाडीं गेल्यावर मी त्यांना बहुमानानें माझ्या बरोबरीनें गादीवर बसण्यास सांगितलें. पण ते नुसत्या संत्रजीवरच नटांच्या मागें बसून राहिले. यानंतर नटांपासून चाली घेण्यास व त्यांचीं स्थानें ठरविण्यास सुरवात झाली. त्या गोष्टीस दोन-तीन दिवस लागले. नंतर पदें करण्यास सुरवात केली. मी मुंबईहून निघेपर्यंत सत्तावीस पदें झालीं. आगगाडीच्या प्रवासांत दहा पदें तयार करून पाठवून दिली. ' जन्मरहस्य ' नाटकांत सदाशिव कांतेचें, दीनानाथ रघुनाथाचें, भडकमकर उद्धवरायाचें, कोल्हापुरे मालतीचें, कोल्हटकर दशरथाचें काम करणार असल्यामुळें नाटक उत्तम वठण्याबद्दल मला मुळींच शंका नव्हती; व यामुळेंच मी नाटकांतील पदें मोठ्या हुरुपीनें व तांतडीनें तयार करून दिलीं होती.

नाटकाचा पहिला प्रयोग जुलई महिन्याच्या १५ व्या तारखेच्या सुमारास व्हावयाचें ठरलें होतें, व त्यापूर्वीं पांच-सात दिवस मी रंगीत तालमीकरितां मुंबईस जाण्याचें कबूल केलें असून माझ्या प्रवासाचा खर्च देण्याचें मंडळीनें कबूल केले होतें. मंडळीनें नाटकाची मोनॉपली घ्यावयाची कीं नुसता हक्क घ्यावयाचा हें ठरविण्यासाठी मी मंडळीस पहिल्या प्रयोगा-नंतर एक महिन्याचा अवधि दिला होता. तथापि त्या अवधीनंतर मंडळी मोनॉपलीच घेणार याबद्दल माझी खात्री होती.

मी परत खामगांवास आल्यावर मंडळीकडे एक-दोन हप्त्यांनीं नाट-कांतील उरलेलीं पदें पाठवून दिलीं. तीं पावल्याचीं पत्रें मंडळीकडून आलीं. परंतु त्यानंतर मंडळीकडून एकहि पत्र येईना. नाटक आगाश्यांकडून छापण्यास सुरवात होऊन तें संपतहि आलें तरी मंडळी स्तब्धच ! जुलई महिना गेला, ऑगस्ट महिना संपला. 'जन्मरहस्य' नाटक लवकर रंगभूमीवर येण्याबद्दल ' संजय ' पत्रांतून जाहिराती येऊं लागल्या. अखेरीस पहिला

प्रयोग ७-९-१८ रोजी लागल्याची जाहिरातसुद्धां फडकली. तरी मंडळीच्या पत्राचा पत्ता नाहीं. प्रयोगाच्या आधल्या दिवशी मंडळीच्या चिटणिसांचें पत्र आलें, तें वाचून मी थक्कच झालों ! भडकमकर व सदाशिव यांचा सदाशिवला हिस्सा मिळण्याबद्दल आग्रह असून तो इतर भागीदारांना मान्य नसल्यामुळें भागीदारांत दुफळी झाली आहे, पूर्वोक्त दोन नटांनीं कोणत्याहि नाटकांत कामें करण्याचें सोडून दिलें आहे, त्यांचीं 'जन्मरहस्यां'-तील कामें मंडळीस नवीनच्च मिळालेले जोशी व दीनानाथ हे करणार असून दीनानाथाचें काम कोल्हापुरे व कोल्हापुऱ्यांचें काम किरकोळ इसमांपैकीं शंकर नांवाचा मुलगा करणार आहे असा त्यांत मजकूर होता ! मी मुद्दाम सदाशिवाला साध्या व दीनानाथाला रागदारीच्या चाली घातल्या होत्या. पण आतां दीनानाथकडे त्याच्या नापसंतीच्या साध्या चाली येणार, व कोल्हापुऱ्यांकडे त्यांना न झेंपण्यासारख्या रागदारीच्या चाली जावयाच्या, हें पाहून माझा अतिशय हिरमोड झाला. ही अदलाबदल मला वेळीच कळली असती तर मी मुंबईस जाऊन चाली ठाक-ठीक बसविण्याची तजवीज तरी केली असती. पण मी खेळच बंद करीन या भीतीनें मंडळीनें मला तिचा मागमूसहि लागूं दिला नाही. यामुळें मंडळीस अपरिचित अशा अनेक चाली मला बसवितां आल्या नाहींत. चिटणिसांच्या पत्रांत मला पहिल्या प्रयोगाला पाचारणहि केलें नव्हतें. सुदैवानें मला याच सुमारास ठाणें येथील 'मराठी ग्रंथसंग्रहाल्या'च्या वार्षिक सभेकरितां मुंबईस जावयाचें होतें. तेव्हां ती संधि साधून प्रयोगासंबंधानें ज्या कांहीं उणिवा दिसून येतील त्यांतील शक्य तितक्या नाहींशा करण्याचा प्रयत्न मी केला. मी मुंबईस प्रयोगाच्याच दिवशीं जाऊन पोहोंचलों. त्यानंतर लवकरच कोल्हटकर भेटले. त्यांस प्रमुख गाणारीं पात्रें माझ्या बिऱ्हाडीं पाठवून देण्यास सांगितलें. तीं आल्यानंतर त्यांनी बसविलेल्या चाली जितक्या रेखीव करवतील तितक्या केल्या. ज्या त्यांना मुळींच माहीत नव्हत्या त्या इतक्या अल्प अवकाशांत बसणें शक्य नव्हतें. रात्रीं प्रयोगास गेलों. मंडळींतील कांहीं प्रमुख नट कामें करीत नाहींत असा चोहोंकडे बोभाटा झाल्यामुळें मंडळीच्या कोणत्याहि नाटकास उत्पन्न होत नव्हतें. 'जन्म-रहस्या'चा पहिला प्रयोग असतांही त्यास विशेष गर्दी किंवा मिळकत झाली नाहीं. नाटकाच्या गद्यांत कापाकापी करितांना मंडळीनें ढोबळ चुका

केलेल्या दिसल्या. ठाण्याहून परत आल्यावर मी नाटकांतील कोणते भाग गाळावयाचे व कोणते ठेवावयाचे हें ठरविलें. नटांस अवगत नसलेल्या चाली दिल्या, अवगत असलेल्या चाली गोड कशा कराव्या हें सांगितलें, व समग्र नाटकाची एक तालीम घेतली. इतक्यांत मी ज्या मुदतीच्या सवडीनें मुंबईस आलों होतों ती मुदत संपली व मला परत खामगांवास यावें लागलें. येतांना ' जन्मरहस्या 'च्या प्रत्येक प्रयोगाबद्दल माहिती ताबडतोब कळविण्याबद्दल व महिना होतांच मोनॉपली घेणार कीं नुसता हक्कच, याचा निर्णय करून मला कळविण्याबद्दल मी कंपनीच्या मालकांस बजाविलें. परंतु पहिल्या एक-दोन प्रयोगांच्याच हकीकती काय त्या मला कळविण्यांत आल्या आणि पुढें पुन्हां पूर्ववत् सामसूम झालें. पहिल्या प्रयोगानंतरचा महिना गेला. पुढेहि दहा-पंधरा दिवस गेले, परंतु मंडळीच्या मौनाचा भंग होण्याचें चिन्ह दिसेना. अखेरीस रागावून मी त्यांना एक व त्यांचे पुरस्कर्ते तात्यासाहेब परांजपे यांस एक अशी दोन पत्रें पाठविलीं. त्यांचाहि पालथ्या घागरीवरील पाण्याइतकाच उपयोग झाला. मजकडे एकहि लेख गुंतवावयाचा नाही असा त्यांचा बेत आहे की काय अशी मला शंका आली. कांहीं दिवस वाट पाहून मी पुन्हां दोघांस पत्रें पाठविलीं. या खेपेस मात्र त्यांची उत्तरें आलीं. त्यांत त्यांनी प्रयोगाचा नुसता हक्क घेतल्याबद्दल दर्शविलें होतें, व मंडळीच्या सवडीप्रमाणें १५०० रुपयांची फेड करण्याचें अभिवचन दिलें होतें. त्या रकमेपैकी २०० रु. आजपर्यंत मंडळीकडून आले आहेत. अजून मंडळीची निकृष्ट स्थितीच असल्यामुळें बाकीची रक्कम येण्याची वानवाच आहे.

प्रयोगाबद्दल लोकमत जरी अनुकूल नसल तरी नाटकाबद्दल तें बरेंच अनुकूल आहे. माझे रसिक स्नेही वसंतराव नाईक व माझे भावी प्रकाशक पडवळ यांनी पहिल्या प्रयोगानंतर लवकरच माझें नाटकाबद्दल अभिनंदन केलें. त्यानंतर ' इंदुप्रकाशां 'त अनुकूल अभिप्राय यावयास लागले व त्यावर ' इंडियन सोशल रिफॉर्मर ' या पत्रांत त्या नाटकाच्या स्तुतीनें ओतप्रोत भरलेलें एक पत्रहि आलें. सुमंत कवि, बेहरे यांचें मत हें नाटक माझ्या सर्व नाटकांत चांगलें साधलें आहे असें आहे, व इंग्लंडहून नुकतेंच मला प्रोफेसर खाड्यांचें पत्र आलें त्यांत त्यांनीं त्या नाटकास great and marvellous हीं विशेषणें लाविलीं आहेत. अनंत वामन बर्व्यांसाहि हें नाटक फार आवडलें

असून त्याचें सुखपर्यवसायी नाटकांत रूपांतर करण्याची त्यांनीं मजपासून परवानगी घेतली आहे.

# २८

गेल्या दोन-तीन वर्षांपासून वकिलीच्या धंद्यानें मला होणाऱ्या उत्पन्नास ओहोटी लागली होती. यास कारण वकिलांच्या संख्येमध्यें पडलेली बेसुमार भर व तिजमुळें उत्पन्न झालेली चढाओढ हें होय. मी तेल्हाऱ्याहून खामगांवास आल्यापासून कोर्टाचें काम अत्यंत काळजीनें करीत असें. आजपर्यंत एकच दावा काय तो माझ्या गैरहजेरींत काढून टाकण्यांत आला, व तोहि मी दुसऱ्या कोर्टांत काम करीत असतां. तो दावा सुदैवानें पुन्हां फैलावर घेण्यांत आला. असें झालें नसतें तर ती गोष्ट आजन्म माझ्या मनास बोंचीत राहिली असती. मी आजाराशिवाय कधींहि गैरहजर राहत नसे. घरीं मुंजी-लग्नासारखें कार्य असलें तरी मी सर्व विधि आटोपून बरोबर ११ वाजतां कोर्टांत जाण्याची खबरदारी घेत असे. माझ्या तोंडास अर्धांग-वायूचा विकार झाला तेव्हांहि माझी कोर्टात गैरहजिरी लागली नाहीं. दोन-तीन दिवाणी कोर्टांशिवाय इतर कोर्टांत कामें घेण्याचा मोह मी नेहमीं दूर सारी. फौजदारी कोर्टात किंवा अकोला येथील अपील कोर्टांत जाण्याकरितां मला पक्षकारानें रोज शंभर रुपयेप्रमाणें जरी देऊं केले तरी त्यास माझें एकच नकारात्मक उत्तर असे. वकिलीचा धंदा शक्य तितक्या प्रामाणिक-पणानें चालविण्याचा मी आजपर्यंत प्रयत्न केला आहे. मी आपल्या एकाहि पक्षकारास खोटा जबाब देण्यास शिकविलें नाहीं; व एकाहि साक्षीदारास खोटी साक्ष देण्यास पढविलें नाहीं. पुरावा चालू असतां आपला पक्ष खोटा असल्याचें निदर्शनास येऊनहि अखेरपर्यंत काम चालवावें लागे, यांत अंतर्भूत होत असलेल्या खोटेपणापेक्षां अधिक खोटेपणा माझ्या हातून कधींहि घडल्याचें स्मरत नाहीं. वकिलीचे दर कमी करूनहि मी आपल्या धंद्यास कधीं कमीपणा आणिला नाहीं. १९०६ किंवा १९०७ सालीं सर्व वकिलांनीं मिळून पांच रुपये शेंकड्यापेक्षां कमी वकिली घ्यावयाची नाहीं असा नियम केला. तो सर्वांत अधिक काल मीच एकट्यानें पाळिला असा माझा साधार ग्रह आहे. इतर वकिलांनीं तो नियम लवकर म्हणा

उशिरानें म्हणा धाब्यावर बसविल्यामुळें त्यांजकडे बरेंच काम राहिलें. मी मात्र इभ्रतीच्या खोट्या समजुतीला बळी पडल्यामुळें माझे अनेक मातब्बर पक्षकार गमावून बसलों. वकिलांनीं केलेल्या या नियमभंगाचा परिणाम व्हावयाचा तोच झाला. वकीलकीचे दर चोहींकडेच उतरून बसले. अखेरीस १९१६–१७ सालीं मलाहि आपला दर तीन रुपये शेंकड्यावर आणावा लागला. मात्र ज्या दाव्यांत विरुद्ध पक्षाकडून तक्रार घेण्यांत येई त्यांत पूर्वीचाच दर कायम ठेविला. दर कमी केल्याबरोबर मी ती गोष्ट माझ्या सर्व पक्षकारांस कळविली. याप्रमाणें दरांत बदल केल्याबरोबर माझे पूर्वींचे निघून गेलेले पक्षकार परत आले नाहींत ते नाहींतच, पण मजकडे अवशिष्ट राहिलेल्या अशीलांकडून मला होणारी किफायत मात्र कमी होऊं लागली. अलीकडे वकील-विशेषेंकरून नवे वकील-इतरांचे पक्षकार आपणांकडे आकर्षून घेण्याकरितां करूं नयेत त्या युक्त्या करीत. कांहींकांचे कारकून अशीलांची टेहळणी करावयाला व त्यांस जाळ्यांत पकडण्यास स्टेशनावर जात; कांहींकांचे कारकून रस्त्यानें जाणाऱ्या पक्षकारांस खुणावून आपल्या मालकाच्या घरीं बोलावीत. कांही वकील मध्यस्थांस दलाली देत, व कांहीं वकील कोर्टांत दाखल झालेल्या दाव्यांतील प्रतिवादीची नांवें उतरून घेऊन त्यांस मधल्या मध्यस्थांकडून स्वतःस काम देण्याबद्दल पत्रें लिहवीत. कांहीं वकील काम मिळवण्यासाठी पक्षकारांच्या घरी खेपा घालीत, व कांहीजण त्यांच्या घरी फिर्यादी लिहिण्याकारितां जात. अनेक वकील काम मिळण्याकरितां स्वतःची स्तुति व इतरांची निंदा करीत. अशा चढाओढींत यांपैकी एकहि गोष्ट न करण्याचा निर्धार केलेल्या माझ्यासारख्याचा निभाव कसा लागावा ? मी साऱ्या जन्मांत एकाहि इसमापाशी मला काम देण्याबद्दल शब्द खर्च केला नाहीं; व एकाहि पक्षकारापाशी दुसऱ्या वकिलांची निंदा केली नाहीं माझा कारकूनहि असावा तितका मनमिळाऊ नव्हता. त्यास मी पगार देत असून लिखाई मुळीच देत नसल्यामुळें नवीन काम मिळविण्याकडे किंवा जुने पक्षकार कायम ठेवण्याकडे त्याचें विशेष लक्ष नसे. त्याच्या बेमुर्वत-पणावर नाराज होऊन अनेक पक्षकार मला सोडून गेले. तरी ज्यांचा मजवर परा-काष्ठेचा विश्वास होता असे अनेक पक्षकार अद्यापि मला चिकटून राहिले होते. अशा संधीस युरोपांतील महासंग्रामामुळें व पिकें बुडाल्यामुळें महर्गता अतोनात वाढली; व अनेक पक्षकारांस कोर्टखर्च झेंपेनासा होऊन नवीन फिर्याद येणें

बंद झालें. या सुमारास जळगांवास लवकरच एक मुनसफ कोर्ट स्थापन होणार अशी बातमी येऊन ठेपली; व जे पक्षकार फिर्यादी आणावयाच्या तयारींत होते त्यांनीं ती गोष्ट कांही महिने लांबणीवर टाकिली. या सर्व कारणसमुच्चयाचा परिणाम असा झाला कीं माझें उत्पन्न अगदीं कभी झालें. तरी जळगांवासारख्या कुग्रामास जाण्याला माझें मन मुळींच घेईना. परंतु खामगांवच्या ज्या एका जुन्या वकिलाचा बेत जळगांवास जाण्याचा नक्की ठरला होता त्यानें तो याच संधीस फिरविल्यामुळें व मी जळगांवास गेल्यास मला चांगलीच किफायत होईल अशी खात्री वाटूं लागल्यामुळें माझ्या मनांत येथें जाण्याचे विचार डोकावूं लागले. सन १९१८ च्या सप्टेंबरच्या २७ व्या तारखेपर्यंत माझा कोणताच विचार नक्की ठरला नव्हता. पण त्या तारखेस त्या महिन्याचें उत्पन्न काढून पाहतां तीसच रुपये दिसून आलें, तेव्हां मात्र जळगांवास जाण्याचा बेत मुक्रर झाला. व त्यानंतर २–३ दिवसांतच खामगांव येथील सर्व कामाची नीट व्यवस्था लावून व वाचनालय, हायस्कूल कमिटी, स्कूल बोर्ड, सद्विद्यार्थिसंघ, कर देणारांचा संघ इत्यादि ज्या संस्थांशी माझा अध्यक्ष, उपाध्यक्ष व सभासद या नात्यानें संबंध होता त्या सर्व संस्थांकडे राजीनामे पाठवून मी सप्टेंबर महिन्याच्या अखेरीस जळगांवास रवाना झालों.

## २१

गेल्या वर्षांत दोन शोचनीय गोष्टी घडून आल्या, त्यांचा येथें उल्लेख करणें जरूर आहे. त्यांपैकीं पहिली गोष्ट म्हणजे माझ्या चुलत्यांचा मृत्यु. ते १९१८ च्या जुलई महिन्यांत मुंबईहून सागरकडे जातांना वाटेंत खामगांव येथें ४–५ दिवसांकरितां उतरले होते; तेथें एक दिवस अजीर्णाचें निमित्त होऊन ते आजारी पडले व दुसऱ्याच दिवशी म्हणजे ता. ५–७–१८ रोजी त्यांचा अंत झाला. त्यांचा अंत खामगांव येथें मजपाशीं असतांनाच होत आहे याबद्दल त्यांनीं मरणापूर्वीं मजपाशी समाधान व्यक्त केलें होतें. त्यांनीं अंतकाळच्या वेदना एखाद्या तत्त्वज्ञाप्रमाणें अत्यंत धैर्यानें सहन केल्या. त्यांच्या निधनाबद्दल नामदार शास्त्री, विष्णु मोरेश्वर महाजनि, मुधोळकर, जबलपूरचे शेट जीवनदास व वल्लभदास, भानू, कर्वे वगैरे अनेक बड्या

गृहस्थांकडून मजकडे तारा व पत्रें आलीं, व त्यांस मी उत्तरेंहि पाठविलीं. माझ्या चुलत्यांनीं आपल्या मृत्युपत्रांत मला व माझ्या धाकट्या बंधूंस व्यवस्थापक नेमिलें असून मृत्युपत्रांतील बहुतेक कलमांची अंमलबजावणी आम्हांकडून झालीहि आहे.

दुसरी शोचनीय गोष्ट म्हणजे गडकऱ्यांचा मृत्यु. गेल्या म्हणजे १९१८ सालच्या नाताळांत मी त्यांना भेटण्याकरितां मुद्दाम मुंबईहून पुण्यास गेलों होतों. त्यावेळीं त्यांची अवस्था बरीच कठिण झालेली दिसली. मला पाहातांच त्यांना हुंदका आला. १९१७ च्या नाताळांत त्यांनीं माझ्याशी जें वर्तन केलें होतें तेंच त्यांच्या आजाराचें कारण असल्याबद्दल त्यांनीं आपली समजूत करून घेतली होती, व ती आपल्या मातु:श्रीपाशी व्यक्तहि करून दाखविली होती. मला पाहतांच ती समजूत उचल खाऊन गडकरी माझ्याशीं कठोर-पणानें वागतील अशी मला धास्ती होती. त्यांनीं आजारांत अनेकांशीं तुसडेपणाचें वर्तन केल्याबद्दलच्या गोष्टी माझ्या कानांवर आल्या होत्या. पण माझी धास्ती निराधार होती. मी त्यांच्याजवळ जाऊन बसतांच ते आपल्या कृश शरीराकडे बोट करून स्फुंदत-स्फुंदत म्हणाले— " माझी ही अशी दुर्धर स्थिति झाली आहे. मी आतां या जगांत थोड्याच दिवसांचा सोबती आहे. " माझ्या पोटांतून दु:खाचे कढ येत होते. पण ते दाबून मी म्हणालों— " तुम्ही अजून सुधाराल. धीर सोडण्याचें मुळींच कारण नाहीं. तुमचे बंधु तुम्हांस सावनेरला नेण्यास आले आहेत. तेथें कोरड्या हवेंत कांहीं दिवस काढलेत म्हणजे तुम्हांला खात्रीनें आराम पडेल. " यानंतर त्यांनीं आम्हांला चहा घेण्याबद्दल अतोनात आग्रह केला. त्यास मान देऊन आम्हांस अळेंबळें एक-एक पेला घ्यावा लागला. नंतर ' भावबंधनां 'तील उरलेलीं पदें करण्या-बद्दल त्यांनीं मला विनंति केली व मी ती ताबडतोब मान्य केली. पदें ' मतिविकारां 'तील पदांच्या धर्तीवर म्हणजे कल्पनामय असावींत; ' जन्म-रहस्यां 'तील पदांच्या मासल्याचीं म्हणजे केवळ रसात्मक नसावींत, अशी त्यांनीं आपली विशेष इच्छा दर्शविली. यानंतर त्यांना एकदम भ्रमाचा झटका आला. माझ्याबरोबर राघोपंत पिंपळखरे त्यांस भेटण्याकरितां आले होते. त्यांच्या काळ्या कोटावरून ते डॉक्टर असून आपणांस शौचाची पिचकारी देण्यास आले आहेत अशी त्यांस भ्रांति उत्पन्न झाली व ते डोळे गरगर फिरवून हातांस चमत्कारिक आळोखे-पिळोखे द्यावयास लागले. त्यांचा

पिचकारीबद्दल अत्यंत प्रतिकूल ग्रह झाला असून हिनें आपणांस मरण येईल अशी त्यांना धास्ती वाटत होती. " हे मला मारायला आले आहेत "— असा त्यांनी घोष चालविला. त्यांच्या शुश्रूषेंत असलेल्या पांडू नांवाच्या मुलानें ते डॉक्टर नसल्याबद्दल त्यांची खात्री केल्यावर ते मजकडे टक लावून पाहूं लागले, व " हे कोण आहेत ? " असा त्यांनीं त्यास सवाल केला. त्यानें मी कोण आहें तें सांगतांच ते म्हणाले— " नाहीं. हे मला मारणार नाहींत. यांनीं मला लिहावयाला शिकविलें. मला नाहींना हो मारणार ? " भ्रमांतसुद्धां मजबद्दल प्रेम व्यक्त करणारे ते उद्गार ऐकून मला भडभडून आलें. कांहीं वेळानें त्यांचा भ्रमाचा झटका उतरून ते बराच वेळ स्वस्थ पडले. आम्हीहि विषण्ण अंतःकरणानें त्यांचा निरोप घेऊन निघालों. तो हृदयद्रावक प्रसंग आमरण माझ्या स्मरणांत ताजा राहील अशी खात्री आहे.

मी व माझे बंधु ज्या दिवशीं मुंबईहून निघणार होतों त्याच दिवशीं गडकरी आपल्या बंधूसह पुण्याहून निघणार होते. आमचें निघणें एक दिवसानें लांबलें, तसें त्यांचेंहि कर्मधर्मसंयोगानें एकच दिवसानें लांबलें. आम्ही बोरीबंदरावर आपल्या डब्यांत जाऊन बसलों न बसलों तोंच आमच्या गाडीत गडकरी असल्याचें कळलें. आम्ही ताबडतोब त्यांस जाऊन भेटलों. या खेपेस त्यांच्या तोंडावरील सूज कमी झालेली दिसली व त्यांजवर तजेलाहि बराच दिसला. देव करील तर हे अजूनहि बरे होतील अशी आम्हांस आशा उत्पन्न झाली. आम्ही त्यांची त्या दिवशीं गाडींत दोन-तीनदां भेट घेतली. मनमाडला त्यांच्या डब्याजवळ गेलों असतां अंधार पडलेला दिसला. गडकऱ्यांनीं व त्यांच्या बंधूंनीं मला स्टेशनमास्तरां-कडून दिव्याची व्यवस्था करण्यास सांगितलें व त्याप्रमाणें मी ती केली. हीच मजकडून त्यांची घडलेली अखेरची सेवा होय. यानंतर त्यांची प्रकृति सुधारल्याबद्दल त्यांच्या बंधूकडून लिहून येईल अशी मला बरेच दिवस आशा होती, पण ती अखेरीस निराधार ठरली. त्यांचा अंत ता. २३–१–१९ रोजीं झाल्याची दुःखद वार्ता त्यांच्या बंधूकडून त्यानंतर लवकरच मला पत्रानें कळली. मरणाच्या दोनच तास पूर्वीं त्यांनीं ' भावबंधन ' नाटकां-तील शेवटचें दीड पान लिहिलें होतें. वीर जसा लढत–लढत धारातीर्थीं पतन पावतो, त्याप्रमाणें या पटाईत लेखकानें लिहितां–लिहितां देह

ठेविला. त्यांच्या नूतन नाटकरूप अर्भकाचा जन्म व त्यांचा मृत्यु हीं बरोबरच झालीं !

पुणें येथें त्यांच्या निधनानिमित्त दुःखप्रदर्शनार्थ जी सभा भरली तिचें अध्यक्षस्थान स्वीकारण्याबद्दल मला विनंति करण्यांत आली होती. परंतु मी त्यावेळीं इसबानें जवळजवळ पंगूच झालों असल्यामुळें मला ती मान्य करितां आली नाहीं. 'नवयुगा'चे व 'उद्याना'चे संपादक गणेश विठ्ठल कुळकर्णी यांनीं गडकऱ्यांच्या निधनापासून महाराष्ट्र वाङ्मयाच्या झालेल्या हानिसंबंधानें अनेकांकडून लेख मागविले त्यांत माझाहि लेख मागविला होता. परंतु माझा गडकऱ्यांचा जो जिव्हाळ्याचा संबंध होता त्यामुळें त्यांच्या वाङ्मयसेवे-संबंधानें निर्विकार मनानें लिहिणें शक्य नाही म्हणून मी आपली असमर्थता व्यक्त केली. या लेखमालेंत पहिला लेख गुर्जरांचा आहे. त्या लेखांत केळकर, खाडिलकर यांसारख्या "सुप्रसिद्ध विद्वान् नाटककारां"चा उपहास कर-ण्याचा जो प्रयत्न लेखकानें केला आहे तो सिद्धीस न जातां उलट त्यानें लेखकाचा व गडकऱ्यांचाहि उपहास होण्याचा संभव आहे. त्यानंतर मनो-रंजनाच्या फेब्रुवारीच्या अंकांत गुर्जरांनीं लिहिलेलें गडकऱ्यांचें अल्प चरित्र आलें आहे; त्यांत लेखकाच्या लेखणीचा तीव्रपणा बराच कमी झालेला दिसतो. पण त्याचें श्रेय लेखकाच्या अंतःकरणापेक्षां संपादकांच्या मद्विषयक आदरास देणेंच योग्य होईल.

जळगांवास आल्यामुळें माझा आर्थिक दृष्टीनें फायदा होईल, अशी मला जी आशा होती ती फारशी सफल झाली नाहीं. येथील वकिलांनीं खामगांवकर वकिलांचें अनुकरण करावयास सुरवात केली आहे. शिवाय येथील दावे अल्प किमतीचे असल्यामुळें थोडें उत्पन्न पदरांत पडण्यास फार काम करावें लागतें. खामगांव व जळगांव या दोन ठिकाणी बिऱ्हाडें ठेवावीं लागत असल्यामुळें खर्च पूर्वीच्या दिढीनें होऊन उत्पन्नाचा व खर्चाचा मेळ घालतां घालतां नाकीं नव येतात. या गांवांत करमणुकीच्या किंवा इतरहि सोयी फारशा नसल्यामुळें व सुशिक्षित समाजहि बेताचाच असल्यामुळें येथें राहणें कधीं कधीं कंटाळवाणें होण्याचा संभव आहे. नांदुरा स्टेशनावर मेल थांबत नसल्यामुळें आगगाडीच्या प्रवासाची फारशी सोय नाहीं. नांदुरा व जळगांव यांमधील पूर्णा नदी पावसाळ्यांत ओलांडणें फारच दुर्घट असल्या-मुळें त्या दिवसांत येथून हलणें जवळ जवळ अशक्यच आहे. याप्रमाणें

येथें अनेक गैरसोयी आहेत, तशा कांही सोयीहि आहेत. येथील हवा-पाणी फारच उत्तम आहे. पाणी इतकें पाचक आहे कीं मी येथें आल्या-पासून पांच महिन्यांत मला अजीर्ण झालें नाहीं. येथें एकच कोर्ट असल्या-मुळें अनेक कोर्टांत धांवपळ करावी लागत नाही, व मन स्वस्थ राहतें. येथें सारा दिवस कोर्टाच्याच कामांत गुंतून राहवें लागत असल्यामुळें लेखनवाचनास फारशी फुरसद सांपडत नाही, व त्यामुळें डोक्यास विश्रांति मिळते. गेल्या दोनतीन वर्षांत मजकडून इतकें लेखन झालें कीं यापुढें कांही वर्षें मला विश्रांतीची फार जरूर आहे. माझ्या येथील परिस्थितीकडे लक्ष देऊन मासिकांचे संपादकहि मला लेखांच्या बाबतींत फारसा आग्रह करीतनासे झाले आहेत. अलीकडे माझे अनेक स्नेही मृत्यूनें किंवा गैर-समजुतीमुळें दुरावले असून माझ्या हल्लींच्या मनःस्थितींत मला राहावयास जसें ठिकाण पाहिजे होतें तसेंच मिळालें आहे. गडकरी मृत्युमुखी पडले. मी ६००० रुपयांच्या मोबदल्यांत 'गंधर्व मंडळी'च्या गळ्यांत दोन टाकाऊ नाटकें अडकविलीं असा बोडसांचा व बालगंधर्वांचा समज झालेला असल्यामुळें आमचें आतां विशेष सख्य राहिलें नाहीं. टेंबे, रामभाऊ कुंदगोळकर, यश-वतराव टिपणीस इत्यादि नाटक मंडळ्यांच्या मालकांकडे माझ्या बाक्या थकलेल्या असल्यामुळें आमचीं मनें परस्परांविषयी शुद्ध नाहीत. त्या बाक्या त्यांनीं ताबडतोब पाठविल्यास मला खामगांव सोडावें लागणार नाहीं अशा अर्थाचीं पत्रें मी गेल्या सप्टेंबर महिन्यांत या सर्व मंडळीकडे पाठविलीं असतां त्यांजकडून एक पैहि आली नाहीं. मुजुमदारांचे व माझे संबंध जरी बऱ्यापैकीं आहेत तरी ते मागील गोष्टीच्या आठवणीनें थोडे तरी दूषित होणें अपरिहार्य आहे. केशवराव भोंसल्यांस मी एक नाटक लिहून देण्याचें कबूल केलें असून तें वचन अनेक कारणांनी मजकडून पार न पडल्यामुळें त्यांचा मजवर रोष झाला आहे. कारखानिसांनीं 'वधूपरीक्षे'-च्या प्रयोगाच्या परवानगीबद्दल मला फक्त १०३/४/० रुपये दिल्यामुळें माझें मन त्यांजविषयीं शुद्ध नाही, व तें नाटक मी त्यांस बुद्धिपुरःसर उशिरानें दिलें असा संशय अजूनहि त्याच्या मनांत शिल्लक असल्यामुळें त्यांचेंहि मन मजविषयीं साफ नाहीं. काशीनाथ रघुनाथ मित्रांचा व माझा स्नेहसंबंध बिघडण्याचें कारण मी वर दिलें आहे. अशा मनःस्थितीत या

सर्वांच्या संपर्कापासून दूरगांवीं राहणेंच त्यांच्या व माझ्या स्वस्थतेच्या दृष्टीनें श्रेयस्कर आहे.

# ३०

वरील मजकुरावरून माझें मन जगास कंटाळलेलें आहे किंवा असंतुष्ट आहे असें समजण्याचें मुळींच कारण नाहीं. माझ्या योग्यतेपेक्षां किती तरी पटीनीं समाधानकारक अशी स्थिति मला प्राप्त झालेली आहे. माझी शारीरिक किंवा मानसिक संपत्ति कधींहि चांगल्यापैकीं नव्हती. लहानपणीं माझें शरीर अत्यंत दुर्बल असे. पुढें डेक्कन कॉलेजांत गेल्यावर मी नियमित व्यायाम करून कांहींसा सुदृढ झालों. पण पुढें मुंबईस राहिल्यावर कोणताहि शारीरिक व्यायाम न घेतल्यामुळें माझ्या अंगांत वात शिरला; व पुढेंहि शरीराची तीच स्थिति कायम राहिली. तथापि अंग फुटण्याचा व इसबाचा विकार यांशिवाय दुसऱ्या कोणत्याहि व्याधीनें मला फार दिवस पीडा दिली नाहीं. जठराग्नि अलीकडे मंद होत चालला आहे. पोटदुखी व कपाळदुखी यांची मला वर्षांतून एखाद्या दुसऱ्या वेळींच बाधा होते. वाचनाचा नाद असल्यामुळें कंटाळा आल्याची तक्रार मी कधींहि करीत नाहीं. माझी मूळची मानसिक पुंजी पाहिली तर फारच अल्प. माझी आठवण कधींच धड नव्हती. यामुळें शाळेंतील घोकंपट्टीचे धडे तयार करितां करितां मारामार पडत असे. परंतु त्यामुळें माझा एक फायदाहि होतो. तो असा कीं वाचनांत आलेल्या पुस्तकांतील कल्पना पृथक्पणें माझ्या स्मरणांत न राहतां त्यांचा मिळून एक संसृष्टिरूप ग्रह मनावर होतो, व तो ग्रह मनाचा एक कायमचा घटक बनून जातो. यामुळें मला सुचणाऱ्या नव्या कल्पनेचा उगम जरी इतर ग्रंथकारांच्या कल्पनांत असला तरी ती कल्पना माझ्या स्वतःच्या मानसिक घटनेस शोभेल असें एखादें नवें रूप घेऊन येते कीं तिचा उगम ओळखणें मलाहि कठिण जातें. एकदां पाठ झालेलें वाक्य मात्र बरींच वर्षें माझ्या स्मरणांत टिकाव धरून राहतें. माझ्या अंगीं सारासार शक्तीचा बराच अभाव असे. पुढें ती माझ्या अंगीं आली असल्यास त्याचें कारण सतत चिंतन हें होय. इतरांस अर्ध्या तासाच्या मननानें जें अनुमानसाध्य तें काढावयास मला सबंध दिवस खर्चीं घालावा लागतो. व्यवहारज्ञानाचीहि

माझी मूळची पुंजी अगदीं बेताची असे. परंतु मला वकिलीच्या धंद्यांत अनेक वृत्तीच्या, व्यवसायांच्या व स्वभावांच्या इसमांचा जो परिचय झाला त्यानें माझी ही उणीव बऱ्याच अंशांनी नाहींशी केली. माझें अवलोकन सूक्ष्म आणि ढोबळ मानाचें आहे, व स्मरणशक्तीहि वर लिहिल्याप्रमाणें मर्यादित आहे. त्यामुळें कोणत्याहि गोष्टीचें बारकाईनें व सागोपांग वर्णन करण्याची कला मला कधींहि साध्य होणार नाहीं असें वाटतें. कल्पनाशक्ति मजमध्यें बऱ्यापैकीं आहे. त्यांतल्या त्यांत सुंदर व भव्य वस्तूंचें ध्यान करण्यांत मनाला विशेष आनंद वाटतो. माझ्या इतकी सौंदर्याभिरुचि फारच थोड्या इसमांत दिसून येईल. वस्तूंमधील सादृश्य व विरोध यांचें ज्ञान मला फार त्वरित होतें. माझ्या भावना बऱ्याच दांडग्या आहेत. आनंद व शोक या दोहोंची तीव्रता मला फार भासते. हंसू तर कधींकधीं इतकें अनावर होतें की तें अनेकदां परिस्थितीस न जुमानतां फुटून बाहेर पडतें. माझ्या मनाचा आशावादीपणाकडे नैसर्गिक कल आहे. प्रत्येक स्थितीतून सुखद भाग तेवढा निवडून काढावयाचा व दुःखद भागाकडे कानाडोळा करावयाचा हा माझ्या मनाचा स्वाभाविक धर्म आहे. माझ्या मनाची सुखाकडे विशेष प्रवृत्ति आहे, परंतु सुखाकरितां विश्वासघात कधीहि करावयाचा नाही हा मात्र पक्का निर्धार. नीतिमत्तेपेक्षां बुद्धिमत्तेबद्दल मला नेहमी आदर वाटतो. बोलल्याप्रमाणें चालण्याविषयीं माझा विशेष कटाक्ष आहे. यासंबंधानें एकदां एक मौजेची गोष्ट घडली ती येथें देण्या-सारखी आहे. १८९५ सालीं मी एल्‌एल्‌. बी. च्या परीक्षेस दुसऱ्यानें बसलों. त्या सालीं माझी तयारी मुळींच नसून परीक्षेंत उतरण्याची आशाहि नव्हती. ज्या दिवशीं निकाल कळावयाचा त्याच्या आधल्या दिवशीं रात्रीं मी माझे स्नेही लक्ष्मण गणेश उर्फ काका महाजनी यांजकडे सपाटून जेवलों. तो इतका की दुसऱ्या दिवशीं दुपारी न जेवतां संध्याकाळीं निकाल कळल्यावर जेवावयाचें असा मी बेत केला. दुसऱ्या दिवशीं संध्याकाळीं काका महाजनी निकाल ऐकण्याकरितां निघून गेले. कांहीं वेळानें ते परत येऊन त्यांनीं निकाल दोन दिवस लांबल्याचें वर्तमान सांगितलें. निकाल कळल्यावर जेवण्याचा मी निश्चय करून चुकलों असल्यामुळें मला निकाल कळेपर्यंत उपास काढावे लागले. एकंदरीत तीन दिवस उपास करावा लागला. या तीन दिवसांत पोटांत जरी क्षुधेचा भडका उडत असे तरी मी बाह्यात्कारीं इतक्या आनंदांत असें कीं माझ्या उपासाचा एकाहि स्नेह्याला संशय आला

नाहीं. तिसऱ्या दिवशीं निकाल कळल्यानंतर मी काका महाजनींकडेच जेवलों. मात्र क्षुधाशमनाच्या आनंदांत नापास झाल्याचें दुःख पार नापत्ता होऊन गेलें !

माझी भाषा जरी रेखीव असते तरी तिच्यांत वैचित्र्य फार कमी असतें. याचेंहि कारण स्मरणशक्तीचा अभाव हेंच होय. उष्ट्या कल्पनाबद्दल मला पूर्वीपासून मनस्वी तिटकारा आहे. मी आजपर्यंत लिहिलेल्या लेखांपैकीं एकहि भाषांतररूप किंवा रूपांतररूप नाहीं. माझी जिज्ञासा नेहमीं अत्यंत तीव्र असते. तिची तृप्ति झाल्याशिवाय मनाची शांतता होत नाहीं. मला कोणत्याहि गोष्टीचा ध्यास लागला कीं तिच्याशिवाय दुसरें कांहीं सुचेनासें होतें. माझ्याभोंवतीं चाललेल्या संभाषणाकडे माझें पूर्ण दुर्लक्ष असून सारें लक्ष चित्तांत घोळत असलेल्या दुसऱ्याच विषयाकडे असतें. ही माझी एकाग्रता पुष्कळदां दोन-दोन चार-चार महिनेहि टिकते. मला लेखनकलेंत यश आलें असल्यास त्याचीं कारणें कीर्तीची लालसा व चिकाटी हीं होत. परंतु माझ्या चिकाटीच्या मुळाशी काम तडीस नेण्याचा निश्चय नसून फार दिवस मनास त्रास देत असलेल्या विषयांतून मुक्त होण्याची इच्छा ही असते. मला लिहिण्याचा मनस्वी कंटाळा. एखाद्या विषयानें मनास बरेच दिवस त्रास दिल्याशिवाय मी बहुधा त्यावर लिहिण्यास बसत नाहीं. कधीं-कधीं एकाद्या नाटकाचें संविधानक मनास रात्रदिवस इतकें छळतें कीं तें बाहेर काढिल्याशिवाय मनास हायसें वाटत नाहीं. माझी नियमितपणाबद्दल बरीच प्रसिद्धि आहे. परंतु या नियमितपणाचा उगम उतावळेपणांत आहे, हें ऐकून पुष्कळांस आश्चर्य वाटेल. पत्रांचीं उत्तरें तुंबल्यास त्यांजकरितां सबंध एक दिवस मोडावा लागेल, या भीतीनें मी आलेल्या पत्रांचीं ताबडतोब उत्तरें पाठवितों, व नाताळांत किंवा उन्हाळ्याच्या सुट्टींत नाटक न लिहिल्यास त्याकरितां पुढें तीन-चार महिने घालवावे लागतील, या भयानें मी तें लागोपाठ ५–७ दिवस बसून लिहून काढितों. नाटक जरी याप्रमाणें लवकर लिहून काढिलें तरी त्याची पूर्वतयारी मला कमी करावी लागते असें मात्र नाहीं. कारण त्याचें संविधानक व पात्रांचे स्वभाव माझ्या डोक्यांत एक-एक दोन-दोन वर्षें घोळत असतात; व नाटक लिहिण्यास सुरवात करण्यापूर्वी एक-एक दोन-दोन महिने माझें डोकें त्याच्या विचारांत सारखें भ्रमत राहतें. त्या विचारामुळें त्यास ज्या तिडका लागतात, त्या नाटक पूर्ण झाल्यावरच

थांबतात. विनोदी किंवा इतर लघुलेखांचीं टिपणें मी कधीं-कधीं केलीं आहेत. पण नाटक लिहिण्याच्या आधल्या दिवशीं मी त्यांतील अंकांची व प्रवेशांची जी आंखणी करितों तिच्याशिवाय त्याचें दुसरें कोणतेंहि टिपण करीत नसतों. नाटकांतील कोट्यांचें टांचण मी करीत असलों पाहिजे असा गडकऱ्यांना संशय असून तो त्यांनीं मजपाशीं व्यक्तहि केला होता. परंतु तो अगदीं निराधार आहे याबद्दल मी नाटक लिहितेवेळीं मजजवळ असलेला कोणीहि इसम सांगूं शकेल. माझ्या नाटकांतील कोटया प्रवेशाच्या ओघांत स्वाभाविकपणें येतात हाहि त्या गोष्टीचा एक अंतर्गत पुरावाच आहे.

माझ्या स्वभावांतील इतरहि कांहीं विशेष येथें नमूद करणें वावगें होणार नाहीं. मी अत्यंत शांतताप्रिय आहें. यामुळें इतरांशीं वांकडें होणें मला कधींच आवडत नाहीं. तथापि मनःस्वास्थ्याकरितां स्वाभिमान दवडणें मजकडून कधींहि होणार नाहीं. आगगाडीच्या डब्यांत बसण्या-संबंधानें माझे सोजर किंवा किरिस्तांव लोकांशीं व इतरांशींहि अनेकदां तंटे झाले आहेत. एकदां मी दुसऱ्या वर्गाच्या डब्यांत चढत असतां आंत दोन सोजर बसले होते. त्यांपैकीं एकजण दांत-ओठ खात व मुठी वळत माझ्या अंगावर धांवून आला. त्यास एकीकडे सारून मला मार्ग काढावा लागला. दुसऱ्या एके वेळीं जवळ जवळ बसलेल्या दोन तरवार-बहाद्दर मुसलमान शिपायांमध्यें हट्टानें बसावें लागलें. दुसऱ्यास त्रास किंवा तसदी देणें हें माझ्या नेहमीं जीवावर येतें. तें टाळण्याकरितां स्वतःस कितीहि त्रास पडला तरी तो सोसण्यास माझी तयारी असते. उलट दुसऱ्यानें मला विनाकारण त्रास दिल्यास त्याची मनापासून चीड येते. मी अत्यंत शांत प्रकृतीचा असून मला कधीं राग येत नाहीं असा मजबद्दल लोकांचा सामान्य ग्रह आहे. पण तो अगदीं चुकीचा आहे. मला राग आला म्हणजे माझें हृदय जोरानें उडावयास लागून रक्त उसळूं लागतें, व शिरा ताड ताड उडूं लागतात. तथापि रागांत मी कधींहि त्रागा करून स्वतःच्या जीवास त्रास करून घेत नाहीं, किंवा कोपाविषयाशिवाय इतरांशीं कठोर वर्तन करीत नाही. मी आपण होऊन सहसा कोणाचा अपमान करीत नाहीं. असें असतां दुसरा माझ्या वाटेस गेल्यास त्याचें उलटें फेडल्यावांचून राहात नाहीं. तथापि प्रतिकाराचा हा विचार क्षणिक असतो. सूड उगविण्याची बुद्धि माझ्या मनांत कधींहि दीर्घकालपर्यंत ठाणें देऊन बसत नाहीं.

मी प्रेमाचा अत्यंत भुकेला आहे. इतरांनीं आपणांवर प्रेम करावें ही इच्छा माझ्या मनांत नेहमीं जागृत असते. मृत्यूमुळें किंवा गैरसमजामुळें माझे अनेक मित्र जरी नाहीसे झाले आहेत तरी प्रतिवर्षीं मी नवे नवे मित्र जोडीतच असतों. माझें नोकरांशीं सुद्धां वर्तन प्रेमळपणाचें असावेंसें वाटतें. त्यांस मी बहुधा एकेरी नांवानें हांक मारीत नाहीं. नोकरास ममतेनें वागविणें हा त्याच्या पगाराचाच भाग मी समजतों. नोकरास काढून टाकते वेळीं तर मी त्याशी फारच प्रेमानें वागतों. त्या समयीं त्याजवर आपणा-संबंधानें जो ग्रह होईल तोच अखेरपर्यंत टिकावयाचा हें अशा वेळी माझ्या पूर्णपणें लक्षांत असतें. पुष्कळदां इतरांबद्दल माझें मन बिघडूनहि मी त्यांच्याशी नेहमीपेक्षांहि अधिक चांगला वागलों आहें. मजकडे येणाऱ्या याचकांस बहुधा मी रिक्त हस्तानें परत करीत नाहीं. एखाद्याची मजपासून विशेष प्राप्तीची अपेक्षा असून माझी इच्छा ती अपेक्षा पूर्ण करण्याची नसली तर मी त्यास इतर याचकांपेक्षां अधिक सन्मानपूर्वक वागवितों, व याप्रमाणें त्याचा झालेला हिरमोड नाहीसा करितों. माझें मन फारच कोवळें आहे. पुष्कळदां कादंबऱ्या किंवा काव्यें वाचतांना माझ्या डोळ्यांस पाण्याच्या धारा लागतात. नाटकांतील हृदयद्रावक प्रसंग पाहतांना किंवा स्वतःच्या नाटकांतील, कथेंतील किंवा कवितेंतील करुण भाग लिहितांनाहि टिपें आवरेनाशीं होऊन ती वारंवार पुसावीं लागतात. आमचे वडील जसे प्रेमळ असत तसे कोपिष्टहि असत. त्यांनीं आम्हां मुलांस बऱ्याच कठोरतेनें वागविलें, यामुळें आम्ही गरीब, संकोची व भित्र्या स्वभावाचे झालों असा माझा समज आहे. यामुळें स्वतःच्या मुलांच्या बाबतींत ती चूक होऊं नये म्हणून मी फार जपतों. मी त्यांच्याशी अत्यंत प्रेमळपणानें वागतों, व तीं मोठीं झाल्यावर त्यांच्याशीं बरोबरीच्या नात्यानें वागण्यासहि माघार घेत नाहीं. आमच्या वडिलांच्या कडक शिस्तीमुळें आम्ही बरे निघालों. माझ्या ढिलेपणामुळें मुलें उच्छृंखल व उनाड निघतील कीं काय अशी भीति वाटते. परंतु तीं बहुधा सुवृत्तच निघावींत असा भरंवसाहि वाटतो. तो पक्षपाताचा असण्याचाहि संभव आहे.

मला कर्जाचा अतोनात तिटकारा आहे. एका दिवसाची उधारीहि मला खपत नाहीं. जमाखर्चाच्या वह्या रोजच्या रोज तपासून पाहण्यांत मी कधीहि आळस केला नाही. अलीकडे मला जें कर्ज करावें लागलें तें केवळ नाइलाज म्हणून करावें लागलें, व एक दोन वर्षात तें फेडण्याचा विचार

आहे. या माझ्या दक्षतेवरून माझ्या अंगी काटकसर असल्याबद्दल जर कोणी अनुमान काढिलें, तर तें चुकीचें होईल. घरांत पाहुण्यांची गर्दी झाल्यास माझ्या नित्य व्यवसायांत व्यत्यय येतो व पाहुणे आवडीचे नसल्यास त्यांपासून त्रासहि होतो; यामुळें पाहुणचाराबद्दल मला कधींहि विशेष आवड नाही. तथापि घरीं जो पाहुणा येईल त्यास शक्य तितक्या आदरानें वागविण्याची मी नेहमीं खबरदारी घेत आलों आहें.

मी घर बांधीन, शेती विकत घेईन अशी मला वकिली सुरू करितांना व त्यानंतरहि बरींच वर्षें आशा नव्हती. पण ती आशा अंकुरित होते न होते तोंच सफलहि झाली आहे. 'किर्लोस्कर मंडळी'कडून आपलीं नाटकें व्हावींत व 'विविधज्ञानविस्तारां'त आपले लेख प्रसिद्ध व्हावेत या विद्यार्थिदशेंतल्या दोन इच्छा ती दशा संपण्यापूर्वीच पूर्ण झाल्या. संसारांत व वाङ्मयांत मला जें यश आलें आहे तें माझ्या योग्यतेपलीकडचें आहे अशी माझी प्रामाणिक समजूत आहे. संसारांत मधून मधून ज्या अनेक अडचणी येतात त्या अल्प कालांतच आपोआप दूर व्हाव्या असा माझ्या प्रारब्धाचा योग आहे. वाङ्मयप्रांतांत मी जीं कामें वेळोवेळीं अंगावर घेतलीं तीं माझ्या मगदुराबाहेर असतांहि यशस्वी रीतीनें पार पाडण्यास देवानें मला सामर्थ्य दिलें. सुखोपभोग, ज्ञानलालसातृप्ति, भावनामूलक आनंद इत्यादि गोष्टींतहि कुरकुर करावयास मला यत्किंचित् जागा नाही. मी शरीरानें जरी उतार वयाचा असलों तरी माझ्या भावना, कल्पना व आशा तारुण्यांतल्या इतक्या किंबहुना बालपणांतल्या इतक्याहि तीव्र आहेत. कांहीं दिवसांपूर्वीं एका अनोळखी कुणब्यानें मला "बुड्ढेबोवा" म्हणून हांक मारिली तेव्हां मी एकदम दचकलों. ह्या कालपर्यंत माझें आयुष्य ज्या प्रकारें गेलें त्याच प्रकारें भावी आयुष्य गेल्यास माझी अत्यंत सुखी माणसांत गणना करावी लागेल. यापुढें माझ्या दैवी दुःख व हालअपेष्टा जरी लिहिल्या असल्या तरी प्रत्येक गोष्ट आपल्या बऱ्या करितांच असते असा दीर्घ अनुभवानें दृढविश्वास उत्पन्न झालेला असल्यामुळें त्यांसहि मी सादर होईन असा भरंवसा वाटतो.

मला आजपर्यंत शिवाजी महाराज व महादेव गोविंद रानडे या दोन व्यक्तींबद्दल अमर्याद आदरभाव वाटत आलेला आहे. पूर्वोक्त व्यक्तीवर माझें शेवटचें नाटक, व उत्तरोक्त व्यक्तीमध्यें राजकीय व सामाजिक सुधारणांचें जें एकीकरण झालेलें होतें त्यावर माझी पहिली व शेवटची कादंबरी लिहून

नंतर विश्रांति घेण्याचा विचार आहे. या दोन गोष्टी मला साध्य आहेत का व असल्या तरी मजकडून सिद्ध होतील का याची शंका वाटते. सिद्ध झाल्या तर मी आपले सुदैव समजेन. नच झाल्या तर त्या दोन विभूतींच्या सद्गुणांचें मजकडून जन्मभर चिंतन होईल, हाहि लाभ मी अल्प समजणार नाहीं.

ईश्वरानें दिलेल्या सामर्थ्याचा व कालाचा काटकसरीनें उपयोग करणें हाच धर्म आहे, व तो मी यथाशक्ति पाळीत आलों आहें. ईश्वराच्या चिंतनांत मी आजपर्यंत फारसा वेळ घालविला नाहीं. बाह्य किंवा आंतर असे अनेक चमत्कार आपल्या चर्मचक्षूंपुढून किंवा मनश्चक्षूंपुढून जात असतां ईश्वरी शक्तीचें जें अनायासें चिंतन होतें त्यापेक्षां निराळेंच चिंतन करण्याची मला आजपर्यंत कधींहि जरूर भासली नाहीं, व त्याकरितां दयाळू परमेश्वर मला निर्वाणीच्या वेळी कधींहि अंतर देणार नाहीं अशी खात्री आहे.

तथास्तु

# कोल्हटकरांचीं पत्रें

**रा. रा. न. चिं. केळकर** यांस—

१

सा. न. वि. वि.

बार्शी येथें माझ्या नव्या नाटकाचें गद्य मात्र लिहिलें होतें. येथें आल्यापासून ६३ पदें लिहिली आहेत. जवळच्या चाली संपल्यामुळें पदरचना तूर्त तहकूब ठेवावी लागली आहे. रा. जोगळेकरांनीं आणखी चाली देण्याचें कबूल केले आहे. त्याप्रमाणें न दिल्यास जुन्या चाली व साक्या दिंड्यांच्या पलटणीनें ती खिंड भरून टाकावी लागणार आहे ! माझी पदें मागील नाटकांतल्या पदांपेक्षां सोपी झालीं आहेत असें वाटतें. पण तो ज्ञानप्रकाशांतील टीकेचा परिणाम नसून कालाचा आहे. माझी पूर्वींची नाटकें ही उत्तरोत्तर सोपींच होत आलीं आहेत. यावरून त्या टीकेबद्दल मला वैषम्य वाटत आहे असें समजूं नये. विरुद्ध टीकांविषयी मी हल्लीं इतका उदासीन झालों आहे की, ज्ञानप्रकाशांतील टीकेचें आपणांप्रमाणे मलाहि कौतुक वाटत आहे. शिवाय हास्यरस मला इतका आवडता आहे कीं, कधीं कधीं त्याचा जनक तर कधी कधीं त्याचा विषय होण्यासहि माझी तयारी असते ! क. लो. वि.

आपला

**श्री. कृ. कोल्हटकर**

खामगांव,

२

ता. २७–१–१९१३

सा. न. वि. वि.

तुमच्या पत्राकरितां मी कांहीं लेख पाठवावे असें तुम्हीं वारंवार लिहिलें. पण त्याविषयीं मजकडून कांहीच घडलें नाहीं हें कबूल करण्याला मला लाज वाटते. कारण तुम्ही मजकरितां इतकें पुष्कळ लिहिलें व केलें आहे. माझे

टीकापर लेख ' विविधज्ञानविस्तारा 'कडे जातात आणि विनोदी लेख ' मासिक मनोरंजना 'कडे जातात. शिवाय दिवसेंदिवस मी जड बुद्धीचा होत चाललों आहे. म्हणून केसरीला कांही लिहून पाठवूं शकत नाहीं. तथापि तुमची नाटकें वाचून त्यावर टीका व सूचना करणें हें मात्र मी करूं शकेन. क. लो. अ. वि.

आपला

**श्री. कृ. कोल्हटकर**

जळगांव,

३

ता. ४–१–१९२२

सा. न. वि. वि.

आपलें बडोदा येथील भाषण आपल्या इतर लेखांप्रमाणेच सुंदर व मार्मिक उतरलें आहे, हें कळविण्यास संतोष वाटतो. तें अत्यंत व्यापक दृष्टीने लिहिलेले दिसतें. या कारणामुळेंच.त्यांत क्वचित् विसंगतपणाचा भास होतो. उदाहरणार्थ, आपण हल्लीच्या काळास प्रथम गीतारहस्याचे युग म्हणून नंतर केशवसुतांचें युग म्हटलें आहे. आपली विधानें अनुक्रमे गद्य व पद्य वाङ्मया-संबंधानें आहेत ही गोष्ट स्पष्ट केली असती तर विरोधाचा परिहार झाला असता. गद्य वाङ्मयासंबंधानें हल्लीच्या काळास गीतारहस्यकाळ म्हणणें कितपत योग्य होईल याबद्दल दोन मतें होण्याचा संभव आहे. माझ्या मतें अजून विष्णुशास्त्री चिपळूणकरांचेंच युग चालले आहे. दुसरा विरोध भाषांतरासंबंधानें केलेल्या विधानांत दिसून आला. एके ठिकाणी आपण भाषांतराचा निर्देश आदरबुद्धीनें केला असून, दुसऱ्या ठिकाणीं अनादरबुद्धीनें केला आहे.

नवे व जुने कवि यांची आपण घातलेली सांगड सकृद्दर्शनी अत्युक्तिरूप वाटली तरी पूर्ण विचारांती तशी वाटत नाहीं. जुन्या कवींत फारशी कल्पकता दिसून येत नाही. संख्येच्या दृष्टीनें त्यांची कविता हल्लींच्या कवितेच्या किती तरी पट आहे. पण गुणांत हल्लीची कांहीं कविता तिची बरोबरी करूं शकेल. आपल्या भाषणांत कवितेला अवास्तव महत्व दिलेलें दिसतें. तत्संबंधी भागाची भाषाहि आपल्या स्वतःच्या भाषेसारखी गोंडस व खुबीदार नाही. लो. टिळक यांस सिंहिणीच्या मुलाची उपमा देतांना इतर लेखकांबद्दल व विशेषतः मृत लेखकांबद्दल कांहीसा अनादर प्रकट झाल्यासारखा वाटतो.

आजपर्यंतच्या अध्यक्षांच्या भाषणांत आपलें भाषण बरेंच वर येईल यांत शंका वाटत नाही. तें पहिल्या प्रतीचें तर आहेच. पक्षपात दिसण्याचा संभव नसता तर मी त्यास पहिलेंच म्हटलें असते. आपल्या मागें इतकीं कामें असतां आपण

इतकें सुंदर व व्यापक भाषण तयार केलें ही गोष्ट आपणांस निःसंशय अभिमानास्पद आहे. आपण ज्या कांही ग्रंथकरांचीं नांवें वगळलीं आहेत त्यांच्या पोटांत त्यानें शूळ उठल्यास नवल नाहीं. माझ्या नांवाचा अनेकदां गौरवपूर्वक निर्देश केल्याबद्दल मी आपला अत्यंत ऋणी आहे. क लो. अ. वि

आपला

**श्री. कृ. कोल्हटकर**

[ कोल्हटकरांनीं केळकरांना लिहिलेलीं ही पत्रें 'केळकरांचा पत्रव्यवहार–गतगोष्टीची पुरवणी' या पुस्तकांत प्रसिद्ध झालीं असून तीं १२८, २०० व ३८३ या क्रमांकाचीं आहेत. ]



जळगांव, वऱ्हाड
ता. १७–१–२५

**रा. रा. ह. वि. मोटे**, उमरावती, यांस—

सा. न. वि. वि.

आपण सुचविलेली कल्पना मी यापूर्वींच अंमलांत आणिली आहे. सन १९१८ सालीं मला प्रो. कर्व्यांच्या महिला विद्यापीठांतील अध्यापक प्रो. मायदेव यांचें एक पत्र आलें. त्या पीठाच्या अभ्यासक्रमांत 'अभिनव काव्य माले'चा १ ला भाग नेमिला असून त्यांत माझ्या चार कविता प्रसिद्ध झाल्या आहेत. कवीच्या कवितांचे स्वारस्य कळण्याकरितां त्यांच्या चरित्रांशीं परिचय असणें जरूर आहे अशी प्रस्तावना करून प्रोफेसर मजकुरांनी मला स्वतःचें चरित्र लिहून पाठविण्याची त्या पत्रांत विनंति केली होती. चरित्र अर्थातच संक्षेपानेंच पाठवावयाचें होतें. मी आत्मचरित्र लिहिण्यास आरंभ केला, व बाळपणींचा वृत्तांत थोडक्यांत आटपूनहि टाकिला. पण तारुण्यांतील वृत्तांत लिहूं लागलों तसतसा मजकुराचा विस्तार वाढावयास लागून अलीकडील हकीगती तर फारच विस्तृत स्वरूपांत कागदांवर उतरल्या. याप्रमाणें जें आत्मचरित्र एका कागदाच्या मर्यादेंत समाविष्ट करण्याचा विचार होता त्याचें अखेरीस १००–१२५ पृष्टांचें एक लहानसें पुस्तकच झालें. त्यांत लिहिलेल्या गोष्टींचा संबंध विशेषेंकरून माझ्या ग्रंथकर्तृत्वाशींच आहे. खाजगी बाबीपैकीं ज्यांचा संबंध त्यांच्याशीं पोंचतो त्याच त्यांत नमूद केल्या आहेत. शिवाय माझ्या मूळ उद्देशांत नकळत बदल होत गेल्यामुळें त्या पुस्तकांत प्रमाणशीरपणा नाहीं. हे

दोष असतांहि हें पुस्तक अत्यंत मनोरंजक झालें आहे असा तें ज्या थोड्या व्यक्तीना मी आजपर्यंत दाखविलें आहे त्यांचा अभिप्राय आहे. त्या व्यक्तींची संख्या ४–५ हून अधिक नाही.

हें आत्मचरित्र शक्य तितकें परिपूर्ण करण्याबद्दल मला सूचना आल्या आहेत, व माझ्या हातचें प्रकाशनाचें काम संपल्यावर त्या सूचना अंमलांत आणण्याचा विचार आहे.

माझ्या आत्मचरित्राचें प्रकाशन माझ्या हयातीत शक्य नाहीं हें कळल्या-वर तें करण्याची इच्छा आपण करणार नाही अशी आशा आहे. क. लो. अ. हे. वि.

आपला

**श्री. कृ. कोल्हटकर**

[ कोल्हटकराचें 'आत्मवृत्ता'विषयीचें हे पत्र पंचेचाळीस वर्षांपूर्वी लिहि-लेले असून तें श्री. ह. वि. मोटे यांनीं आपल्या 'प्रकाशन प्रतिभा' या ग्रंथांत १९६० सालीं प्रथम प्रसिद्ध केलें. त्यानंतर ते नागपूरच्या 'युगवाणी' मासि-काच्या ऑगस्ट १९७० या अंकांत आलें. या पत्राचा विषय असलेल्या कोल्हट-करांच्या आत्मवृत्ताचे प्रकाशन, त्यांच्या मृत्यूनंतर १९३५ साली मोटे यांच्याकडे आलें. तें त्यांनी प्रथम क्रमशः 'प्रतिभे'तून प्रसिद्ध केलें व नंतर १९३५ साली ता. १ जून रोजी पुस्तकरूपानें प्रसिद्ध केलें. ]



वऱ्हाड, जळगांव

ता. १६–२–२२

**रा. रा. वि. स. खांडेकर** यांस—

१

सा. न. वि. वि.

आपलें ता. ११–२–२२ चें पत्र योग्य वेळी मिळालें. 'अरविंद' ऑफिसांतून डिसेंबरचा अंकहि मिळाला. त्यांतील 'गाण्याचें गाणें' हा लेख वाचिला. मला त्यांत जे दोष असावेसे वाटतात तें येणेंप्रमाणें :—

१. अनुप्रास पद्यांत शोभतात, गद्यांत बरे दिसत नाहीत. शिवाय अनुप्रासांच्या हौसेनें अनेकदां निरुपयोगी विशेषणें घालण्याचा मोह अनावर होतो. अनुप्रासांमुळें भाषेत कृत्रिमता व काठिण्य येते. आपल्या गद्य भाषेंत

कै. गडकऱ्यांच्या भाषेंतल्याप्रमाणें अनुप्रासांची गर्दी असते. रा. माडखोलकरांच्या भाषेंतहि प्रथम बरेच अनुप्रास असत. हल्लीं मुळींच दिसत नाहींत.

२. विनायकाची कविता अत्यंत साध्या भाषेंत असून आपण केलेलें तिचें स्पष्टीकरण बऱ्याच कृत्रिम, कठिण व घोटाळ्याच्या भाषेंत आहे.

३. आपल्या लेखांतील कोणते विचार आपले व कोणते विनायकाचे हें कळत नाही. पुष्कळ कल्पना आपल्या असतां त्यांचें श्रेय विनायकाकडे जाते.

मी दाखविलेले दोष केवळ आपल्या इच्छेवरून सद्‌बुद्धीनें दाखविले आहेत. त्यांतील कांहीं माझ्या गैरसमजामुळेंहि मला दोषरूप वाटले असण्याचाहि संभव आहे. सबब त्यांचा राग नसावा.

नवयुगाच्या अंकांतील आपला विनोदी लेख व कविता लवकरच वाचीन. हल्ली माझ्यामागें कोर्टाच्या व इतर कामांचा इतका लकडा आहे कीं मला आवंढा गिळावयाचीहि सवड नाही असे म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं. लेख व कविता वाचल्याबरोबर मत कळवितों. क. लो. अ. हे वि.

आपला

**श्री. कृ. कोल्हटकर**

[ १. ‘ गाण्याचें गाणे ’ हा लेख म्हणजे कवि विनायक यांच्या त्या वेळीं प्रसिद्ध झालेल्या ‘ विनायकाची कविता ’ या पुस्तकाचें परीक्षण होय. हा लेख ‘ अरविंद ’ मासिकांतून प्रसिद्ध झाला. पुढें डॉक्टर झालेले पण त्यावेळी विद्यार्थीदशेत असलेलें डॉ. अ. ना. भालेराव यांनी हौसेनें हे मासिक सुरू केलें होतें.

२. नवयुग हें त्या काळच्या प्रमुख मासिकांपैकीं एक मासिक. मासिक मनोरंजननें एके काळी मिळविलेल्या कीर्तिप्रमाणें नवयुग मासिकालाहि थोडीफार कीर्तिहि मिळाली होती. पण हें मासिक अल्पायुषी ठरलें. ]

जळगांव, वऱ्हाड

## २

ता. ७–१०–२३

सा. न. वि. वि.

आपलें ता. २६–९–२३ चें कार्ड मला ता. ३०–९–२३ रोजीं मिळाले. ‘ गीतोपायना ’वरील आपली टीका ‘ मनोरंजनां ’त येणार असून ‘ सुदाम्याचे पोह्या ’वरहि आपण विस्तृत टीका लिहिणार असल्याचे वाचून समाधान वाटले. ‘ विविध-ज्ञान-विस्तार ’ हेच सुदाम्याचें उगमस्थान असल्या-मुळेंच बहुधा त्यांतील अभिप्राय त्रोटक असावा.

'साहित्या'च्या ऑगस्टच्या अंकांत रा. रा. माडखोलकरांच्या चिपळूण-करावरील निबंधाचें आपलें परीक्षण असेल या आशेनें तो चाळून पाहिला. पण परीक्षण आढळलें नाहीं. कार्यबाहुल्यामुळें तो अंक वाचावयास सवड न मिळाल्याकारणानें आजपर्यन्त तो टेबलावर तसाच पडून होता. आज तो वाचावयास हातीं घेतला असतां त्यांत आपली गोष्ट ('घर कोणाचें?') असल्याचें दिसून आलें. म्हणून ती वाचावयास लागलों व ती अत्यंत चित्त-वेधक वाटल्यामुळें लौकरच वाचून संपविली. मला ती फार आवडली हें कळविण्यास संतोष वाटतो. अव्वलपासून अखेरपर्यंत भरून राहिलेला शोकरस मधूनमधून दृग्गोचर होणाऱ्या हास्य-तुषारांमुळें फारच खुलून दिसतो. मेघ-समुद्रांतील विजेस जलमाशाची उपमा अत्यंत समर्पक वाटली. दुसऱ्याहि चांगल्या उपमा व कल्पना आल्या आहेत. सरस्वती व लक्ष्मीबाई यांच्या आरंभींच्या संभाषणांत कांहीं शाब्दिक कोट्या आल्या आहेत. त्या नसत्या तर बरें झालें असतें. सरस्वतीचा नवरा जिवंत होता कीं मरण पावला होता याबद्दलची वाचकाची जिज्ञासा अतृप्त राहून असमाधान उत्पन्न होतें. २०० रुपयांचें बिन-नोंदलेलें खरेदीखत कायदेशीर कसें झालें व तें नोंदून घेण्यापूर्वींच पंतानीं सावित्रीस हाकून कसें दिलें या शंका शिल्लक राहतात हीं वैगुण्यें असतांहि गोष्ट अत्यंत परिणामकारक झाली आहे यांत शंका नाही. यशवंत मंडळीचें पत्र नाहीं. क. लो. अ. हे. वि.

आपला

**श्री. कृ. कोल्हटकर**

[ १. 'गीतोपायन' हा कोल्हटकरांच्या कवितांचा छोटा संग्रह.

२. 'साहित्य' म्हणजे महाराष्ट्र साहित्य हें मासिक. त्या वेळचे एक प्रसिद्ध कवि वीरकूड यांच्या संपादकत्वाखालीं तें निघत असे. १९२०-२५ च्या सुमारास उदय पावलेल्या अनेक तरुण लेखकांचें साहित्य त्यांत प्रकाशित होई. हें मासिकहि अल्पायुषी झाले.

३. 'घर कोणाचें?' ही माझी पहिली प्रकाशित गोष्ट. ती मी १९१९ सालीं लिहिली. गोष्ट कशी काय वठली असेल याची शंका असल्यामुळें मी ती कुठल्याहि मासिकाकडे पाठविली नव्हती. १९२३ ला महाराष्ट्र साहित्याला देण्यासारखें दुसरें कुठलेंच लेखन संग्रही नसल्यामुळें मी ती भीत भीत श्री. वीरकुडांच्याकडे पाठविली. या गोष्टीमुळेंच मी कथालेखनाकडे वळलों.

४. पत्राच्या शेवटी अनवधानानें सरस्वतीच्याऐवजी सावित्री हें नांव पडलें आहे. ]

पुणें,

३ ता. ६-६-२९

सा. न. वि. वि.

आपलें कार्ड योग्य वेळीं मिळालें. मजकूर समजला.

आपली प्रकृति आतां पूर्णपणें बरी झाली असेल अशी आशा आहे.

रा. रा. न. चिं. केळकर २-३ दिवसांपूर्वी मला भेटण्यास आले होते. मी त्यांना परतभेट देण्यास आज गेलों होतों.

आपली एक फार सुंदर गोष्ट 'यशवंत 'च्या गेल्या अंकांत आली आहे असें माझे नवीन परिचयाचे स्नेही रा. रा. बेडेकर (हे नुक्ते बी. ए. झाले) सांगत होते. गोष्टीच्या कथानकांत आत्मचरित्राचा कांहीं भाग असावासें वाटतें.

'श्रमसाफल्य' नाटक 'यशवंत' मासिकांत छापावयास दिलें आहे. क. लो. अ. हे वि.

आपला

**श्री. कृ. कोल्हटकर**

[ १. या पत्रांत ज्या गोष्टीचा उल्लेख आला आहे तिचें नांव 'कवडा पीर'.
२. रा. रा. बेडेकर म्हणजे श्री. विश्राम बेडेकर. ]

खामगांव

४ ता. ८-११-२९

सा. न. वि. वि.

माझें नवें नाटक 'मायाविवाह' आपल्याकडे आठदहा दिवसांत रजिस्टर्ड पोस्टानें पाठवून देतों. काळजीपूर्वक वाचून त्यांत कोणते भाग गाळण्या-सारखे आहेत तें कळवावें. माझ्या मतें माझ्या सर्व नाटकांत तें अत्यंत चटकदार (Sensational) झालें आहे. त्यांत स्वगत भाषणें नाहींत. संगीतासारखे अस्वाभाविक प्रकार त्यांत खपणार नाहींत. हल्लींच्या स्त्रीस्वातंत्र्याच्या काळांत स्त्रियांवर बलात्काराचे, फसवणुकीचे प्रसंग येणें अपरिहार्य आहे. त्यामुळे त्यांस धोक्याची सूचना मिळणेंहि आवश्यक आहे. या नाटकाचा विषय कितीहि अप्रिय असला तरी तो नाटकरूपानें लोकांपुढें येणें जरूर होतें. तथापि मृत्युपत्र,

बलात्कार, नोंदणी कायद्यान्वयें विवाह इत्यादि आर्य संस्कृतीस परकीय वाटणारे प्रकार या नाटकांत असल्यामुळें व प्रतिनायक फारच दुष्ट दाखविला गेल्यामुळें नाटक लोकप्रिय होण्याचा फारसा संभव नाही. तथापि, तें कलेच्या दृष्टीनें चांगलें ठरल्यास माझे श्रम सफल झाल्यासारखे होतील. क. लो. वि.

आपला

**श्री. कृ. कोल्हटकर**

[ डॉ. द. रा. गोमकाळे यांच्या 'नाटककार कोल्हटकर' या पुस्तकाला लिहिलेल्या प्रस्तावनेंत हें पत्र प्रसिद्ध झालें आहे. ]

जळगांव, वऱ्हाड

५

ता. २५-२-३०

सा. न. वि. वि.

आपलें ता. १८-२-३० चें कार्ड काल रोजी मिळाले.

येणारी पत्रे सावकाश वाचण्याइतकी माझ्या दृष्टीची प्रगति झाली आहे हें वाचून आपणांस आनंद वाटेल.

साहित्यविषयक पुस्तकें मला 'विदर्भवीणे'ची प्रस्तावना लिहिण्याकरितां पाहिजे होतीं. पण त्यांच्या साहाय्यावांचूनच ती लिहिण्याचें मी ठरविलें आहे. तिच्यांत एक अगदीं नवीन सिद्धान्त मांडावयाचा आहे. त्याची मांडणी माझ्या मनासारखी झाल्यास प्रस्तावना बरीच चांगली वठेल असे वाटतें. ती निःसत्त्व व अगदीं त्रोटक होईल कीं काय अशी मला भीति वाटत होती. ती आतां नष्ट झाली आहे.

मी संमेलनास आलों तर त्या भागांत शक्य तितके दिवस घालविण्याचा संकल्प आहे. मला अलीकडे मधूनमधून निद्रानाशाचा विकार होतो. त्यामुळें Blood pressure वाढण्याचा संभव असतो. मे महिन्याच्या आरंभीं तो विकार नसल्यास मी निश्चितपणें येईन. मडगांव येथें झोपण्याकरितां लहानशी का होईना, पण स्वतंत्र जागा मिळाल्यास तेथें त्या विकाराची फारशी भीति राहणार नाहीं.

जूनच्या पहिल्या आठवड्यांत नाशिक येथें नाट्यविषयक चर्चामंडळाचे ( Round Table Conference ) अधिवेशन आहे. त्याकरितां मात्र मला परत यावें लागेल. तोंपर्यंत मी तिकडेच राहीन. क. लो. अ. हे वि.

आपला

**श्री. कृ. कोल्हटकर**

ता. क.—आपण इतर व्यवसायांच्या धांदलींत 'आगरकरां 'चें चरित्र संपविलें हें वाचून समाधान वाटलें.

**श्री. कृ. कोल्हटकर**

[ १. विदर्भवीणा ' हा विदर्भांतील कवींचा प्रातिनिधिक संग्रह. त्याला कोल्हटकरांनी लिहिलेली प्रस्तावना ' कोल्हटकर लेख-संग्रह ' या ग्रंथांत पृ. ८२७ पासून ८३८ अखेर आली आहे.

२. ज्या नवीन सिद्धान्ताचा कोल्हटकरांनीं या पत्रांत उल्लेख केला आहे त्याची मांडणी त्यांनीं पृ. ८३१ पासून पुढें केली आहे.

३. या पत्रांत उल्लेखिलेले संमेलन म्हणजे १९३० सालीं मडगांव येथें वामन मल्हार जोशी यांच्या अध्यक्षतेखाली भरलेलें महाराष्ट्र साहित्य संमेलन. वामनराव कोल्हटकरांना फार मानीत असत. या संमेलनाला उपस्थित असलेल्या लोकांना कोल्हटकरांनीं स्वतः म्हटलेलें महाराष्ट्र गीत ऐकण्याची संधि मिळाली. प्रकृतिस्वास्थ्यासाठीं त्यांची राहण्याची सोय एका खासगी घरात स्वतंत्र जागेंत केली होती. मूळचे शिरोड्याचे पण मडगांव येथें शिक्षक असलेले श्री. जयराम भिकार्जा राऊत या माझ्या स्नेह्यांना मी या बाबतीत लिहिलें होतें आणि त्यांनी आपल्या एका स्नेह्यांच्या घरी कोल्हटकरांची स्वतंत्र व्यवस्था केली होती. या संमेलनानंतर कोल्हटकर सावंतवाडी शिरोडे येथें थोडे दिवस राहून परतले. ]

जळगांव, वऱ्हाड
ता. २६–६–३०

६

सा. न. वि. वि.

आपलें ता. १७–६–३० चें कार्ड योग्य वेळीं मिळालें. आपण जुलई महिन्यांत इकडे येण्याचा विशेष संभव नाहीं हें वाचून वाईट वाटलें. या महिना-अखेर काय निश्चित ठरतें तें ताबडतोब कळवावें.

माझे बंधु बदरीनारायण व काश्मीर येथील प्रवास आटपून नागपुरास परत आले आहेत.

सौ. वतीची प्रकृति उत्तरोत्तर सुधारत असल्याचें कळलें. आपण इकडे आलांत तर तोंपर्यंत प्रकृति पूर्ववत् झाली असेल.

चि. बापू यंदा सेकंड एल्एल्. बी. परीक्षेच्या तीन पेपरांना बसला होता, पण नापास झाला.

'जन्मरहस्य' नाटकांत जे तीन चार विनोदी प्रवेश लिहावयाचे आहेत त्यांचा विचार चालू आहे. पण ते बरेच जड जातील असें दिसतें.

पुढील सहा महिने धंद्याच्या दृष्टीनें फार वाईट जाणार अशीं चिन्हें दिसत आहेत. इकडील सावकार लोकहि डबघाईला आले आहेत. मग शेतकऱ्यांची स्थिति विचारावयासच नको. ते सावकारांविरुद्ध संप व सत्याग्रह करीत आहेत. पावसाचींहि चिन्हें दिसत नाहीत. असें वर्ष आजपर्यंत कधींच आलें नव्हतें. क. लो. अ. हे वि.

आपला

**श्री. कृ. कोल्हटकर**

ता. क. 'माहेरची भुते' ही आपली गोष्ट चांगली साधली आहे.

**श्री. कृ. कोल्हटकर**

[ १. या पत्रांत उल्लेखिलेले बंधु दिगंबर कृष्ण कोल्हटकर हे होत.

२. बापू म्हणजे 'संजीवनी' या पाक्षिकाचे संपादक व त्या काळच्या ललित लेखकांत वैशिष्ट्यपूर्ण लेखन करणारे कोल्हटकरांचे द्वितीय चिरंजीव प्रभाकर श्रीपाद कोल्हटकर हे होत.

३. 'माहेरचीं भुतें' ही माझी गोष्ट यशवंत मासिकांत आली होती. ]



जळगांव, जि. बुलढाणा, वऱ्हाड
ता. २०–६–२०

**रा. रा. ग. त्र्यं. माडखोलकर** यांस—

१

प्रेमपूर्वक सांष्टाग नमस्कार, विनंति विशेष.

आपण भेटीदाखल पाठविलेलें पुस्तक पोहोंचल्याबद्दलचें माझें कार्ड पोचलें असेलच. आपलें ता. १६-६-२० चें प्रेमळ पत्र काल संध्याकाळी हाती आलें...मी प्रेमाचा पूर्वीपासूनच भुकेला आहे. गेल्या दोन वर्षांत माझे कांही स्नेही विनाकारण गैरसमज उत्पन्न झाल्यामुळें मला अंतरले. तेव्हांपासून नवीन स्नेही जोडण्याची मला तळमळच लागून राहिलेली होती, असें म्हणण्यास हरकत नाहीं. माझ्या वयाच्या मनुष्याचे अनेक स्नेही मृत्युमुखीं पडत असल्यामुळें हृदयांत ज्या खिंडी पडतात त्या तरुण स्नेह्यांची जोड करून घेऊन बुजविणें हेंहि आवश्यक असतें. अलीकडे अनेक स्नेह्यांस अंतरल्यामुळें माझी जी हानि

झाली होती, तिची अंदाजापलीकडे भरपाई झाली आहे, हें पाहून अत्यंत समाधान वाटतें...

माझी विचारशक्ति फारच मर्यादित आहे व कल्पनाशक्तीहि बेताचीच आहे. नवीन लेख लिहावयास घेतांना अजून मला एखाद्या उमेदवार लेखका-इतकाच स्वतःच्या सामर्थ्याबद्दल अविश्वास वाटतो, हें वाचून आपणांस कदाचित् आश्चर्य वाटेल. पण तें अक्षरशः खरें आहे. मराठी भाषेची सेवा करण्याची इच्छा हा एकच गुण माझ्या ठायी आहे, असें म्हटले तरी चालेल.

मी जरी वयानें व शरीरानें वृद्ध होत चाललों, तरी मनानें तरुणच आहे. माझा स्वभाव कांहींसा अल्लड आहे असें म्हटलें तरी चालेल. माझा पूर्वींचा थट्टेखोरपणा अजून किंचितहि कमी झाला नाहीं. मला वृद्ध गृहस्थांच्या सहवासापेक्षां तरुणांचाच सहवास आवडतो.

एका बाबतींत मात्र माझे मनाचें तारुण्य राहिलें नाही. माझा पूर्वींचा लेखनाविषयींचा उत्साह बराच मंद झाला आहे. गेल्या कांही वर्षांत मजकडून जें प्रमाणाबाहेर लेखन झालें, तें कदाचित् या शैथिल्याच्या मुळाशी असावे. हल्लीं पत्रव्यवहाराहून अधिक लेखन मजकडून होत नाहीं. संसाराची वाढती चिंता व पोटाच्या व्यवसायांत घालवावा लागणारा वेळ, बुद्धि यामुळेंहि हल्ली वाङ्मयावर पूर्वींइतका व्यासंग ठेवतां येत नाहीं. या दगदगींतून मी कायमचा सुटून माझा आवडता व्यवसाय करण्यास मोकळा होईन तो सुदिन !

आपला

**श्री. कृ. कोल्हटकर**

जळगांव, वऱ्हाड

२

ता. ३०–६–२१

प्रेमपूर्वक साष्टांग नमस्कार, विनंति विशेष

आपण आपले विचार मला खुलासेवार रीतीनें कळविण्याकरितां जे परिश्रम घेतले त्यांबद्दल मी ऋणी आहें. आपण मजवर ठेवलेल्या विश्वासाबद्दल मला साभिमान आनंद वाटत आहे.

आजकालच्या लेखकांचें शिक्षण एकांगी असतें. त्यांचा बहुतेक भर राजकारणावर असतो. त्यावरील ग्रंथांचेंच बहुधा त्यांजकडून परिशीलन होतें. परंतु ही एकांगी दृष्टि अत्यंत अनिष्ट आहे. तिनें संकुचितपणा व अनुदारपणा उत्पन्न होतो.

कै. टिळकांबद्दल आपणांस अत्यंत आदर वाटत असूनहि आपण त्यास अंधश्रद्धेचें स्वरूप येऊं दिलें नाही ही गोष्टहि आपणांस भूषणावह आहे. मलाहि त्यांच्या बुद्धिमत्तेबद्दल अत्यंत आदर आहे. पण मी कै. रानड्यांस पाहिलें असल्यामुळें व त्यांची विद्वत्ताप्रचुर व विश्वप्रेमनिदर्शक भाषणें ऐकिलीं असल्यामुळें त्यांच्या मानानें कै. टिळक मला हिणकस वाटत असत. ...

आपल्या राष्ट्रीय धोरणांत सामाजिक सुधारणेचा अंतर्भाव होत असल्यामुळे तें मला पूर्णपणें मान्य आहे. कै. टिळकांनीं कॉंग्रेस डेमोक्रॅटिक पक्षातर्फे जो निवडणुकीचा जाहीरनामा काढिला होता त्यांत त्यानी मागासलेल्या वर्गाच्या सुधारणेस दिलेलें महत्त्व नाईलाजानें दिलें होतें. तें त्यांनी प्रागतिकांच्या कार्यक्रमांतून उचललें होतें. त्यामुळें त्यांच्या आकुंचित मतांत फरक झाला नव्हता. असो.

आपला

**श्री. कृ. कोल्हटकर**

[ हीं दोन पत्रें श्री. ग. त्र्यं. माडखोलकर यांच्या ‘ दोन तपें ’ या पुस्तकांत प्रसिद्ध झालीं आहेत. ]



खामगांव,

ता. १०–९–१९११

## रा. रा. वि. सी. गुर्जर यांस—

सा. न. वि. वि.

आपलें पत्र पावलें. ‘ प्रेमशोधना ’च्या पद्यांसंबंधानें आपण ५–१० तरी मार्मिक सूचना केल्या होत्या; व म्हणून मी आपले आभार मानिले आहेत, यांत मी कांहीं विशेष केलें असें मला वाटत नाही. शिवाय ‘ प्रेमशोधन ’ बरें झालें आहे, असें मला प्रथम आश्वासन देणारांतहि आपण होतांच; व असें आश्वासन मिळाल्यामुळें मला बरेंच उत्तेजन आलें. तेव्हां तें बाहेर येण्याचे बरेंच श्रेय आपणांकडे आहे, यांत संशय नाहीं. ‘ प्रेमशोधन ’ नाटक माझ्या अजमासापेक्षां बरेंच लोकप्रिय झालें आहे असें दिसतें. या लोकप्रियतेचें एक कारण, तें बसवितांना रा. खाडिलकर यांनीं जी मेहनत घेतली, ती होय, हें आपणांसहि कबूल करावें लागेल. असें असतां त्याजसंबंधानें व किर्लोस्कर मंडळीसंबंधानें आपल्या मनांत इतका द्वेष उत्पन्न व्हावा हें मी आपलें दुर्दैव

समजतों. मला विशेष वाईट वाटण्याचें कारण हें कीं, दोन्हीं पक्षांमधील वैरभाव कोणत्याहि साधनांनीं दूर करण्यासारखा नाहीं. जें हृदय एकाविषयीं इतकें स्नेहार्द्र आहे, तें इतरांविषयीं इतकें द्वेषपूर्ण कां व्हावें, ही एक अचंबा करण्यासारखीच गोष्ट आहे. द्वेषापासून कधीं सुख होत नाहीं याचा मला पूर्ण अनुभव आलेला असल्यामुळें आपणांमधील वैमनस्य जेव्हां नाहींसें होईल, तो सुदिन, असें मी समजतो.

ज्योतिषावरील निबंधाच्या छपाईचें काम फार सावकाश परंतु समाधानकारक रीतीनें चाललें आहे. यापेक्षां जलद चाललें असतें, तर माझ्या हल्लींच्या मनःस्थितींत मला फार त्रास झाला असता. कारण माझें डोकें इतकें हलकें झालें आहे की, पांच मिनिटें जरी विचार करण्याचें काम पडलें तरी तें गरम होऊन जातें; व क्षुल्लक कारणानेहि त्याची चलबिचल होऊन जातें. निबंध पूर्ण झाल्यावर कांहीं वर्षें मला पूर्ण विश्रांति घ्यावी लागणार असें दिसतें.

या मनःस्थितीमुळें मला कोर्टाचें कामहि फार त्रासदायक वाटूं लागलें आहे. तें काम झाल्यावर दुसऱ्या कोणत्याहि कामास उत्साह राहत नाहीं. पत्रें लिहिणेंहि जिवावर येतें. अशा स्थितींत महाराष्ट्र नाटक मंडळीकरितां गद्य नाटक लिहिण्याचें अभिवचन कसें पार पडणार याची शंका वाटते. अजून मी त्याच्या संविधानकाची दिशाहि ठरविली नाहीं. पुढील मे महिन्यापर्यंत मन पूर्णपणें प्रसन्न झाल्यास त्या महिन्यांत तें नाटक लिहिण्याचा माझा विचार आहे. यापेक्षां अधिक खात्रीलायक कांहीच लिहितां येत नाहीं. क. लो. अ. हे वि.

आपला

**श्री. कृ. कोल्हटकर**

[ १९०६ सालीं रंगभूमीवर आलेल्या 'मतिविकार' नाटकांतील नऊ पदें गुर्जरांनीं केलीं होतीं. 'लीलावती' हें नाटक स. ना. ठोसर यांनी लिहिलें आहे. पत्राच्या शेवटीं ज्या गद्य नाटकाचा उल्लेख आहे तें 'वधूपरीक्षा' होय. ]

  

जळगांव, वऱ्हाड

ता. ५-१-२५

**डॉ. अ. ना. भालेराव** यांस—

सा. न. वि. वि.

मी मुंबईहून ता. ३१-१२-२४ रोजीं रात्रीं निघालों, तों दुसऱ्या दिवशीं दुपारी खामगांव येथें जाऊन पोहोंचलों. तेथून मी येथें ता. २-१-२५ रोजीं सकाळीं येऊन पोहोंचलों.

ता. ३१-१२-२४ रोजीं दुपारीं रा. रा. विठ्ठलराव गुर्जर आपल्या घरीं आले असतां जो एक अनुचित प्रकार घडला, त्याबद्दल मला किती वाईट वाटलें, हें आपल्या व आपल्या पाहुण्याच्या निदर्शनास आलेंच आहे. रा. रा. गुर्जेरांनीं माझ्या भेटीस येण्याचें सौजन्य दाखविलें असतां, मजकडून त्यांच्याशीं बोलतांना अपमानकारक वाटण्यासारखी शब्दयोजना व्हावी व तिजमुळें बोलण्यावरून बोलणें वाढून आपली अडचणीची स्थिति व्हावी, याबद्दल मला अजून राहून राहून वाईट वाटत आहे. आपणांस पत्र लिहिल्यास मनास हलकें वाटेल, अशा समजुतीनें हें पत्र लिहीत आहें.

माझी त्यासंबंधीची विचारसरणी संक्षेपानें खाली लिहिल्याप्रमाणें देतां येईल.

'द्रौपदी' नाटकामुळें गंधर्व मंडळीस फार कर्ज करावें लागलें. नवीन नाटकावर प्रमाणाबाहेर खर्च होऊन त्या कर्जांत भर पडली, हें वाईट झालें. 'आशा-निराशा' या सारख्या व्यावहारिक कथानकाच्या नाटकावर खर्च करण्याचें मुळींच कारण नव्हतें. रा. गुर्जेरांचें नवें नाटक जरी पौराणिक असलें, तरी त्यांतील कृष्णादि पात्रांस उपयोगी पडण्यासारखे कपडे 'स्वयंवर' नाटका-करितां तयार झालेल्या कपड्यांतूनच मिळण्यासारखे असल्यामुळें, त्या नाटका-वर खर्च करण्याचेहि प्रयोजन नव्हतें. बालगंधर्वांचा मधुर कंठ व मधुर चाली यांवरच कंपनीस वाटेल तितकें उत्पन्न मिळण्यासारखें आहे.

असा माझ्या भाषणाचा मथितार्थ होता. मी 'सामान्य' नाटकें व 'पौराणिक' नाटकें असा जो भेद केला, तो करितांना 'सामान्य' हा शब्द 'टाकाऊ' या अर्थीं योजिला नसून, 'सामाजिक किंवा व्यवहारांतील कथा-नकाची नाटकें' या अर्थीं योजिला होता. रा. गुर्जेरांची कविता व गद्य निर्दोष व सरस असतें, असें माझें मत असून, तें मी वेळोवेळीं प्रकटहि केलें आहे. असें असतां, मी त्यांच्या नाटकासंबंधानें 'सामान्य' हा शब्द 'क्षुद्र' या अर्थीं योजीन, हें संभवतच नाहीं. संभाषणाच्या ओघांत शब्दयोजनेकडे राहावें तितकें लक्ष राहात नसल्यामुळें एखाद्या वेळीं असा प्रमाद होतो; व श्रोत्यांस वक्त्याच्या हेतूचें ज्ञान असल्यास त्याचा वाईट परिणाम होतहि नाहीं. रा. गुर्जेरांचें मन मजबद्दल असावें तितकें शुद्ध नसल्यामुळें मी तो शब्द कुत्सित भावानें योजिला, असा त्यांचा ग्रह होणें स्वाभाविक होते. मी त्यांच्यासमोर शब्दयोजना अधिक दक्षतापूर्वक करावयास हवी होती यांत संशय नाहीं. यापुढें त्यांच्याशीं बोलतांना विषयांची व शब्दांची निवड मी अधिक दक्षतेनें करण्याचें आश्वासन देतों.

रा. रा. गुर्जेर भेटल्यास त्यांस हें पत्र दाखवावें, अशी विनंति आहे. ज्या दिवशीं सदरहू प्रसंग घडला, त्याच दिवशीं त्यांस भेटून त्यांचा गैरसमज

दूर करण्याची माझी इच्छा होती. पण वेळेच्या अभावामुळें ती पूर्ण करतां आली नाहीं. हें पत्र वाचून तरी त्यांचा गैरसमज दूर होईल अशी आशा आहे. क. लो. अ. हे. वि.

आपला

**श्री. कृ. कोल्हटकर**

[ हें पत्र डॉ. भालेराव यांना लिहिलेलें असावें. १९२४ च्या सुरवातीपासून कोल्हटकर मुंबईस त्यांच्याकडे उतरत असत. गुर्जरांच्या ज्या पौराणिक नाटकासंबंधीं वाद झाला तें 'नंदकुमार' नाटक गंधर्व मंडळीनें १९२५ सालीं रंगभूमीवर आणलें. ]



खानगी

जळगांव, वऱ्हाड
ता. २३–१०–२६

**रा. रा. रा. प्र. कानिटकर** यांस—

१

कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति विशेष.

आपलें ता. १९–१०–२६ चें पत्र काल संध्याकाळीं व डेक्कन कॉलेज मॅगेझिनचा अंक आज संध्याकाळीं मिळाला. या नियतकालिकाचें दर्शन मला फार वर्षांत घडलें नसल्यामुळें अंक पाहून साहजिकच अत्यंत आनंद झाला. त्याचा मी साभार स्वीकार करीत आहे.

आपण आपल्या पत्रांत मजविषयीं जो सद्भाव व सहानुभूति दाखविली आहे तिजबद्दल मी आपला ऋणी आहे. अशा सहानुभूतीची तारुण्यांत असते तिजपेक्षांहि उतारवयांत अधिक आवश्यकता असते.

माझीं शेवटचीं दोन नाटकें आपणांस आवडलीं हें पाहून संतोष होतो. एक-दोन संविधानकें डोक्यांत घोळत आहेत. त्यांपैकी एकावर तरी पुढें मागें नाटक लिहिण्याचा विचार आहे. पण गेल्या जून महिन्यापासून शक्ति व उत्साह इतका कमी झाला आहे कीं तो विचार कितपत अंमलांत येईल याची शंका वाटते....

सर्वच लेखन-प्रकार सारख्या प्रमाणांत ज्यास साधतात असा एकहि लेखक सांपडणार नाहीं. म्हणून प्रत्येक लेखकानें व्यवसायारंभीं आपणांस कोणता लेखनप्रकार सर्वांत उत्तम साधेल तो स्वीकारून बाकीचे सोडून दिले पाहिजेत.

लेखन-व्यवसायांत यश मिळविण्याचे कामी बुद्धीपेक्षां हौसेचाच अधिक उपयोग होतो, असा माझा स्वतःचाच अनुभव आहे.

'लोकाभिरुचि आणि 'अनिष्ट वाङ्मय' या आपल्या लेखांत आपला अश्लीलतेबद्दलचा व पावित्र्यविडंबनाविषयीचा जो जळजळीत तिटकारा प्रतिबिंबित झाला आहे तो आपणांस भूषणास्पद आहे. इतका तिटकारा असतांहि आपण मजवर जो हलक्या हातानें प्रहार केला आहे त्याबद्दल मला आपले आभार मानिले पाहिजेत.

येथें मला स्वतःचें किंचित् समर्थन केलें पाहिजे. भगवद्गीतेंत प्रतिपादिलेला धर्म अत्यंत श्रेष्ठ आहे यांत कांहीं संशय नाहीं. हल्ली परधर्मांतील जे लोक हिंदुधर्माचा स्वीकार करीत आहेत ते त्यांजवर गीताप्रणीत धर्माची छाप पडते म्हणूनच. त्याच्या उलट कार्य हल्लींच्या रूढ चातुर्वर्ण्य संस्थेकडून होत आहे. या संस्थेकडून परधर्मीयांचें आकर्षण होणें तर दूरच राहिलें, पण हिंदुधर्मीयांना स्वधर्मांत ठेवण्याचे कामहि होत नाही. उलट पक्षीं हजारो अस्पृश्य प्रतिवर्षीं स्वधर्मांतर्गत कृत्रिम वैषम्यभावास कंटाळून परधर्माचा स्वीकार करीत आहेत व या वैषम्यामुळें ब्राह्मण, ब्राह्मणेतर, स्पृश्य अस्पृश्य असे अनेक भेद आपल्या समाजाचीं शकले करीत आहेत. जोपर्यंत हे भेद कायम आहेत तों पर्यंत ऐक्य होऊन स्वराज्य हस्तगत होण्याची आशा नको. वास्तविक पाहतां जातिधर्माचा गीताप्रणीत धर्माशीं इतका निकट संबंध असण्याचे कारण नाही. पण तत्कालीन समाजव्यवस्थेची धर्माशीं जी सांगड घालण्यांत आली ती कायमचीच होऊन बसली—समाजाची घडी वारंवार बदलत असल्यामुळें जे नियम एका काळच्या समाजस्थितीला लागू पडतात ते अन्य काळांतील समाजस्थितीला लागू न पडतां कृत्रिम वाटूं लागतात. त्या नियमांची धर्मांशी सांगड घातली गेल्यामुळें ते दीर्घकालपर्यंत टिकले तरी त्यामुळें त्यांची कृत्रिमता नाहींशी होत नाहीं.

ज्या तत्त्वांस समाज दीर्घकालपर्यंत चिकटून राहतो तीं तत्त्वें कृत्रिम नसतात, असें एक लेखक म्हणतो. पण हें विधान अनेक अनिष्ट चालींस लागूं करून त्यांचीहि कृत्रिमता सिद्ध करतां येणार नाहीं काय? सतीची चाल, केशवपनाची चाल या अनिष्ट चाली अनेक वर्षें टिकल्याच कीं नाहींत ?

ख्रिस्ती धर्मशास्त्रांत सूर्य पृथ्वीभोंवतीं फिरतो असें जें विधान आहे त्यावर अंधश्रद्धा ठेवण्यांत आल्यामुळें युरोपमधील ज्योतिषशास्त्राची प्रगति व्हावयाची अनेक वर्षें थांबली. गेल्या शतकापासून पाश्चात्त्यांची अंधश्रद्धा डळमळूं लागल्यामुळें त्यांची बुद्धि स्वतंत्र होऊन तिनें शेंकडों आश्चर्यकारक शोध लावले आहेत. आपणांमध्यें कल्पकता अत्यंत कमी प्रमाणांत वसत आहे

याचें कारण आमच्या बुद्धीची गति धर्मानें घालून दिलेल्या अनेक कृत्रिम नियमांनीं रूद्ध झालेली आहे. जोंपर्यंत जनतेची अंधश्रद्धा कायम होती तोंपर्यंत ते नियम टिकले. बहुजनसमाजांत अज्ञानाचें प्राबल्य असल्यामुळें ती अंधश्रद्धा आजपर्यंत कायम राहिली. पण त्यामध्यें ज्ञानाचा प्रसार व्हावयास लागून ती अंधश्रद्धा नष्ट होऊं लागली तसतसे ते नियम झुगारून देण्यांत येऊं लागले आहेत.

अलीकडे चोहोकडे नास्तिक्याचा जो प्रसार झालेला दिसत आहे त्याचें कारण धर्माचा आधार कृत्रिम होता हें होय. ती कृत्रिमता नजरेस येऊं लागतांच तो आधार वरील धर्मासह डळमळून खालीं पडला. यापुढें धर्माची पुन्हां संस्थापना होईल तेव्हां त्याची उभारणी परंपरागत चातुर्वर्ण्यावर न करतां गुणकर्ममूलक चातुर्वर्ण्यावर करावी लागेल. अशा वेळी खालील जातींतील योग्य इसमांस उच्च जातीयांनी वरील जातीत सामील करून घेतलें पाहिजे. सुधारणा धीरेधीरेच केली पाहिजे, असा इशारा धर्माभिमानी लोक गेलीं शंभर वर्षें देत आहेत. या अवधींत लाखो हिंदु परधर्मांत गेले, व समाजाचीं हजारों शकलें पडून तो मरणाच्या पंथाला लागला; तरीसुद्धां धीरे धीरे चालण्याचा उपदेश चालूंच आहे !

अशा स्थितींत समाजानें लवकर सांवरावे अशी इच्छा असल्यास त्याच्या व्याधीवर जालीम उपायच अंमलांत आले पाहिजेत. चातुर्वर्ण्यावरील श्रद्धा कायम राहिल्यास समाजाचीं शकलें होऊन स्वराज्य दुरावतें व ती श्रद्धा नाहींशीं झाल्यास नास्तिक्य बळावतें; अशा आपत्तींत मी स्वराज्य गमावण्यापेक्षां नास्तिक्य पत्करीन, व युक्तिवादानें ती श्रद्धा नष्ट होत नसल्यास उपहासाचा अवलंब करीन. आगरकांनीं वाटेल तितका युक्तिवाद करून पाहिला; पण त्यांस तादृश यश आलें नाहीं. ज्या मठ्ठ पुरुषांना आपल्या स्त्रियांची अवहेलना झालेली शांत मनानें पाहवते व आपल्या अस्पृश्य बंधूंना पशूंपेक्षांहि वाईट वागविलें असतां ज्यांच्या चित्ताची शांति यत्किंचितहि ढळत नाहीं त्यांच्या अंगीं भावनांचें वास्तव्य कल्पिणें ही मोठी चूक आहे; व कल्पित भावनांस नसतें कोमलत्व चिकटवून त्यांस धक्का पोचूं नये म्हणून विवंचना बाळगणें ही तिच्यापेक्षांहि मोठी चूक आहे. अशा पुरुषांना त्यांच्या दीर्घ निद्रेंतून युक्तिवादानें जागें करणें शक्य नसेल तर उपहासानें जागें केलें पाहिजे. या वर्तनांत आपण चुकलों तर समाजघाताचें पातक आपल्या शिरीं येणार आहे.

गेल्या दोन-अडीच वर्षांपासून माझे डोळे बिघडल्यामुळें मला लेखन अजीबात सोडून द्यावें लागलें आहे. पत्रेंहि मी संक्षेपानेंच लिहितों. अलीकडे बऱ्याच दिवसांत मी इतकें विस्तृत पत्र लिहिलें नव्हतें. हें पत्र कांहीं वादग्रस्त मुद्द्यांच्या चर्चेच्या भरांत लिहून गेलों.

या पत्रांत न कळत कांहीं कमी अधिक मजकूर पडला असल्यास त्याची क्षमा करावी. क. लो. अ. हे वि.

आपला

**श्री. कृ. कोल्हटकर**

खानगी

जळगांव, वऱ्हाड

२

ता. १–११–२६

साष्टांग नमस्कार, विनंति विशेष

आपलें ता. २७–१०–२६ चें पत्र परवांचे रोजी मिळालें. मजकूर समजला.

---

मी विनोदी लेखांच्या द्वारे सामाजिक सुधारणेचा प्रसार करण्याचा जो प्रयत्न केला त्याचें स्वरूप समाजास गोंजारून सुधारणानुकूल करणें हें नसून त्यास चिडवून स्वदोषनिरीक्षणास तयार करणें हें होतें. सुधारणेचे गुण दाखविण्याचा प्रयत्न मी नाटकांच्या द्वारे केला व रूढीचे दोष दाखविण्याचा प्रयत्न विनोदी लेखांनी केला. 'रूढीवर प्रतोदप्रहार केले' या वाक्याने तोच अर्थ व्यक्त करण्याचा आपला हेतु आहे हें स्पष्ट आहे. त्याच्याशी 'सर्वथा कुंठित बोल', 'गोडगुलाबीनें गोंजारणें' व 'कर्णमधुर पुंगी' या शब्दांचा विरोध असावासें वाटतें. आपण योग्य वाटल्यास विरोध दूर करावा.

**कै. श्री. कृ. कोल्हटकरांचें हस्ताक्षर**

[ श्री. कोल्हटकरांनी ता. १–११–२६ रोजीं श्री. रा. प्र. कानिटकर यांना लिहिलेल्या आत्मसमर्थनपर पत्रांतील महत्त्वाचा भाग. ]

मी विनोदी लेखांच्या द्वारें सामाजिक सुधारणेचा प्रसार करण्याचा जो प्रयत्न केला त्याचें स्वरूप समाजास गोंजारून सुणारणानुकूल करणें हें नसून त्यास चिडवून स्वदोषनिरीक्षणास तयार करणें हें होतें. सुधारणेचे गुण दाखविण्याचा प्रयत्न मी नाटकांच्या द्वारें केला व रूढीचे दोष दाखविण्याचा प्रयत्न विनोदी लेखांनीं केला. ' रूढीवर प्रतोद प्रहार केले ' या वाक्यानें तोच अर्थ व्यक्त करण्याचा आपला हेतु आहे हें उघड आहे. त्याच्याशीं ' शर्करावगुंठित बोल ', ' गोडीगुलाबीनें गोंजारणें ' व ' कर्णमधुर पुंगी ' या शब्दांचा विरोध असावासें वाटतें. आपण योग्य आटल्यास विरोध दूर करावा. ' गणेश चतुर्थी ', ' श्रावणी ' इत्यादि लेखांत मी गणपतीचा, पंचगव्य-प्राशनाचा वगैरे उपहास केला आहे. पण पूर्वोक्त दैवताबद्दल व उपरोक्त प्रकाराबद्दल समाजांत विशेष पावित्र्याची कल्पना आहे असें आपणांस वाटतें काय ? माझा अनुभव अगदीं निराळा आहे. गणपतीच्या अवाढव्य पोटाची, उखळीसारख्या बेंबीची, मुसळासारख्या सोंडेची व मूषकरूप वाहनाची थट्टा केवळ खाजगी रीतीनेंच नाहीं तर सार्वजनिक स्थळीं कथेकऱ्यां-कडून करण्यांत येते. अनेक धर्माभिमानी म्हणवणारे लोक पंचगव्य पिण्याचा आविर्भाव दाखवून तें इतरांस नकळत जमिनीवर टाकून देतात. जाणव्याची ब्रह्मगांठ पिशाचास दाखविली असतां तें पळतें ही समजूत उघड उघड उपहास्यास्पद आहे. अशा समजुतींवर प्रहार केल्यास त्यांचा धर्माशीं संबंध आहे एवढ्यामुळें तें दोषास्पद ठरविणें योग्य होणार नाहीं. मला असा एक चमत्कारिक अनुभव आला आहे कीं ज्यांना माझ्या श्रावणीवरच्या लेखानें राग येतो त्यांना गणपतीचा लेख आवडतो; व ज्यांना गणपतीच्या लेखाचा राग येतो त्यांना श्रावणीवरचा लेख आवडतो. ' शिमगा ' या लेखांत बहुधा कोणासहि आक्षेपार्ह असें कांहीं दिसत नाहीं. 'पांडुतात्यांची निर्जळी एकादशी' हा लेख ही त्याच वर्गांतील आहे असें मला वाटत होतें, पण ती समजूत एका लेखामुळें बदलली आहे. सारांश, एकंदर समाजाच्या भावना दुखवील असा माझा एकहि लेख नाहीं असें स्वानुभवावरून मला वाटूं लागले आहे.

आगरकरांचे लेख जेव्हां वृत्तपत्रांच्या द्वारें प्रथम प्रसिद्ध झाले तेव्हां त्यांजविरुद्धहि जंगी काहूर उठलें होतें. तेव्हांपासून सामाजिक सुधारणेचें पाऊल बरेंच पुढें पडल्यामुळें आगरकरांच्या मृत्यूस बरींच वर्षें होऊन गेल्यामुळें व त्यांचा लोकप्रिय टिळकांशीं जिव्हाळ्याचा संबंध असल्यामुळें त्यांच्या लेखाबद्दलचा दुराग्रह आतां फारसा शिल्लक राहिला नाहीं. स्वसमर्थ-नाच्या भरांत अटकळीपलीकडे विस्तार झाला.

' गडकऱ्यांचा विनोद ' या पुस्तकावरील अभिप्राय यथार्थ आहे. कै. गडकऱ्यांविरुद्ध चकार शब्द लिहिण्याचेंहि धाडस लेखकांकडून गेलीं कांहीं

वर्षें होत नव्हतें, तो काल संपल्याचीं सुचिन्हें दिसत आहेत. मात्र यापूर्वीं स्तुतीचा जसा अतिरेक झाला तसा यापुढें निंदेचा अतिरेक होण्याची भीति आहे. रा. भावे यांच्या पुस्तकावर आपला खरा अभिप्राय निर्भीडपणें देण्यांत आपण जें धैर्य दाखविलें आहे, त्याबद्दल मी आपलें अभिनंदन करितों.

मी लहानपणीं फारच भाविक होतों. त्या नंतरच्या संस्कारांमुळें माझ्या मनांत पुष्कळ फरक झाला आहे. पण मी अजूनहि निरीश्वरवादी बनलों नाहीं हें आपलें म्हणणें खरे आहे. क. लो. अ. हे वि.

आपला

**श्री. कृ. कोल्हटकर**

[ कोल्हटकरांनीं ४५ वर्षांपूर्वीं लिहिलेलीं हीं दोन पत्रें आहेत. श्री. रा. प्र. कानिटकर त्यावेळीं डेक्कन कॉलेजमध्यें असून 'डेक्कन कॉलेज मॅगेझिन'चे संपादक होते व मॅगेझिनच्या अंकांत प्रसिद्ध झालेल्या लेखांना अनुलक्षून ही पत्रे लिहिण्यांत आलीं आहेत. याशिवाय कोल्हटकरांची आणखी कांही पत्रें त्यांना आलीं आहेत. ता. १२–३–२९ रोजीं जळगांवहून लिहिलेल्या पत्रांत " माझे डोळे मोतीबिंदूमुळें अंधप्राय झाल्यामुळें लेखनवाचन बंद आहे. सबब हें पत्र दुसऱ्याकडून लिहवीत आहे " असे त्यांनीं उद्गार काढले आहेत, पण पत्राच्या शेवटी स्वतः सही केली आहे. ]

● ● ●

# कोल्हटकरांच्या आठवणी

## १ : चाळीस वर्षांचा स्नेह

[ न. चिं. केळकर ]

रा. कोल्हटकर यांचा कोटिबाजपणा व विनोदशीलता यांच्याशीं माझा परिचय केवळ त्यांच्या लेखांवरून झालेला नाहीं; तर प्रत्यक्ष त्यांच्याशी बोलण्याचालण्यांत व स्नेहाच्या व्यवहारांत झालेला आहे. रा. कोल्हटकर यांच्याशी माझा परिचय प्रथम डेक्कन कॉलेजांत झाला. सन १८८९ सालच्या पहिल्या तिमाहींत मी फर्ग्युसन कॉलेजमध्यें पी. ई. च्या वर्गांत असतां एक-दोन वेळ डेक्कन कॉलेजांत गेलो होतो; व पुढें १८९१ सालीं तर मी बी. ए. च्या अभ्यासाकरितां डेक्कन कॉलेजांत राहिलो, तेव्हां इंग्रजी व संस्कृत हे विषय ऐच्छिक म्हणून त्यांनीं व मी दोघांनीहि घेतलेले असल्यामुळें, त्यांचा माझा सहवास वर्गबंधु, सहाध्यायी म्हणून वाढला. त्यांतच आम्हां कॉलेज विद्यार्थ्यांनीं त्या वर्षीं केलेल्या मृच्छकटिक नाटकाची भर पडली. त्याची स्फूर्ति व कांही अंशीं नाटकांतील गायनांत यश मिळण्याचा आधार ही रा. कोल्हटकरांपासूनच बरीचशी मिळाली होती. ते स्वतः चांगले गाणारे होते.........पुढे एल्एल्. बी. च्या अभ्यासाकरितां १८९२ व ९३ साली आम्ही दोघे व इतर कांही विद्यार्थी मिळून मुंबईस एकाच घरांत क्लब करून राहिलों होतों. १८९३ सालीं मुंबईस हिंदु-मुसलमानांचा दंगा झाला, तेव्हां आम्ही गिरगांवांत मंगळदास नथूभाई यांच्या चाळींत राहात होतों. दोन दिवस कॉलेजचीं व्याख्यानें बंद असून आम्ही चाळीत बंदिवानासारखे होतों. तथापि त्या वेळींहि आमची विनोदबुद्धि जागृत होती. सांगण्याचें तात्पर्य इतकेंच की, आम्ही डेक्कन कॉलेजांत असतांना होतों त्याहून मुंबईस एल्एल्. बी. चा अभ्यास करतांना एकाच चाळींत जवळजवळ राहात असल्यानें कोल्हटकरांचा व आमचा विशेष स्नेह जमला; आणि त्यांच्या व आमच्या वाङ्मयाभिरुचीची ओळख परस्परांना पूर्वींहून अधिक पटली.......दुसऱ्या एल्एल्. बीच्या दुसऱ्या वर्षाच्या टर्म्स भरून झाल्यावर कोल्हटकर व मी जे वेगवेगळे झालों, ते इतके की वर्षा-दोन वर्षांनीं त्यांची माझी सुटीत सहज गांठ पडेल, तेव्हांच भेट व्हावयाची व हास्यविनोदाची उजळणी व्हावयाची......एकदां मात्र

माझा ‘ सुभाषित आणि विनोद ’ हा निबंध बराचसा लिहून झाल्यावर मी मुद्दाम उठून तेल्हाऱ्याला त्यांच्याकडे गेलों; व तो निबंध वाचून त्यांनीं चर्चेच्या द्वारें मला पुष्कळ मदत व सूचना केल्या. उलट, याचा मोबदला ते मला असा देत कीं मे महिन्या सुटींत ते आपल्या एखाद्या नवीन पुस्तकाचें हस्तलिखित पुण्यास घेऊन येत, तेव्हां तें मला वाचावयास देत. नाटकें हीं निबंधासारखीं नसतात. म्हणजे, निबंधाप्रमाणें त्यांत कोणी कांहीं सूचना केल्या, तरी फारशा अंमलांत आणतां येत नाहींत; व मी सूचना केल्या असत्या, तरी कोणाच्या सूचना घेण्याचा स्वभाव कोल्हटकरांचा नसल्यामुळें, मी सूचना करण्याच्या भानगडींत न पडतां, बरें-वाईट काय दिसतें, याविषयीं सामान्य चर्चा करीं. फक्त एकच बाब अशी निघाली कीं, ज्यांत त्यांना माझ्या सूचनांची आवश्यकता भासली; व मी सुचविल्या त्या त्यांनीं अंमलांत आणल्या. ती बाब म्हणजे नाटकांतील कुणबाऊ भाषेची. कोल्हटकरांना कुणबाऊ भाषा बोलतां येत नाहीं व मला ती येते, असें पाहून त्यांनीं, मी व रा. पिंपळखरे यांजवर आपल्या कुणबाऊ पात्रांची भाषा, त्यांच्याच विनोदी वर्णनाप्रमाणें, अधिक शुद्ध म्हणजे अधिक अशुद्ध करून देण्याचें काम सोंपविलें; व आम्हीहि आनंदानें त्यांची भाषा हवी तशी अशुद्ध करून दिली.

( प्रस्तावना— कोल्हटकरांचा लेखसंग्रह )

---

## २ : हे तात्या आणि हे तात्या !

**[ अच्युत बळवंत कोल्हटकर ]**

श्रीपाद कृष्णांचें नाट्याधिष्ठान अजून कायम राहिलेलें आहे ! गडकरी-पंथाचे ते प्रणेते आहेत, — नावीन्याचे ते नायक आहेत, — विनोदाचे ते विनायक आहेत ! त्यांच्याइतका स्वाभाविक परिपोष कुणालाहि साधत नाहीं ! डायऱ्या आणि टाचणें ह्यांच्या मुंडावळ्यांशिवाय लिहितां लिहितां सहज सुचलेल्या साहित्यसाजानें नाट्यभाषेला सजविणारा भाषासुवर्णकार जर कोणी असेल तर एकच श्रीपाद कृष्ण कोल्हटकर हे होत !

एवढेच कीं, श्रीपाद कृष्ण कोल्हटकर हे आज चलनी नाणें नाहींत. त्याचें कारण हेंच कीं, तात्यासाहेब हे सध्यांच्या जगाशीं जितके समरस असावयास पाहिजेत तितके नाहींत ! ते एल्‌एल्. बी. होऊन वऱ्हाडांत शिरले. ते जिथें होते तेथेंच राहिले. त्यांची सृष्टि म्हणजे तीस वर्षांपूर्वीची सृष्टि ! त्या

तीस वर्षांत जी घडामोड झाली, ती त्यांच्या अंगावरूनहि गेली नाहीं व त्यांना जाणवलीहि नाहीं ! एवढेंच काय, अजून त्यांच्या मनाभोंवतीं तीस वर्षांपासूनची सृष्टि आहे–तीस वर्षांपूर्वीचेंच जग आहे ! त्यांचें संभाषण ऐकलें, तरीहि पुराणयुगांतला हा पुराणपुरुष आहे, असेंच वाटतें !......

आणि म्हणूनच साहित्य संमेलनांतील दोन तात्यासाहेबांचा संयोग म्हणजे प्राचीन युग आणि अर्वाचीन युग यांचा संयोग आहे ! कृतयुग जर कलियुगाला भेटायला आलें, किंवा अश्वत्थामा जर ब्रिटिश पलटणीत उभा राहिला, तर ज्या प्रकारचा संयोग दिसेल, तशा प्रकारचा संयोग ह्या दोन तात्यासाहेबांच्या योगानें साहित्य संमेलनांत दिसणार आहे. कारण श्रीपाद कृष्ण म्हणजे प्राचीन जग आणि नरसोपंत केळकर म्हणजे वर्तमानपत्राचा ताजा अंक !

श्रीपाद कृष्णांनीं अकोल्याचा मार्ग धरला आणि तेव्हांपासून त्यांचा जगाशीं संबंध तुटला व ते एकाएका पावलानें जगाच्या मागें पडत चालले. ‘ मूकनायका ’शिवाय त्यांचें एकहि नाटक आज रंगभूमीवर नाहीं. ते उत्तम गणिती किंवा ज्योतिषी आहेत, हेंहि लोक विसरून गेलेले आहेत !

कोल्हटकरांच्याकडे पाहिलें म्हणजे सेंट हेलेना बेटांतील एका खडकावर शून्य दृष्टीनें बसलेल्या नेपोलियनच्या चित्राची आठवण होते. तथापि देखील श्रीपाद कृष्ण हे नेपोलियन आहेत, हें लक्षांत ठेवलें पाहिजे ! त्यांच्यापासून हजारों तरुणांना स्फूर्ति मिळेल, हजारों लेखक त्यांचे अनुकरण करतील.

आम्हीहि सहस्रावधि सुरुचिर कल्पना प्रसविणाऱ्या त्यांच्या सहस्र-शीर्षावर आज प्रेमभावाची कुसुमवृष्टि करीत आहों ! आम्ही सरस्वतीच्या या लाडक्या सुपुत्रास आपली प्रणती अर्पण करीत आहोंत ! त्यांचे अवगुण आम्हांस माहीत आहेत ! पण त्यामुळेंच त्यांचे अनुपम गुण आम्हांला जास्तच अनुपम वाटतात. आणि म्हणूनच श्रीपाद कृष्णांसारखा लायक अध्यक्ष निवडल्याबद्दल साहित्य परिषदेचे आम्ही अत्यंत आभारी आहोंत !

( चाबुकस्वार – १९२७ )

---

## ३ : असामान्य प्रतिभेचे तात्यासाहेब

**[ वि. स. खांडेकर ]**

कोल्हटकरांना मी प्रत्यक्ष पाहिलें १९२६ साली. त्यापूर्वी १९१५ मध्यें कॉलेजांत असतांना त्यांना पाहण्याचा एक योग आला होता; पण माझ्या भित्रेपणानें तो हुकला. १९१५च्या डिसेंबरांत पुणें येथें किर्लोस्कर मंडळी

' गुप्तमंजूष ' नाटक पुन्हां बसवीत होती. त्या कामाकरितां कोल्हटकर पुण्याला आले होते. गडकऱ्यांच्या मध्यस्थीनें त्यांना त्यावेळीं पाहणें मला कांही अशक्य नव्हतें. पण ' सुदाम्याचे पोहे ' वाचून कोल्हटकरांच्याविषयी माझी एक ठाम कल्पना होऊन गेली होती. आपण त्यांना पाहायला गेलों तर तोंड-ओळख होतांच त्यांचा कोट्यांचा मारा सुरू होईल, आणि त्यांच्या कोटीवर प्रतिकोटी करतां येणें अशक्य होऊन आपल्याला गप्प बसावें लागेल, असें त्यावेळीं मला वाटलें. शिवाय कोल्हटकर म्हणजे केवढे मोठे लेखक ! गडकऱ्यांचे गुरु ! उलट मी हौसेकरितां पांढऱ्यावर काळें करणारा एक कॉलेजांतला विद्यार्थी ! सशानें मोठ्या ऐटीनें सिंहाला भेटायला जाण्यांतलाच प्रकार व्हायचा तो !

पुढें १९२० सालापासून त्यांचा माझा पत्रव्यवहार सुरू झाला. पण १९२६ च्या मे महिन्यापर्यंत त्यांची माझी प्रत्यक्ष भेट मात्र होऊं शकली नाही. तो दिवस—दिवस म्हणण्यापेक्षां रात्रच—अजून आठवते मला ! मला पाहतांच तात्यासाहेब सद्गदित कंठानें उद्गारले, " तुम्ही माझ्या दृष्टीला पडाल असं वाटलं नव्हतं मला ! ' ( १९२५ च्या नोव्हेंबरपासून १९२६ च्या मार्चपर्यंत मी मलेरियानें आजारी होतों. ) त्यांच्या त्या उद्गारांतले पितृवात्सल्य म्हणजे तहानेने व्याकुळ झालेल्याला मिळालेलें अमृतच होतें ! ' तुम्हांला प्रवासाचा त्रास झाला आहे; तुम्ही आतां झोंपा ' असे थोड्या वेळाने आम्ही दोघांनीं म्हणावें, पण गोष्टी मात्र सुरूच राहाव्यात. असें होऊन त्या रात्री आम्हांला झोपायला तीन—साडेतीन वाजले. सरकारी दृष्टीला तात्यासाहेब त्यावेळीं पेन्शनीच्या वयाचे वाटले असते. पण मला ते मनानें माझ्याइतकेच तरुण आहत असें आढळून आलें. किंबहुना त्याच त्याच आवडीच्या गोष्टी सांगण्याची व ऐकण्याची त्यांची उत्सुकता म्हणजे त्यांच्या बालहृदयाची मूर्तिमंत साक्षच होती !

तात्यासाहेबांची प्रतिभा असामान्य होती ह्यांत संशय नाही; पण आपली कलाकृति सुंदर होण्यासाठी ते घेत असलेले परिश्रमहि तितकेच मोठे असत. नाटके—कादंबऱ्यांचें प्रत्यक्ष लेखन करायला त्यांना फार थोडे दिवस लागत. पण त्यांच्या चिंतनांत ते इतके दिवस, किंबहुना रात्री घालवीत कीं, ' दुटप्पी की दुहेरी 'च्या लेखनाच्या वेळीं तर त्यांना निद्रानाशापासूनहि त्रास झाला.

पाऊस पृथ्वीवर पडायला फार थोडा वेळ लागतो, पण आकाशांत त्याची पूर्वतयारी महिनोन् महिने चाललेली असते. नाही का ? कोल्हटकरांचें लेखनहि तसेंच होतें ! बरें, लिहून झाल्यावरहि त्यांची चिकित्सक दृष्टि गप्प बसे असें नाहीं.

' महाराष्ट्र गीता 'च्या रचनेच्या वेळची गोष्ट. कविता लिहून झाल्यावर त्यांनी ती पाहण्याकरितां माझ्याकडे पाठविली. माझ्या अंगांत शिष्याप्रमाणें

टीकाकाराचे रक्त उसळत होतेंच. मी तिच्यांत कांही किरकोळ फेरफार सुचवायला सुरवात केली. त्या फेरफारांची चर्चा इतकी लांबली कीं, या एका गीतासाठीं आठ-दहा दिवसांत त्यांनीं मला आठ-दहा पत्रें पाठविलीं. इतकेंच नव्हे, तर अमुक अमुक शब्द पसंत असतील तर उलट तार करा अशा अर्थाची शेवटी एक तारहि त्यांच्याकडून मला आली. ती कविता त्यांना लवकरच कुठें-तरी पाठवायची होती म्हणून ही घाई झाली हें उघड आहे. पण या लग्नघाईतून व्यक्त होणारी त्यांची सूक्ष्म व चिकित्सक दृष्टि घिसाडघाईनें लिहिणाऱ्या सर्व लेखकांना मार्गदर्शक होण्यासारखी आहे यांत संशय नाही.

( " गोफ आणि गोफण " )

---

## ४ : माझ्या लेखनगुरूंचें व्यक्तिदर्शन

**[ ग. त्र्यं. माडखोलकर ]**

कोल्हटकरांचे जीवन सर्वथैव बौद्धिक आणि वैचारिक होते. ते वेदान्ती किंवा पारमार्थिक नसूनहि त्यांना ऐहिक किंवा लौकिक महत्त्वाकांक्षा अशा मुळी कांही नव्हत्याच. त्या दृष्टीनें ते भोगी असूनहि एका अर्थानें विरागी होते, असे म्हणावें लागेल. त्यांच्या विरागितेचे एक उदाहरण देण्या-सारखे आहे. १९२५ साली नागपूर विद्यापीठानें मराठी अभ्यासक्रम समिती-वर त्यांची नेमणूक केलेली होती. तिच्या पहिल्या बैठकीसाठी ते नागपूरला आलेले होते. त्या दिवशी सायंकाळी मी त्यांना भेटावयाला गेलो असतां ते मला म्हणाले, " आज माझा सारा दिवस अगदी कंटाळवाणा गेला. अशा प्रकारची कामें करायला जी मनोवृत्ति लागते ती माझ्या ठिकाणी मुळीच नाही. आमच्या खामगांवच्या वकील मंडळीनी मला तेथील म्युनिसिपालिटीचे अध्यक्ष बनविण्याचे ठरविलें होतें. पण मी त्यांना साफ नकार दिला. " —" बरोबर आहे; आपण ग्रंथकार म्हणून सगळ्या महाराष्ट्रांत प्रसिद्ध असल्यामुळे आपल्याला हा बहुमान द्यावा, असे त्यांना साहजिकच वाटले असावें, " मी त्यांना म्हणालों. त्यावर ते हंसून उद्गारले, " पण असल्या बहुमानांत मला कांहीं अर्थ वाटत नाहीं. अशा प्रकारच्या सगळ्याच कामांचा आणि समारंभाचा मला अगदीं कंटाळा आहे. साहित्यसंमेलनाच्या अधिवेशनांनासुद्धां मी मधून-मधून एवढ्याचसाठी जातों की, तेथें अनेक जुन्या मित्रांच्या भेटीगांठी होतात आणि नव्या लेखकांशीं ओळखी करून घेण्याची संधि मिळते. पण त्यांत देखील माझें मन कांहीं रमत नाही. " —कोल्हटकरांच्या या मनोवृत्तीमुळे त्यांचा

एकसष्टावा वाढदिवस साजरा करण्याची डॉ. भालेराव प्रभृति त्यांच्या मुंबईच्या चहात्यांची इच्छा कांहीं अंमलात येऊं शकली नाही. किंबहुना, ' कोल्हटकर लेखसंग्रह ' हा ग्रंथ त्यांना पुणें किंवा मुंबई येथे मोठा समारंभ करून अर्पण करण्यांत यावा अशी जी सूचना केळकरांनी केलेली होती, तिलासुद्धां त्यांनी नकार दिला.

कोल्हटकरांच्या जीवनाला सामाजिक किंवा सार्वजनिक बाजू जवळ-जवळ नव्हतीच म्हटली तरी चालेल. रा. ब. वामनराव कोल्हटकर यांच्या-बरोबर आपल्या तरुणपणी ते जे काय दोन तीन वेळां राष्ट्रीय सभेच्या किंवा सामाजिक परिषदेच्या अधिवेशनांना उपस्थित राहिले असतील, तेवढेच. त्यांचें वृत्तपत्रांचें वाचनहि ' ज्ञानप्रकाशा ' पुरतेंच मर्यादित होतें. त्या काळांत इतका गाजलेला ' केसरी ' सुद्धां त्यांच्या वाचनांत नव्हता. ज्या श्रेष्ठ लेखकाच्या चतुरस्र लेखणीचा इतका विलक्षण प्रभाव १८९५ पासून १९३० पर्यंत मराठी वाङ्मयावर पडला, त्यांचे जीवन इतकें लोकविमुख होते, हें पाहून कोणालाहि आश्चर्य वाटेल, पण तें तसें होतें, एवढें मात्र खरें !

त्यामुळे, व्यावहारिक दृष्ट्या अत्यंत संकुचित भासणारें कोल्हटकरांचें जीवन बौद्धिक दृष्ट्या विलक्षण विशाल, संपन्न आणि सत्यपूतहि होतें. त्यांच्या आत्मकेंद्रित व आत्मतुष्ट वृत्तीमुळे त्यांचें जीवन समृद्ध होते, व आजन्म निर-निराळ्या विषयांचें अवलोकन, आणि, चिंतन करून त्यांनी त्याला गाढता, विशालता आणि सूक्ष्मता आणलेली होती.

( श्री. कृ. कोल्हटकर व्यक्तिदर्शन )

---

## ५ : युगप्रवर्तक नाटककार — प्रथम संगीतज्ञ नंतर साहित्यिक !

**[ गो. स. टेंबे ]**

मी देवल सर्कशीला रामराम ठोकून पुण्यास सहकुटुंब येऊन राहिलों होतों. त्यावेळीं किर्लोस्कर मंडळी श्री. श्री. कृ. कोल्हटकरांचें ' प्रेमशोधन ' हें नाटक बसवीत होती. पदांच्या चाली गाऊन दाखविणें आणि पात्रांना त्या बसविणें हा कोल्हटकरांचा मुख्य षोक होता. माझी व त्यांची प्रथम किर्लोस्कर थिएटरमध्यें गांठ पडली. गळी आवाजांत तान-खटक्यासह ते सुंदर रीतीनें चाली गाऊन दाखवीत.

कोल्हटकरांच्या भोंवती गडकरी वगैरे प्रमुख तरुणांचा नेहेमी गराडा पडे. त्यांच्या नाटकांतील कोट्यांवर सर्व तरुण पिढी बेहद्द खूष असे. मला स्वतःला

चालीच्या दृष्टीनें त्यांचे ‘ मूकनायक ’ नाटक फारच आवडलें होतें. परंतु ‘ मूकनायकां’तील किंवा त्यांच्या इतर नाटकांतील कोटिक्रमांबद्दल मात्र मला असें वाटे की, केवळ कोटी साधण्याकरितां पूर्वीची कितीतरी वाक्यें ते खर्ची घालतात; त्यामुळें संवादांतील भावनेच्या निर्मल प्रवाहांत अकारण भोंवरे उत्पन्न होतात. माझ्यासारख्या सामान्य माणसाला त्यांच्या पद्यांतील शब्द नादहीन वाटत; कारण त्यांतील बहारीच्या कल्पना समजण्याची मला कुवत नव्हती. गडकऱ्यांनी त्यांच्या पदांतील सुंदर स्थलांची निवड करून, अन्वय-अर्थ देऊन, एक छोटेसें पुस्तक प्रसिद्ध केलें होतें. मला वाटे इतका व्याप केल्यावर रुचकर लागणारे काव्य नाटकाला खचित पथ्यकर नाही. पुढें त्यांच्या नाटकांतून नायकाच्या भूमिका करण्याचे मला प्रसंग आले, त्यावेळी भावनेऐवजी बुद्धीला डिवचणारी नाटकें लिहिण्याच्या नव्या प्रथेचे ते आद्यप्रवर्तक, या दृष्टीने त्यांच्या नाटकांतील भूमिका करण्यांत मी धन्यता मानी; परंतु त्या भूमिकांशी तन्मय होणें मला प्रयासाचे होई.

‘ प्रेमशोधना’च्या गद्यभागाच्या तालमीची सर्व मदार खाडिलकर यांच्यावर सोंपवून तात्यासाहेब कोल्हटकर परत आपल्या गांवी गेले. दोन नाटककर्त्यांच्या एकमेकांवरील विश्वासाचे हे उदाहरण कदाचित् पहिलें आणि शेवटचेच ! ‘ प्रेमशोधन ’ नाटकाचा प्रथम प्रयोग एकंदरीत चांगला झाला.

‘ शाकुंतल ’ नंतर आम्ही कोल्हटकरांचे ‘ मतिविकार ’ नाटक बसविलें. मला हे नाटक कोल्हटकरांच्या अचाट व अभिजात बुद्धिवैभवाचें निदर्शक वाटे. म्हणून, ही त्यांची सुंदर नाट्यकृति पुन्हां रंगभूमीवर आणणे आपलें कर्तव्य आहे, अशी माझी भावना होती. त्यानंतर आमच्या शिवराज मंडळीनें टिपणिसांचे गाजलेलें ‘ चंद्रग्रहण ’ नाटक संगीत करून बसवायला घेतलें.

(‘ माझा जीवनविहार ’)

कै. तात्यासाहेबांनी बहुतेक संगीत नाटकेंच लिहिली. आणि त्या सर्वांमधील पद्यांची संख्या ६०० पेक्षां अधिक भरते ! वीरतनय १०८, मूकनायक १००, गुप्तमंजूष ११० मतिविकार १०६, प्रेमशोधन ७३, सहचारणी ४३, जन्मरहस्य ४८, वधूपरीक्षा ३२. शिवाय कित्येक चालीवर रचलेली परंतु उपयोगांत न आणलेली अशीं अनेक पदे जमेस धरतां, मजेने अशी कल्पना करावीशी वाटते की, संगीताच्या नादामुळें चाली मिळवायच्या त्याबरहुकूम पदें रचावयाची आणि ती सर्वांच्या कानांवर पडावी म्हणून त्यांच्यासाठी नाटक लिहायचे, अशा उलट्या क्रमानें जणू काय त्यांनी नाटके लिहिलीं असावींत ! तात्पर्य, तात्यासाहेब प्रथम सांगीतिक व नंतर साहित्यिक असे त्यांच्या नैसर्गिक प्रवृत्तीचें थोडक्यांत वर्णन करावे लागतें.

कोल्हटकरांचें मूकनायक हे नाटक नाजूक भावना, उदात्त ध्येयवाद, काव्य आणि संगीत या सर्वांनीं भरगच्च भरलेलें आहे. मराठी नाट्यसृष्टीच्या सागरांतील अत्यंत मौल्यवान असें हें रत्न आहे. कोल्हटकरांच्या सांगीतिक कीर्तिमंदिराचा कळस म्हणजे 'मूकनायक' नाटक आहे. अण्णासाहेबांची रगभूमि मुख्यत्वें भावनांचे मानससरोवर, तर तात्यासाहेबांची रंगभूमि बुद्धिजन्य सौंदर्याचें क्रीडोद्यान, असे म्हणतां वेईल.

('रंगाचार्य')

"सौंदर्योपासना हा तात्यासाहेबांच्या वृत्तीचा व लिखाणाचा स्थायीभाव होता असें म्हणतां येईल आणि या कामीं आपल्या बुद्धीला व अचाट कल्पना-शक्तीला त्यांनीं मनसोक्त राबवून घेतलें. शिवाय त्यांच्या वृत्तीमध्यें जन्मजात विनोद असल्यामुळें ही त्याची सौंदर्यपूजा महान् बुद्धिमानावर देखील विलक्षण मोहिनी घालूं शकली. कोल्हटकराचें 'गुप्तमंजूष' नाटक पहात असतांना, लोकमान्य टिळक एकदम उद्गारले, "काय हा बुद्धिमत्तेचा दुरूपयोग!" या उद्गाराचें तात्पर्य हेच की, अशा प्रकारची सौंदर्यशोधक बुद्धि नाटकासारख्या क्षुद्र (लोकमान्यांच्या मतानें) विषयांत गुंतविण्याऐवजी राजकारणाच्या कामीं लाविली असती तर, राजकारणासारख्या रूक्ष विषयामध्यें देखील लालित्य आणि अर्थात्च अधिक आकर्षण निर्माण झाले असते, प्रतिपक्षाला नामो-हरम करण्यासाठी एक प्रभावी आयुध हाती आलें असतें! आणि मग मात्र तो लोकमान्यांच्या देशहितैक दृष्टीनें बुद्धीचा सदुपयोग ठरला असता. तें कसेंहि असो, परंतु लोकमान्यांच्या चित्ताची चलबिचल करण्याचा प्रभाव श्रीपाद कृष्णांच्या कल्पना विलासांत, कोटिक्रमांत आणि भाषाशैलीत होता, हें कबूल केलें पाहिजे. याचें आणखी एक उदाहरण म्हणजे 'प्रेमशोधन' नाटकामध्यें नाटकाच्या तोंडी ऋषिकालीन पुण्यभूमीचें एक कल्पनारम्य वर्णन आहे. तें ऐकून साहित्यसम्राट श्री. न. चिं. केळकर उद्गारले, "असें उदात्त व सुंदर वर्णन कोल्हटकरांची प्रतिभाच करूं जाणे!"

अभिजातता आणि सौंदर्य या दोन स्थायी प्रेरणांवर त्यांचा लेखन-विलास आधारलेला होता. ते ध्येयवादी कीं वास्तववादी नाटककार होते असा प्रश्न श्रीपाद कृष्णांच्याविषयीं अनाठायीं म्हणावा लागेल. ते सौंदर्यवादी नाटककार होते, असें म्हणणें यथार्थ होईल. त्यांच्या प्रत्येक नाटकांत सामाजिक विषमता, अन्याय, मद्यपान इत्यादिविरुद्ध प्रचार आहे; पण हे विषय त्यांनीं सौंदर्य दृष्टीनें, समतोलपणानें व हळुवारपणें हाताळले आहेत. रंगभूमि ही केवळ कलात्मक सौंदर्याची व अभिजात संस्कृतीची विलासभूमि आहे; मतप्रचाराची चावडी किंवा दवंडी पिटण्याचा चौक नव्हे; अशा दृष्टीनें त्यांनीं कलात्मक

संयम राखून आपलीं नाटकें लिहिलीं. त्यांतील प्रचार बुद्धया शोधूनच काढावा लागेल.

'वीरतनय', 'मूकनायक', 'गुप्तमंजूष' व 'प्रेमशोधन' या सर्वस्वीं काल्पनिक नाटकांतून आपला प्रतिभाविलास व सौंदर्यवाद श्रीपाद कृष्णांना उत्कर्षानें साधतां आला. परंतु 'मतिविकार', 'वधू परीक्षा', 'जन्मरहस्य' व 'सहचारिणी' हीं जीं वास्तववादाची झूल पांघरणारी नाटकें त्यांनी लिहिली ती विशेष प्रभावी ठरलीं नाहींत. त्याचें कारण कर्त्याच्या स्वाभाविक प्रवृत्तीला आणि कल्पनेच्या स्वैरसंचाराला त्यांत भरपूर क्षेत्र मिळणें शक्य नव्हतें. तरी देखील अभिजातता, भाषावैभव, विनोदी कोटिक्रमाची आरास इत्यादि गुण त्या नाटकांमध्यें सुद्धां – विशेषतः 'मतिविकारा'मध्यें ठिकठिकाणीं प्रत्ययास येतात. ('जीवन व्यासंग' – भाग १)

---

## ६ : ठोसर आणि कोल्हटकर यांच्या भेटीचा सुप्रसंग !

**[वि. मा. दी. पटवर्धन]**

'नाट्यकलारुक्कुठार – वळसा नं. १' या नांवाखालीं कै. स. ना. ठोसर यांनीं कोल्हटकरांच्या 'गुप्तमंजूष' नाटकावर एक चटकदार परीक्षण लिहिलें. ही टीका कोल्हटकरांना सहन झाली नसावी. आपलें नाटक पडावें म्हणून ठोसरांनीं मुद्दामच त्याची टवाळी केली असा त्यांनीं आपला समज करून घेतला आणि ठोसरांचे 'प्रेमाभास' नाटक रंगभूमीवर अयशस्वी ठरल्यावरोबर कोल्हटकरांनीं त्यावर एक खरमरीत टीकाप्रबंध लिहून जोरदार हल्ला चढविला आणि त्याच्या चिथड्या उडविल्या. 'प्रेमाभास'वरील आपला जालीम टीकालेख वाचल्यावर रावसाहेब ठोसर चिडून कुठेंतरी आपला त्याच पद्धतीनें समाचार घेतील अशी कोल्हटकरांची कल्पना असावी. पण रावसाहेब स्वभावानें अतिशय सहिष्णु, आर्जवी, खिलाडू वृत्तीचे, जाहीररीत्या तर त्यांनीं राग प्रदर्शित केला नाहीच, पण उलट जेव्हां कै. ग. स. मराठे यांनीं त्यांना या बाबतींत डिवचण्याचा प्रयत्न केला तेव्हां ते हंसत म्हणाले, "अहो, तात्यासाहेबांचं आणि आमचं हे जुनं प्रीतिखडाष्टक आहे. डेक्कन कॉलेजमध्यें आम्ही होतों तेव्हांपासूनच, आपल्या नाटकाचा ठोसर बट्टयाबोळ करतात, असा त्यांचा समज झालेला आहे. यावर मराठ्यांनीं विचारलं, "कथमेतत् ?" तेव्हां ठोसर

म्हणाले, "तो एक स्वतंत्र किस्सा आहे. पण जाऊं द्या. वडील मंडळींचं आपण मनावर घेऊं नये."

योगायोग असा की, हे संभाषण संपता संपतांच कोल्हटकरांकडून आलेलें पत्र ठोसरांच्या हाती पडलें. 'रागाच्या भरांत माझा थोडासा तोल सुटला. त्यामुळें तुमच्या नाटकावर टीका करतांना गैरभाषा वापरली गेली याचें वाईट वाटतें. जुना स्नेह लक्षांत घेऊन त्याबद्दल क्षमा करावी. मुंबईस आल्यावर आपणांस भेटतो' असा दिलगिरीचा मजकूर त्यांत होता. लगेच मराठे यांना तें पत्र दाखवून रावसाहेब म्हणाले, "ही पाहिलीत तात्यासाहेबांच्या मोठ्या मनाची साक्ष!" खरोखरीच कांही दिवसांनी कोल्हटकर आपल्या मुंबईच्या मुक्कामांत एक दिवस मुद्दाम कुर्ल्याला ठोसरांच्या बंगल्यावर गेले. कॉलेजांतील जुन्या मधुर स्मृति उचंबळून आल्या. काव्य, नाटक, संगीत आणि विनोद या विषयांवर दोन मित्रांमध्यें झालेल्या मनमुराद रसील्या अशा गप्पा रंगल्या की वेळ कसा आणि किती गेला, याचें कुणालाच भान राहिलें नाहीं. चहा, चिवडा, पान, तंबाखू या पूरक साहित्यावर ही धुंद मैफल चार तास चालली. रात्रीचे दिवे लावायला सौ. ठोसर हांका मारीत तिथे उपस्थित झाल्या तेव्हां दोघे भानावर आले! एकमेकांना वऱ्हाडी पद्धतीनें मिठी मारूनच निरोप घेतला गेला. वीस वर्षांचें वैर विझून गेलें.

('महाराष्ट्र टाईम्स', मुंबई)

---

## ७ : जळगांव–जामोद येथील वास्तव्य

[**केशव काशीनाथ जोशी**, ॲड्व्होकेट
जळगांव–जामोद, विदर्भ]

वास्तविक पाहतां बारा नाटकांचे कर्ते व धंद्यानें वकील असे ते असतांना त्यांना मनुष्य स्वभावाचें सूक्ष्म ज्ञान असावयास हवें; व दैनंदिन व्यवहारांत ते ज्ञान प्रगट व्हावयास हवें. पण, आश्चर्याची गोष्ट ही कीं, ते कधीं कधीं ह्या बाबतीत भोळे आहेतसे वाटत......एक साहित्यिक त्यांना पुण्यास भेटावयास आला व तात्यासाहेबांच्या नाट्यगुणांची त्यानें खूपच स्तुति केली. 'मी तुमचें मूकनायक कानडी भाषेंत भाषांतरित करणार आहे' असें त्यानें सांगितले. एवढीच त्याची व तात्यासाहेबांची ओळख. पुढें तात्यासाहेब जळगांवीं आल्या-वर एके दिवशी एकाएकी ह्या तरुणाकडून त्यांना पत्र आलें. त्यांत त्याने लिहिलें होतें की, "मी परीक्षेला बसणार आहे. परंतु माझ्याजवळ पैसे नाहींत.

तरी कृपा करून तारेनें मला १०० रुपये पाठवावेत." मागचा पुढचा कांहींहि विचार न करतां व आम्ही सर्व नको नको म्हणत असतां तात्यासाहेबांनी त्याला तारेने १०० रुपये पाठवून दिले. पैसे पाठविले नाहीत तर त्या बिचाऱ्याचें नुकसान होईल, ही भावना ! त्या तरुणाकडून तात्यासाहेबांना एक बोटभर चिठ्ठीहि आली नाही आणि तदनंतर त्यानें त्यांची कधीं भेटही घेतली नाहीं !

तात्यासाहेब अतिशय अल्पसंतुष्ट असत, तसे ते अत्यंत साधेहि असत. मनाची मांडणी ही आशावादी असे. कोणत्याहि गोष्टीचा वाईट विचार करावयाचा नाही. ते ज्या घरांत राहात होते ते मोडकळीस आलेले होतें. पण हें घर किती चांगलें आहे असे ते म्हणत. याच घरांत त्यांनी आपलें आत्मवृत्त लिहिलें; अनेक महत्त्वाची भाषणें, नाटके, लेख लिहिले. दुरुस्त 'आत्मवृत्त 'हि येथेच लिहिलें. ते त्यांच्या मृत्यूपर्यंत श्री. माडखोलकर यांच्यापाशी होतें. बापुरावाने तें प्रसिद्ध केलें. पण आपल्या मृत्यूनंतर दहा-पंधरा वर्षे ते प्रसिद्ध होऊं नये अशी त्यांची इच्छा होती. जळगांवचे त्यांचें वास्तव्य व हें घर यांना यामुळें फार महत्त्व आहे.

तात्यासाहेबांच्या उंच आणि भव्य कपाळावरून त्यांची बुद्धि प्रतीत होत असे. ते अत्यंत बुद्धिमान् होते. त्यांच्या बुद्धीचें एक वैशिष्ट्य असें होतें की, कोणतीहि गोष्ट त्यांना चटकन् ग्रहण होत नसे, पण एकदां ती गोष्ट समजली म्हणजे मग ती मनांत कायमची राहून बसे. विचारांच्या साहचर्याने कोणतीहि गोष्ट लक्षांत राहते याचें उत्कृष्ट उदाहरण ते प्रत्यक्ष करून दाखवीत. शंभरापर्यंत कोणत्याहि गोष्टी त्यांना सांगाव्यात म्हणजे त्या उलट सुलट कशाहि ते परत सांगू शकत. त्यांनी अनेक समारंभांत हा प्रयोग करून दाखविला. एकदां एका शाळेत शेकडों लोकांसमोर त्यांनी हा प्रयोग दाखविला. ते फळ्याच्यापुढे फळ्याकडे पाठ करून बसले; व फळ्यावर शंभर वस्तूंचीं नावें लिहिण्यांत आली. तीं त्यांना फक्त एकदां सावकाशपणे वाचून दाखविली. मग तेथें हजर असलेले बुलढाण्याचे डी. सी. यांनी त्यांना प्रश्न विचारले व त्यांनी अचूक उत्तरें दिली. सरतेशेवटी त्यांनी १ पासून १०० वस्तूंचीं नांवें क्रमशः म्हणून दाखविली. व उलट शंभरापासून ते एकपर्यंत सर्व वस्तु सांगितल्या. हा चमत्कार पाहून सर्व मंडळी स्तंभित झाली. आम्ही त्यांना नंतर याचें रहस्य विचारलें असतां ते म्हणाले, की, " यामध्यें आश्चर्य कांही नाही. केवळ साहचर्यानें वस्तु लक्षांत राहतात. याचे हें एक उदाहरण आहे."

वकिलीचा धंदा हा त्यांचा पोटापाण्याचा धंदा होता; व साहित्यनिर्मिति ही त्यांची हौस होती, त्यांची ओढ होती. त्यांत त्यांचा जीव होता. ह्या दोन्ही गोष्टी एक असत्या, तर किती चांगलें झालें असतें, असें ते वारंवार

म्हणत असत. कारण पोटापाण्याच्या धंद्यांत इतका वेळ जात असे की त्याबद्दल त्यांना मनस्वी वाईट वाटत असे. त्यांची सर्व साहित्यनिर्मिति साहित्याची उपजत अनावर हौस म्हणून झाली. ( ' युगवाणी ' १९६९ )

---

## ८ : श्रीपाद कृष्णांच्या कांही आठवणी

[ संकलक : **प्रा. दि. वि. जोशी** ]

१

एकदां केस घेतल्यानंतर पक्षकाराच्या कामांत तात्यासाहेबांनी कधीहि कुचराई केली नाही. एकहि गोष्ट चुकून राहिली, असे म्हणण्याची पाळीहि त्यांच्यावर कधीं आली नाही. इतक्या दक्षतेने कोर्टातील कामें ते करीत. प्रामाणिकपणा व सचोटी याबाबत त्यांच्याइतका आदर्श वकील क्वचितच सांपडेल. पक्षकाराच्या पैन् पैचा हिशेब ते ठेवीत. पक्षकार मागेल त्यावेळी त्याची रक्कम हवाली करीत.

एकदां तर त्यांना एक सवाई पक्षकार भेटला. पक्षकाराकडून १००–१२५ ची रक्कम वसूल करावयाची असूनहि, त्याची कोर्टातून काढलेली ५०० रु. ची रक्कम आपले येणें न कापतां, त्यांनी परत केली. आपली रक्कम कापून घ्यावी, असा उपदेश करणाऱ्या कारकुनालाहि, तसें कायदेशीर रीत्या आपणांस करतां येणार नाही, अशी समजहि दिली. त्या पक्षकारानें तात्यांना रक्कम परत तर केली नाहीच, उलट आपली कामें दुसऱ्या वकिलाकडे दिली. अशा गोष्टी कांहीं काही वेळा घडत परंतु त्यामुळें त्यांचें मन व्यथित न होतां ते म्हणत, ' आपण प्रामाणिकपणें वागलो, यांत मला जास्त समाधान आहे '...

तात्यासाहेबांचा बराच वेळ कोर्टकामांत जाई. उरलेला सर्व वेळ लेखन-वाचनांत जाई. अशा वेळीं रात्रींचे २-३ वाजून जात. वाचतांना अगर लिहितांना भोंवती कितीहि गोंगाट चालू असला, तरी त्यांच्या कामांत व्यत्यय येत नसे. एकदां त्यांच्या घराच्या ओसरीत, आसरा म्हणून चारपांच कुत्री जमली होतीं आणि ती सारखीं ओरडत होती. असें नेहमींच घडे. तात्यांना याचा उपद्रव होत नसावा. कारण आंत ते लिखाणांत गढून गेलेले असत. तें पाहून एकदां त्यांना कोणी विचारलें की, ' ओसरीत कुत्रीं जमून भुंकताहेत, तरी लिखाण कसें सुचतें ? ' त्यावर तात्या म्हणाले, ' अहो, मी श्रीपाद आहे ना ? मग भोंवती कुत्री जमणारच ! '

तात्यासाहेबांच्या या वाक्यांत श्रीदत्तावतार श्रीपाद श्रीवल्लभ यांना उद्देशून केलेली कोटी होती. पण ती कितीकांना कळली कोणास ठाऊक ! ...

' सुदाम्याच्या पोह्यां'तील बंडूनाना आणि पांडुतात्या ही दुक्कल त्यांनीं तेव्हाऱ्याचे बंडुनाना ( सुनावणी कारकून ) व तात्याबा चांदेकर ( जप्ती कारकून ) यांवरून घेऊन त्यांत वासुदेवराव पिंपळीकर ( मलकापूर ) यांच्या स्वभावांतील रंग मिसळले. विनोदाला आवश्यक ती अतिशयोक्तीहि स्वीकारली. वर वर ती अतिशयोक्ति वाटली, तरी ती सत्याच्या निकटची आहे. त्यांच्या प्रत्येक लिखाणाला असा वास्तवाचा आधार आहे.

' मी बुद्धिवान नाही. कोणत्याहि गोष्टीचें आकलन व्हायला मला वेळ लागतो, परंतु एकदां तें झालें म्हणजे मात्र मनांत ती पक्की ठसते, ' असें तात्यासाहेब नेहमी म्हणत. स्वतः भावनाप्रधान असल्यामुळें दुसऱ्याच्या दुःखानें त्यांचें हृदय द्रवत असें. अस्पृश्यांवर होत असलेल्या अन्यायांबद्दल त्यांना फार चीड होती. त्यांनी आपल्या स्वतःच्या खामगांवच्या घरांतली विहीर १९१५ सालींच अस्पृश्यांना खुली केली होती. आणि अस्पृश्यांना त्यांच्या घरांतहि अगत्यानें वागवले जात असे, हें प्रसिद्धच आहे. अस्पृश्यांसाठीं लेखक या नात्यानेंहि कांही तरी करावे, असें त्यांना नेहमीं वाटे. ते पुष्कळ वेळां महारवाड्यांत जात असत. त्यांनी ' शामसुंदर ' ही कादंबरी या प्रश्नावरच लिहिली आहे. ( ' युगवाणी '—ऑक्टोबर १९७० )

## २

### स्मरणाचे प्रयोग

तात्यासाहेबांच्या स्मरणशक्तीसंबंधी पुष्कळांना माहिती आहे. सभासंमेलनांतून ते स्मरणशक्तीचे प्रयोगहि करून दाखवीत. तसाच ते आणखीहि एक गणिती प्रयोग करीत. त्यांना कोणत्याहि वर्षाच्या कोणत्याहि महिन्याची तारीख सागावी, त्या दिवशी असणारा वार ते चटकन सांगत.

## ३

### ' मंदोधरी '

तात्यासाहेब जळगांवला आले तसे ते डिडोळकराच्या घरीं उतरले होते. त्यांच्या घरासमोरच असलेल्या राजाभाऊ डिडोळकराच्या घरीं मधून मधून त्यांचें संध्याकाळचें जेवण असे. कोल्हटकरांचा अत्यंत आवडता पदार्थ म्हणजे 'पिठलें'. फोडणीचें वरण व कढीहि त्यांना आवडे. कढीच्या किंवा फोडणीच्या

वरणाच्या ६–६ वाट्या ते आवडीनें पिऊन जात. त्या संध्याकाळच्या जेवणांत फोडणीचें वरण नेहेमीं असे. आणि त्या घरांत फोडणीच्या वरणाला ' मंदोधरी ' असें म्हणत. कोल्हटकरांनी जेवणाला कधीं नांवें ठेवलीं नाहीत. जेवण कसेंहि असो, रसिक भोक्त्याच्या वृत्तीनें ते जेवणाचा रसास्वाद घेत.

शेवटीं शेवटीं ते एकभुक्त राहात. संध्याकाळी दूध व फळफळावळें घेत. जी फळें असतील तीं ते खात. विशेषतः अंजीर व केळीं त्यांना फार आवडत. दुधांत मुरवलेलीं अंजिरें संध्याकाळीं घेत.

४

## ' जर ठकु मारी '

तात्यासाहेबांचा स्वभाव विनोदी होता. विनोद करून ते दुसऱ्यांना मनसोक्त हंसवीत व स्वतःहि मनमुराद हंसत. एकदां एक मुलगा त्यांना लेख वाचून दाखवीत असतांना एका शब्दावर अडला. तात्यासाहेबांनी त्याला पुन्हां तो शब्द वाचावयाला सांगितला. त्यांनाही अर्थबोध झाला नव्हता. मुलगा वाचूं लागला—

' जर ठकु मारी '

तात्यासाहेबांनी संदर्भ लक्षांत घेऊन त्याचा अर्थ लावला आणि ते मनसोक्त हंसू लागले. संध्याकाळी नेहेमीप्रमाणे मैफल बसली असतां त्यांनीं कै. केशवराव जोशी यांना म्हटले, " केशवराव, एक वाक्य पुरें करा. ' जर ठकु मारी ' तर ..." केशवराव गोंधळून गेले. तात्यासाहेब काय म्हणतात तें कांही लक्षांत येईना. शेवटी तात्यासाहेबांनी मुलगा वाचत होता तो शब्द दाखविला. तो शब्द होता ' जरठ–कुमारी ' मग दोघेहि हंसू लागले.

( जळगांव–जामोदच्या व्यक्तीनीं सांगितलेल्या कांहीं आठवणी—' युगवाणी ' जून १९७० )

---

## कोल्हटकर यांच्या आयुष्यांतील महत्त्वाच्या घटना

१८७१ (२९ जून) नागपूर येथें जन्म
१८८६ पंधराव्या वर्षी विवाह
१८८८ मॅट्रिक
१८९१ बी. ए.
१८९२ 'विविधज्ञानविस्तारां'त पहिला टीकालेख
१८९६ पहिलें नाटक 'वीरतनय'— रंगभूमीवर पहिला प्रयोग
१८९६ 'वीरतनया'स २०० रु. चें पारितोषिक
१८९७ एल्‌एल्. बी.
१८९८ अकोला येथें वकिली सुरू
१८९९ वकिलीसाठीं तेल्हारा येथें स्थलांतर
१९०२ पहिला विनोदी लेख 'साक्षीदार'
१९०५ खामगांव येथें वकिली सुरू केली.
१९०६ गडकऱ्यांची भेट
१९१० 'सुदाम्याचे पोहे' अथवा 'अठरा धान्यांचें कडबोळें' 'मनोरंजन'नें प्रसिद्ध केलें.
१९१२ खामगांव येथें दुमजली घर बांधलें.
१९१३ 'भारतीय ज्योतिर्गणित' ग्रंथाचें प्रकाशन
१९१४ 'तोतयाचें बंड' नाटकावरील विस्तृत टीका
१९१७ मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय— वार्षिक समारंभाचे अध्यक्ष
१९१७ स्वराज्य संघाच्या खामगांव येथील शाखेचे अध्यक्ष
१९१७ माटरगांव येथें शेतीची खरेदी
१९१८ ठाणें मराठी ग्रंथसंग्रहालय— वार्षिकोत्सवाचे अध्यक्ष
१९१८ कोल्हटकरांच्या अध्यक्षतेखालीं खामगांव येथें सरोजिनी नायडू यांचें भाषण
१९१८ गंधर्व नाटक मंडळीकडून दोन नाटकांबद्दल६०००रु. मिळाले.
१९१८ जळगांव—जामोद येथें प्रयाण —तेथे सप्टेंबरपासून वकिली सुरू केली.
१९१९ आत्मवृत्तलेखन.
१९२० सांगलीच्या तृतीय ज्योतिष संमेलनाचे अध्यक्ष
१९२२ पुण्याच्या द्वितीय कविसंमेलनाचे अध्यक्ष
१९२६ 'महाराष्ट्र गीत'— प्रथम प्रसिद्धी 'रत्नाकर' मासिक.
१९२७ पुणें येथील १२ व्या महाराष्ट्र साहित्य संमेलनाचे अध्यक्ष
१९३१ जळगांव— जामोद येथील वकिली बंद करून नागपूरला प्रयाण

१९३४ (२४ मार्च)
जळगांव–जामोद येथील बारऋममध्यें कोल्हटकरांच्या छायाचित्राचें अनावरण

१९३४ (२४ मार्च)
कोल्हटकरांच्या हस्तें तेथील ग्रंथालयाचें उद्घाटन

१९३४ पुणें येथें कनिष्ठ बंधु दि. कृ. कोल्हटकर यांच्या घरीं वास्तव्य.

१९३४ (१ जून)
पुणें येथें सकाळीं ६ वाजतां ६३ व्या वर्षी निधन.

[ थोडी कौटुंबिक माहिती— पत्नी सौ. रमाबाई ( जन्म १८७९, मृत्यु १२ मे १९४८ ), ४ पुत्र दिनकर, प्रभाकर, भास्कर व दिवाकर, १ कन्या सौ. कमलाबाई.—जामात प्रा. भा. ल. पाटणकर.—अच्युत बळवंत व चिंतामणराव हे चुलतभाऊ, चित्तरंजन व बाळ हे चुलत पुतणे. पु. य. देशपांडे व भवानीशंकर नियोगी हे बंधूंचे जावई. ]

---

# श्रीपाद कृष्ण कोल्हटकर यांचें समग्र वाङ्मय

## नाटकें, कादंबऱ्या व इतर ग्रंथ

(१) वीरतनय नाटक (१८९८)
(२) मूकनायक ,, (१९०१)
(३) गुप्तमंजूष ,, (१९०३)
(४) मतिविकार ,, (१९०७)
(५) प्रेमशोधन ,, (१९११)
(६) भारतीय ज्योतिर्गणित (१९१३)
(७) वधूपरीक्षा नाटक (१९१४)
(८) सहचारिणी ,, (१९१८)
(९) जन्मरहस्य ,, (१९१८)
(१०) सुदाम्याचे पोहे (१९१९)
(११) परिवर्तन नाटक (१९२३)
(१२) शिवपावित्र्य ,, (१९१४)
(१३) गीतोपायन (१९२४)
(१४) दुटप्पी की दुहेरी ? (१९२५)
(१५) श्यामसुंदर (१९२५)
(१६) कथासप्तक (१९२६)
(१७) श्रमसाफल्य नाटक (१९२९)
(१८) कोल्हटकरांच्या चार लघुकथा (१९३०-१)
(१९) कोल्हटकर लेखसंग्रह (१९३२)
(२०) आत्मवृत्त (१९३५)
(२१) मायाविवाह नाटक (१९४६)
(२२) सुदाम्याचे निवडलेले पोहे (१९४७)
(२३) श्यामसुंदर (संक्षिप्त आवृत्ति) (१९५२)
(२४) साहित्यविमर्श (१९६५)

## साहित्यविषयक टीकात्मक लेख

(१) विक्रम-शशिकला नाटक [ विविधज्ञानविस्तार १८९३ ]
(२) संगीत शापसंभ्रम [ वि. ज्ञा. विस्तार १८९४ ]
(३) पण लक्षांत कोण घेतो ! [ वि. ज्ञा. विस्तार १८९५ ]
(४) संगीत नाटकत्रय—चंद्रसेना, मातृशिक्षाप्रभाव व बाजीराव मस्तानी [ वि. ज्ञा. विस्तार १८९८ ]
(५) वीरतनयाची ढाल [ वि. ज्ञा. वि. १८९८ ]
(६) मुक्ता [ वि. ज्ञा. वि. १८९८ ]
(७) हिंदु धर्म आणि सुधारणा [ वि. ज्ञा. वि. १८९९ ]
(८) पुष्पभाषात्मक चरित्र आणि वस्त्राच्छादन [ वि. ज्ञा. वि. १९०० ]
(९) दोन सामाजिक नाटकें—संगीत रूढिविनाशन व तरुबाला [ वि. ज्ञा. वि. १९०० ]
(१०) माधवनिधन नाटक [ वि. ज्ञा. वि. १९०० ]
(११) मॅक्बेथ नाटकाची दोन भाषांतरें—डाकिनीविलास व मानाजीराव [ वि. ज्ञा. वि. १९०१ ]
(१२) श्रीमंत गायकवाड यांच्या उदार आश्रयाखाली प्रसिद्ध झालेली पुस्तकें—अथेन्सचें साम्राज्य, ग्रीसचा इतिहास, हरिविक्रम चरित्र व दत्तक चंद्रिका [ वि. ज्ञा. वि. १९०२ ]
(१३) संगीत सौभद्र [ वि. ज्ञा. वि. १९०३ ]
(१४) अण्णासाहेब किर्लोस्कर यांचें चरित्र [ वि. ज्ञा. वि. १९०५ ]
(१५) सद्यःस्थितिप्रेरित दोन नवी नाटकें—भीमराव व स्वामी चिदानंद अथवा प्रस्तुत चळवळीचें प्रतिबिंब [ वि. ज्ञा. वि. १९०७–८ ]
(१६) मराठी भाषेचे संप्रदाय व म्हणी [ वि. ज्ञा. वि. १९१० ]
(१७) तोतयाचें बंड [ मनोरंजन १९१४–अंक १, २, ३, ५, ६ ]
(१८) तुलसी रामायण [ मनोरंजन १९१४ ]
(१९) ग्रहगणित [ वि. ज्ञा. वि. १९१५ ]
(२०) संगीत प्रेमाभास नाटक [ मनोरंजन १९१७ अंक १, २, ३, ४, ५ ]
(२१) रागिणी व तिची भावंडें [ वि. ज्ञा. वि. १९१८ ]

## स्वतंत्र लेख व निबंध

( १ ) मराठी वाङ्मयांतील विशेष व त्यांचे उगम [ वि. ज्ञा. वि. १९१२ ]

( २ ) मराठी वाङ्मय व स्वावलंबन

मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या वार्षिक समारंभाचे अध्यक्ष या नात्यानें वाचलेला निबंध.

[ वि. ज्ञा. विस्तार १९१७ ]

(३) मराठी ग्रंथसंग्रह

ठाणें येथील मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या वार्षिकोत्सवाच्या वेळीं वाचलेला निबंध—

[ मराठी साहित्य पत्रिका १९१८ ]

( ४ ) पन्नास वर्षांपूर्वींचे व आतांचें महाराष्ट्र

[ वि. ज्ञा. विस्तार पन्नाशीच्या आनंदोत्सवाचें स्मारक—ग्रंथ दुसरा १९२१ ]

( ५ ) हिंदुत्वाची व्याख्या [ कर्मयोगी १९२० ]

## अध्यक्षीय भाषणें

( १ ) तिसरें ज्योतिष संमेलन (सांगली, १९२० ) [ म. सा. पत्रिका १९२० ]

( २ ) द्वितीय महाराष्ट्र कविसंमेलन (पुणें, १९२२ )

( ३ ) बारावें महाराष्ट्र साहित्य संमेलन ( पुणें, १९२७ )

## प्रस्तावना

( १ ) नाटकांवरील टीकात्मक निबंध — १९०९
( २ ) नाटकविषयक व्यापक विचार — १९१०
( ३ ) पुरुषांचें बंड — १९१३
( ४ ) नाटक्याचे तारे — १९१४
( ५ ) विरहगीति — १९१५
( ६ ) विदर्भवीणा — १९३०

## कादंबऱ्या

( १ ) दुटप्पी कीं दुहेरी ? ( २ ) श्यामसुंदर.

## लघुकथा

( १ ) गाणारें यंत्र, ( २ ) पति हाच स्त्रीचा अलंकार, ( ३ ) संपादिका, ( ४ ) गरीब बिचारें पाडस !

( ५ ) चोरच्या चोर आणि वर— [ विश्ववाणी, नागपूर १९३४ ] ( ६ ) बबीची तयारी [ ' रत्नाकर ' जाने. १९३२ ], ( ७ ) मोत्याचा पापा [ ' विहंगम, ' जुलै १९३३ ), ( ८ ) आजोबाचें काम [ ' संजीवनी-' दसरा अंक १९३४ ].

कोल्हटकरांच्या पहिल्या चार लघुकथा ' कथासप्तक ' पुस्तकांत १९२६ सालीं प्रसिद्ध झाल्या. त्यांचें स्वतंत्र पुस्तक ' कोल्हटकर यांच्या चार लघुकथा ' या नांवानें १९३१ साली माधवपूर वडगांव ( बेळगांव ) येथीय भारद्वाज ग्रंथमालेनें प्रसिद्ध केलें.

## कविता

( १ ) तो दिन, ( २ ) अनुपम सुख, ( ३ ) खरी भाऊबीज, ( ४ ) तुळशीचें लग्न, ( ५ ) छत्रीचे उपकार, ( ६ ) भयंकर जागृति, ( ७ ) स्थित्यंतर, ( ८ ) एका स्त्रीची पर्जन्यविषयक कल्पना, ( ९ ) मृत अपत्याचें शेवटचें चुंबन, ( १० ) सुखकर जागृति, ( ११ ) विलक्षण न्यायसभा, ( १२ ) मृत्य अपत्याचें स्वप्नदर्शन, ( १३ ) सृष्टिदेवता आणि हृदयदेवता, ( १४ ) आगगाडी, ( १५ ) अढळपद अथवा अंत्यजाष्टक, ( १६ ) महाराष्ट्र गीत.

यापैकी १ ते ११ या कविता ' मनोरंजन ' मासिकांत १८९८ ते १९०१ या सालांत प्रसिद्ध झाल्या. १२ वी ' विविधज्ञानविस्तारांत ' १९०६ मध्यें प्रकाशित झाली. १३ वी ' मनोरंजनांत ' १९१४ सालीं व १५ वी ' विविधकाव्यमाला ' या पुस्तकांत १९२२ मध्यें आली. ' महाराष्ट्र गीत ' या सुप्रसिद्ध कवितेचें प्रथम प्रकाशन करण्याचा मान ' रत्नाकर 'नें ऑगस्ट १९२७ मध्यें मिळविला. तीच कविता लगेच पुढच्या महिन्यांत ' किर्लोस्कर 'नें छापली. पुढें ' विदर्भवीणा ' या वैदर्भीय कवींच्या काव्यसंग्रहांत ती १९३० सालीं समाविष्ट करण्यांत आली. या गीतांतील पहिल्या कडव्यांत ' मर्यादा पौरुषासि जेथ दुःसहा ' ही मूळची ओळ होती. ती नंतर ' पौरुषासि अटक गमे जेथ दुःसहा ' अशी दुरुस्त करण्यांत आली.

## रंगभूमीवर आलेलीं नाटकें

सं. वीरतनय [ पहिला प्रयोग १८९६, अहमदनगर–किर्लोस्कर नाटक मंडळी ]; सं. गुप्तमंजूष [ पहिला प्रयोग १९०१, धारवाड – किर्लोस्कर मंडळी ]; सं. मूकनायक [ पहिला प्रयोग १९०१, निपाणी – किर्लोस्कर मंडळी ]; सं. मतिविकार [ पहिला प्रयोग १९०७, – किर्लोस्कर मंडळी ] सं. प्रेमशोधन [ पहिला प्रयोग १९१०, अहमदनगर – किर्लोस्कर मंडळी ]; वधूपरीक्षा [ पहिला प्रयोग १९१३, खामगांव – महाराष्ट्र नाटक मंडळी ]; सं. परिवर्तन पहिला प्रयोग १९१७, खामगांव – किर्लोस्कर मंडळी ]; सं. सहचारिणी [ पहिला प्रयोग १९१८, बडोदें – गंधर्व नाटक मंडळी ]; सं. जन्मरहस्य [ पहिला प्रयोग १९१८, मुंबई–बलवन्त नाटक मंडळी ].

## रंगभूमीवर न आलेलीं गद्य नाटकें

याशिवाय रंगभूमीवर न आलेली कोल्हटकरांचीं पुढील तीन गद्य नाटकें मासिकांतून प्रसिद्ध झाली आहेत :— ‘ शिवपावित्र्य ’ ( विविधज्ञानविस्तार १९२४ ), ‘ श्रमसाफल्य ’ ( यशवंत १९२९ ) व ‘ मायाविवाह ’ ( युगवाणी १९४६ ).

# कोल्हटकरांचें मृत्युपत्र

[ कै. श्री. कृ. कोल्हटकर यानी ता. १३–१२–३० रोजीं पहिलें मृत्युपत्र केलें होतें. ते रद्द करून त्यांनीं नागपूर येथें ता. १४–७–३१ रोजीं अखेरचें मृत्युपत्र केलें. त्यानंतर ते ता. १–६–१९३४ रोजी निधन पावले. या मृत्युपत्रांत कोल्हटकराच्या एकूण जिदगीची मोजदाद व वांटणी असून त्यानीं आपली साहित्यविषयक मालमत्ता आपले ज्येष्ठ पुत्र दिनकर, द्वितीय पुत्र प्रभाकर व कन्या सौ. कमलाबाई पाटणकर या तिघांस बहाल केली आहे. मृत्युपत्रांतील हे महत्त्वाचें कलम पुढीलप्रमाणे आहे : ]

[ ६ ] माझ्या नाटकांपैकी ‘ सहचारिणी ’ व ‘ परिवर्तन ’ या दोन नाटकांचे प्रयोग करण्याची मोनॉपली गंधर्व कंपनीस दिली आहे. बाकीच्या नाटकांपैकी कोणत्याच नाटकाचे प्रयोग करण्याची मोनॉपली कोणत्याहि कंपनीस किंवा व्यक्तीस दिलेली नाही. माझी नाटकें, इतर पुस्तकें, कविता व लेख हे छापण्याचे हक्क सर्वस्वी माझ्याकडे आहेत व ते कोणालाहि दिलेले नाहीत. माझीं पुस्तकें कविता, लेख, निबंध व भाषणें यांची खाली दिल्याप्रमाणें विल्हेवाट व्हावी.

( अ ) माझ्या चार गोष्टी, ‘ दुटप्पी की दुहेरी ’ व ‘ श्यामसुंदर ’ या दोन कादंबऱ्या, ‘ साहित्य – बत्तिशी ’ व ‘ भारतीय ज्योतिर्गणित ’ या माझ्या पुस्तकांचे सर्व प्रकारचे हक्क चि. दिनकर यास मिळावे. या पुस्तकांच्या घरी असलेल्या व येणें असलेल्या सर्व प्रती चि. दिनकर यास मिळाव्या.

( ब ) माझ्या नाटकांपैकी ‘ मतिविकार,’ ‘ प्रेमशोधन,’ ‘ वधूपरीक्षा,’ ‘ शिवपावित्र्य,’ ‘ श्रमसाफल्य,’ व ‘ मायाविवाह,’ या सहा नाटकांचे प्रयोग करण्याचे, छापण्याचे व इतर सर्व प्रकारचे हक्क माझा मुलगा चि. प्रभाकर यास मिळावे. तसेंच या पुस्तकांच्या घरी असलेल्या व येणें असलेल्या प्रती त्यासच मिळाव्या.

( क ) माझे सर्व टीकालेख, भाषणे व निबंध यांच्या प्रकाशनासंबंधी व इतर सर्व हक्क, तसेच माझ्या नाटकांपैकी ‘ वीरतनय,’ ‘ मूकनायक,’ ‘ गुप्त-मंजूष,’ व ‘ जन्मरहस्य ’ यांचे प्रयोग करण्याचे, छापण्याचे व इतर सर्व प्रकारचे हक्क व त्याप्रमाणें ‘ सहचारिणी ’ व ‘ परिवर्तन ’ या दोन नाटकांसंबंधीं प्रयोग करण्याखेरीज छापणें वगैरे सर्व प्रकारचे हक्क माझी मुलगी चि. सौ. कमलाबाई पाटणकर ईस मिळावे; व त्याचप्रमाणें या पुस्तकांच्या घरीं असलेल्या व येणें असलेल्या प्रतीदेखील तिलाच मिळाव्या.

[ ७ ] वरील लेखांत न दर्शविलेली माझी जी इस्टेट राहिली असेल ती माझा वडील मुलगा चि. दिनकर यास मिळावी.

येणेंप्रमाणें हें मृत्युपत्र आज तारीख १४ जुलै १९३१ रोज मंगळवारीं साक्षीदारांसमक्ष सही करून पुरें केलें आहे.

सही

**श्री. कृ. कोल्हटकर—**

[ या मृत्युपत्रांत 'आत्मवृत्ता'चा निर्देश नाहीं. तथापि, त्यांतील सातव्या कलमानुसार, त्याच्यासंबंधीचे सर्व हक्क श्री. दिनकर श्रीपाद कोल्हटकर यांच्याकडे होते. म्हणूनच त्यांनीं ह्या 'आत्मवृत्ता'सह ' दुटप्पी कीं दुहेरी ', ' श्यामसुंदर ' ' साहित्य-बत्तिशी ' सर्व लघुकथा व कविता व ' भारतीय ज्योतिर्गणित ' या पुस्तकांचे सर्व प्रकारचे संपूर्ण हक्क ५६ रुपये ६ आणे किंमतीच्या स्टॅपावर मॉडर्न बुकडेपोला दिले. हा करार श्री. दिनकर श्रीपाद कोल्हटकर व श्री. नारायण त्र्यंबक भिडे, मालक मॉडर्न बुकडेपो, यांच्यामध्यें ता. २८–४–१९४७ रोजीं खामगांव येथें झाला. या करारांत नमूद केलेली कै. कोल्हटकरांच्या मृत्युपत्राची अधिकृत प्रत मॉडर्न बुकडेपोला देण्यांत आलेली आहे. ]

---

## श्रीपाद कृष्ण कोल्हटकर यांच्यासंबंधीचें वाङ्मय

( १ ) कोल्हटकरांच्या चार नाटकांतील सुंदर उतारे अर्थासह व टीकेसहित [ रा. ग. गडकरी १९०७ ]
( २ ) नाट्यकलारुक्कुठार–गुणमंजूष [ स. ना. ठोसर, १९०८ ]
( ३ ) श्री. कृ. कोल्हटकर चरित्र [ गं. दे. खानोलकर, १९२७ ]
( ४ ) महाराष्ट्रीय नाटककार श्री. कृ. कोल्हटकर यांचें चरित्र [ शं. बा. मुजुमदार, १९२७ ]
( ५ ) नाटककार कोल्हटकर [ द. रा. गोमकाळे, १९५० ]
( ६ ) नाटककार कोल्हटकर [ ना. बा. पराडकर, १९५७ ]
( ७ ) श्रीपाद कृष्ण वाङ्मयदर्शन [ वा. ल. कुलकर्णी, १९५९ ]
( ८ ) श्रीपाद कृष्ण कोल्हटकर व्यक्तिदर्शन [ग. त्र्यं. माडखोलकर, १९७०]
( ९ ) कोल्हटकर आणि हिराबाई [ म. ल. वऱ्हाडपांडे, १९६९ ]
(१०) श्री. कृ. कोल्हटकर–एक अभ्यास [ डॉ. ह. बा. कुलकर्णी–अप्रकाशित ]

---

# कोल्हटकर यांच्यासंबंधींचें संदर्भ साहित्य


(१) प्रकाशन प्रतिभा [प्रकाशक ह. वि. मोटे]

(२) बहुरूपी [चिं. ग. कोल्हटकर]

(३) कोल्हटकर कुलवृत्त [बा. श्री. कोल्हटकर, १९३६]

(४) केळकरांचा पत्रव्यवहार [न. चिं. केळकर]

(५) केळकर– साहित्य खंड ,,

(६) दोन तपें [ग. त्र्यं. माडखोलकर]

(७) साहित्यशलाका ,,

(८) व्यक्तिरेखा ,,

(९) गोफ आणि गोफण [वि. स. खांडेकर]

(१०) रेषा आणि रंग ,,

(११) गोकर्णीच्यीं फुलें ,,

(१२) विदर्भवीणा [संपादक ग. न. पंडित]

(१३) माझा जीवनविहार [गो. स. टेंबे]

(१४) रंगाचार्य ,,

(१५) जीवनव्यासंग ,,

(१६) मराठी नाट्यसमीक्षा [रा. शं. वाळिंबे]

(१७) आधुनिक मराठी वाङ्मयाचा इतिहास [अ. ना. देशपांडे]

(१८) रंगभूमि मासिक – (मे, जून १९२७)

(१९) सुबोध मासिक – कोल्हटकर विशेषांक (मार्च १९३४)

(२०) पारिजात मासिक – कोल्हटकर विशेषांक (ऑगस्ट १९३४)

(२१) पुरुषार्थ मासिक – साहित्य-सम्राट श्री. कृ. कोल्हटकर स्मरणांक (जुलै १९५४)

(२२) युगवाणी मासिक – कोल्हटकर खास अंक (जून १९७०)

(२३) प्रतिभा पाक्षिक – (१९३५–३६–३७)

# महाराष्ट्र-गीत

बहु असोत सुंदर संपन्न कीं महा ।
प्रिय अमुचा एक महाराष्ट्र देश हा ।। ध्रु० ।।

गगनभेदि गिरिविण अणु नच जिथें उणें ।
आकांक्षापुढति जिथें गगन ठेंगणें ।।
अटकेवरि जेथिल तुरंगि जल पिणें ।
तेथ अडे काय जलाशय-नदांविणें ।।
पौरुषासि अटक गमे जेथ दुःसहा ।।
प्रिय अमुचा एक महाराष्ट्र-देश हा ।। १ ।।

प्रासाद कशास जेथ हृदयमंदिरें ।
सद्भावांचींच भव्य दिव्य आगरें ।।
रत्नां वा मौक्तिकांहि मूल्य मुळि नुरे ।
रमणीची कूस जियें नृ-मणि-खनि ठरे ।।
शुद्ध तिचें शीलहि उजळवि गृहा गृहा ।।
प्रिय अमुचा एक महाराष्ट्र-देश हा ।। २ ।।

नग्न खड्‌ग करिं उघडे बघुनि मावळे ।
चतुरंग चमूचेंही शौर्य मावळे ।।
दौडत चहुंकडुनि जवें स्वार जेथले ।
भासति शत-गुणित जरी असति एकले ।
यन्नामा परिसुनि रिपु शमित-बल अहा ।।
प्रिय अमुचा एक महाराष्ट्र-देश हा ।। ३ ।।

विक्रम-वैराग्य एक जागिं नांदती ।
जरिपटका भगवा झेंडाहि डोलती ।।
धर्म-राजकारण समवेत चालती ।
शक्ति-युक्ति एकवटुनि कार्य साधिती ।।
पसरे यत्कीर्ति अशी विस्मयावहा ।।
प्रिय अमुचा एक महाराष्ट्र-देश हा ।। ४ ।।

गीत मराठ्यांचें श्रवणीं मुखीं असो ।
स्फूर्ति दीप्ति धृतिहि देत अंतरीं ठसो ।।
वचनिं लेखनींही मराठी गिरा दिसो ।
सतत महाराष्ट्र-धर्म-मर्म मनिं वसो ।।
देह पडो तत्कारणिं ही असे स्पृहा ।।
प्रिय अमुचा एक महाराष्ट्र-देश हा ।। ५ ।।

—श्री. कृ. कोल्हटकर